॥ श्रीराम समर्थ ॥

1983

# श्रीरामविजय

( श्रीधर-कवि-विरचित-मराठी-सटीक )



गीताप्रेस गोरखपुर
GITA PRESS, GORAKHPUR

गीताप्रेस, गोरखपुर

॥ श्रीराम समर्थ ॥

1983

# श्रीरामविजय

( श्रीधर-कवि-विरचित-मराठी-सटीक )

त्वमेव माता च पिता त्वमेव
त्वमेव बन्धुश्च सखा त्वमेव।
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव
त्वमेव सर्वं मम देवदेव॥

गीताप्रेस, गोरखपुर

॥ श्रीराम ॥

# प्रकाशकीय निवेदन

**चरितं रघुनाथस्य शतकोटिप्रविस्तरम् ।**
**एकैकमक्षरं पुंसां महापातकनाशनम् ॥ (बुधकौशिक)**

धर्मसंस्थापनेसाठी भगवंतांनी गीतेतील अभिवचनानुसार युगायुगात कार्य-कालानुरूप असंख्य अवतार घेतले, पण त्यांतील श्रीराम व श्रीकृष्ण हे अवतार मात्र भारतीयांचे जीव की प्राण आहेत. या दोघांच्या चरित्रांवर महाकाव्यांपासून लोकगीतांपर्यंत वाङ्मयाचे जेवढे प्रकार आहेत, त्या सर्व प्रकारांत रचना झालेल्या आहेत.

महर्षी वाल्मीकींचे रामायण हे श्रीरामचरित्राची गंगोत्री मानले जाते. त्याच्या आधाराने पण स्वत:च्या प्रतिभेनुसार अनेक बदल करून अनेक चरित्रे प्रतिभावंत कवींनी निर्माण केली व ती जनमानसांत रूढ केली. अध्यात्म रामायण, भावार्थ रामायण, आनंद रामायण, मोरोपंतांची एकशे आठ रामायणे, रघुवंश, रामचरितमानस इ. इ. श्रीरामचरित्राचा वाङ्मय-विस्तार पाहिला, तर बुधकौशिकांचे 'रघुनाथचरित्र शतकोटी विस्ताराचे आहे', असे म्हणणे या अर्थानेही सत्य वाटू लागते.

श्रीधरस्वामींचा 'श्रीरामविजय' हा ग्रंथ वरील मालिकेत गणण्याजोगा पण मराठी भाविकांचा कंठमणी ठरावा, असा आहे. श्रीसंत ज्ञानेश्वर महाराजांपासून प्रसिद्धीस आलेल्या ओवी छंदात असलेला ९१४७ ओव्यांचा व ४० अध्यायांचा हा ग्रंथ. मूळ वाल्मीकिरामायणापेक्षा काही वेगळे प्रसंग यात आले आहेत. परंतु ते श्रीरामभक्ती वाढण्याच्या दृष्टीने उपयुक्त ठरले आहेत. या ग्रंथात अतिशयोक्ती, विसंगतीतून हास्यरस, उपहास इत्यादी विविध अलंकारांमुळे यातील कथा बहारदार झाल्या आहेत. हा ग्रंथ केवळ काव्यदृष्ट्याच श्रेष्ठ नसून तो एका संतकवीने लिहिला आहे, त्यामुळे प्रासादिक आहे. याच्या पठणाने पारायणकर्त्यांचे मनोरथ पूर्ण होतात, हीही या ग्रंथाची महती आहे.

या ग्रंथाचे कर्ते 'श्रीधर' हे पंढरपूरजवळच्या नाझरे गावातील. त्यांचे पूर्ण नाव श्रीधर ब्रह्मानंद देशपांडे, नाझरेकर. त्यांचे वडील ब्रह्मानंद यांचा आध्यात्मिक अधिकार फार मोठा होता. तेच श्रीधरांचे गुरू होते. श्रीधरांची गुरुपरंपरा मोठी आहे. रामानंद, अमलानंद, सहजानंद, पूर्णानंद, दत्तानंद व ब्रह्मानंद असा समृद्ध आध्यात्मिक वारसा लाभल्यामुळे त्यांची ग्रंथरचना भक्तिपूर्ण झाली आहे. हिंदी भाषेत रामचरित्रमानसाचे जे स्थान तेच मराठी भाषेत श्रीरामविजयाचे. श्रीरामविजयाची रचना करताना स्वत: जणू ते प्रसंग पाहिल्यासारखे, अनुभवल्यासारखे कवीने वर्णिले आहेत. त्यामुळे ते वाचून वाचकाची भक्ती अधिकाधिक वाढत जाते. भाविक वाचक त्या वर्णनात तल्लीन होऊन जातो.

श्रीधरांचा जन्म इ. स. १६५८ साली झाला. वयाच्या विसाव्या वर्षापासून पंढरपुरात राहून पुराण-प्रवचने व कीर्तने करून त्यांनी भक्तिमार्गाचा प्रसार केला. त्याचबरोबर हरिविजय, रामविजय, वेदान्तसूर्य, पांडवप्रताप, जैमिनी अश्वमेध शिवलीलामृत हे प्रमुख ग्रंथ रचले. याशिवाय इतर पद्ये, आख्याने इत्यादी रचना पुष्कळ आहे. त्यांनी पुढे संन्यास घेऊन इ.स. १७२९ मध्ये समाधी घेतली.

या ग्रंथाचे पारायण करण्याचीही पद्धती आहे. जेवढ्या दिवसांत पारायण करावयाचे असेल, तेवढ्या दिवसांत ४० अध्यायांची विभागणी करून पारायण करावे.

संत साहित्याचा प्रसार करण्याच्या धोरणानुसार आम्ही हा ग्रंथ प्रकाशित केला आहे. या ग्रंथाच्या शेवटी श्रीसमर्थविरचित श्रीरामप्रार्थना दिली आहे. श्रीरामभक्त या ग्रंथाचा अवश्य आदर करतील अशी अपेक्षा बाळगून हे वाङ्मयपुष्प श्रीरामप्रभूंच्या चरणी समर्पण करतो.

विनीत
**प्रकाशक**

# विषय-सूची


| अध्याय | विषय | पृष्ठ-संख्या |
|---|---|---|
| | **बालकांड** | |
| १. | मंगलाचरण | ५ |
| २. | रावणाचा पूर्ववृत्तांत, दशरथाचा विवाह, भगवंताचा अवतार | १३ |
| ३. | संततीसाठी पुत्रकामेष्टि यज्ञ, हनुमंताचा जन्म | २२ |
| ४. | श्रीरामचंद्रांचा जन्म | ३३ |
| ५. | विश्वामित्रांचे दशरथाकडे आगमन | ४४ |
| ६. | वसिष्ठांचा उपदेश | ५२ |
| ७. | ताटिकावध, अहल्या-उद्धार, सीतेचा पूर्ववृत्तांत | ६२ |
| ८. | राम-सीता-विवाह | ७२ |
| | **अयोध्याकांड** | |
| ९. | मंथरेचा सल्ला - कैकयीचा हट्ट | ८४ |
| १०. | लक्ष्मण व सीतेसह श्रीरामाचे वनगमन | ९२ |
| ११. | गुहकाची भेट, भरताचे अयोध्येत येणे व चित्रकूटला प्रयाण | १०१ |
| १२. | श्रीराम-भरत भेट | १११ |
| | **अरण्यकांड** | |
| १३. | श्रीरामाचे दंडकारण्यात जाणे, अत्रि, शरभंग, अगस्ती, जटायू यांची भेट | ११८ |
| १४. | शूर्पणखेचा अपमान - खर-दूषण-वध | १२७ |
| १५. | कांचनमृग-मोह, रावणाकडून सीताहरण | १३६ |
| १६. | राम-लक्ष्मणांचे सीतेच्या शोधार्थ दक्षिणेकडे जाणे | १४५ |
| | **किष्किंधाकांड** | |
| १७. | हनुमंताची भेट, सुग्रीवाशी मैत्री, वालीचा वध | १५३ |
| १८. | सीताशोधासाठी सुग्रीवाकडून वानरांना आज्ञा | १६१ |
| | **सुंदरकांड** | |
| १९. | संपातीच्या सांगण्यावरून सीताशोधासाठी हनुमान लंकेत | १७० |
| २०. | सीताशोध, अशोक-वनाचा विध्वंस | १७८ |
| २१. | लंकादहन आणि ब्रह्मदेवाचे पत्र | १८६ |
| २२. | युद्धाची तयारी | १९४ |
| २३. | समुद्र ओलांडण्यासाठी सेतु-निर्माण | २०२ |
| | **युद्धकांड** | |
| २४. | शिष्टाईसाठी अंगदाला पाठविणे | २११ |
| २५. | शिष्टाई असफल, युद्धाला आरंभ | २१९ |
| २६. | रावणाचा पराजय व गर्वहरण | २२९ |
| २७. | कुंभकर्णास जागविणे | २३७ |
| २८. | इंद्रजिताचा युद्धातील पराक्रम | २४४ |
| २९. | लक्ष्मण-इंद्रजित-युद्ध | २५२ |
| ३०. | सुलोचनेचे सती जाणे | २५९ |
| ३१. | अहिरावण-महिरावण | २६७ |
| ३२. | लक्ष्मणाला शक्ती लागणे | २७६ |
| ३३. | रावणवध | २८६ |
| | **उत्तरकांड** | |
| ३४. | सीतेचे अग्निदिव्य | २९४ |
| ३५. | भरताशी पुनर्भेट | ३०२ |
| ३६. | रामास राज्याभिषेक | ३१० |
| ३७. | सीतेचा त्याग | ३१८ |
| ३८. | लव व कुश यांचा पराक्रम | ३२६ |
| ३९. | राम-सीता-पुनर्मिलन | ३३४ |
| ४०. | लवणासुर वध, रामकथा समाप्ती, अवतरणिका | ३४१ |
| | श्रीराम-प्रार्थना | ३४२ |




॥ जय श्रीराम ॥

# श्रीरामविजय

## (पूर्वार्ध)

## बालकांड

### ॥ अध्याय पहिला ॥

## मंगलाचरण

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ॥श्रीसरस्वत्यै नमः ॥ ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ ॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः ॥ ॐ नमो जी पुराणपुरुषा । श्रीमद्भीमातटविलासा । दिगंबरा अविनाशा। ब्रह्मानंदा जगद्गुरू ॥१॥ जय जय जगद्वंद्या पूर्णब्रह्मा । अज अजित आत्मारामा। नीलग्रीवमनविश्रामा[१] । पूर्णानंदा परेशा॥२॥ जय जय मायाचक्रचालका[२] । मायातीता विरिंचिजनका[३]। सकळचित्तपरीक्षका। निजजनरक्षका सुखाब्धी[४] ॥३॥ कमलोद्भव वैकुंठ[५] कर्पूरगौर[६]। अंबिका गजवदन दिनकर। हीं स्वरूपें तुझीं साचार। तूं निर्विकार सर्वदा॥४॥ मंगळकारक तूं गजवदन । मंगळारंभीं तुझें नमन। मंगळजननीवरी[७] करितां लेखन। तुझे गुण न सरती॥५॥ रक्तोत्पलें[८] सुकुमार बहुत । तैसे चरणतळवे आरक्त । प्रपद गौर नेपुरेंसहित । ध्याती भक्त हृदयांतरीं ॥६॥ क्षीराब्धिश्वेतांबर[९]। कीं कांसे लागला क्षीरसागर । कीं निर्दोष यश पवित्र । वसनरूपें आकारलें ॥७॥ अरुणसंध्यारागमिश्रित । तैसी उटी दिसे आरक्त । कीं मंदराचळ सिंदूरें चर्चित । चारही हस्त विराजती ॥८॥ भक्तांचा मनोवारण[१०] अनिवार । नावरे कदा साचार । तो आकर्षावया निर्धार । विवेकांकुश धरियेला ॥९॥ भावें जे शरण येती अज्ञान जन । त्यांचे छेदावया अविद्याविपिन[११]। यालागीं ऊर्ध्व फरश धरून । सिद्ध गजानन सर्वदा ॥१०॥ हातीं झळके लीलाकमळ । जें अम्लानचि सर्वकाळ । तेणें पूजूं इच्छी भक्त प्रेमळ । जें कां निर्मळ अंतरबाह्य॥११॥ जैसे कल्पांतविजूच उमाळे । तैसे अळंकार अंगीं मिरवले । नक्षत्रपुंज गुणीं ओंविले । तेवीं मुक्ताहार डोलती ॥१२॥ हृदयाकाशीं सुरेख । पदक झाला तो मृगांक । क्षयरहित निष्कलंक । निजसुखें सुरवाडला ॥१३॥ भक्तांसी विघ्नें येती प्रचंडें । तीं जो आकळी शुंडादंडें । कल्पांतविजूचेनि पाडें । एकदंत झळकतसे ॥१४॥ दिक्चक्रीं तेज न समाय । तैशीं कुंडलें झळकती मणिमय । किंवा चंद्र आणि सूर्य । कुंडलरूपें तळपती ॥१५॥ मुगुटीं झळकती रत्नकिळा । तेणें नभमंडप उजळला । आदिपुरुष हा साकारला । वरदान द्यावया कवीतें ॥१६॥ ऐसा महाराज गजवदन । वरदहस्तें दावी चिन्ह । करीं रामकथाबीजारोपण । त्यासी जीवन[१२] घालीन मी ॥१७॥ ऐसा उगवतां वरदचंद्र । तेणें उल्हासे कविहृदयसमुद्र । साहित्यभरतें अपार । असंभाव्य दाटलें ॥१८॥ जय जय गजवदना निरुपमा । अगाध न वर्णवे तव महिमा । तुझिया गुणांची पावावया सीमा । कैसा सरता[१३] होईन[१३] मी ॥१९॥ काखेसी मेरू घेऊनि देखा । कैशी नृत्य करील पिपीलिका । कैसें ब्रह्मांड उचलेल मशका । भूगोळ मक्षिका केविं हालवी ॥२०॥ चंद्रासि कर्पूराचें उटणें । वासरमणीस[१४] दर्पण दावणें । कीं हिमनगासि वारा घालणें । मेघासी अर्पणें उदकांजुळी ॥२१॥ सुरतरूपुढें[१५] ठेविजे बदरीफळ[१६]। मलयाचळासि[१७] धूपपरिमळ। कामधेनूसि शुष्कतृणकवळ। आणोनियां समर्पिले ॥२२॥

---

१. भगवान शंकरांच्या मनाला विश्राम देणारा श्रीराम २. मायेद्वारा सृष्टीची घडामोड करणारा ३. ब्रह्मदेवपिता ४. सुखाचा सागर असणारा ५. श्री विष्णू ६. श्री शिव ७. धरित्री, पृथ्वी ८. लाल कमल ९. वस्त्र १०. मनरूपी हत्ती ११. अज्ञानरूपी जंगल १२. जल, पाणी १३. पुर्णत्व पावेन १४. सूर्याला १५. कल्पवृक्ष १६. बोरे १७. चंदनवृक्षयुक्त पर्वताला.

क्षीरसिंधूसि समर्पिजे अजाक्षीर[१] । कनकाद्रिपुढें ठेविली गार । तैसें प्राकृत बोलें अपार । तुझें महत्त्व केंवि वर्णूं ॥२३॥ परी जो जो छंद घेत बाळक । तो तो स्नेहें पुरवी जनक । तरी हा रामविजय सुरेख । सिद्धी पावो तव कृपें ॥२४॥ आतां नमूं सरसिजोद्भवकुमारी[२] । जे विलसे सदा कविजिव्हाग्रीं । जिच्या वरप्रसादें मुकाही करी । वाचस्पतीशीं संवाद ॥२५॥ जे आनंदसरोवरमराळिका[३]। जे चातुर्यचंपककळिका[४] । जी निजकृपेची करूनि नौका । कविबाळका नेत पैलतिरा ॥२६॥ तुझ्या कृपें विरिंचिकुमारी । जन्मांध होय महाजोहरी । अतिमूढ तो वेदार्थ करी । शक्रपदीं बैसे रंक ॥२७॥ अंबे तूं कविहृदयाब्जभ्रमरी[५] । कीं निजानंदसागरींची लहरी । वाग्वल्ली त्वां बैसोनि जिव्हाग्रीं । विरुढे सफळ सर्वदा ॥२८॥ विवेकहंस शुद्ध धवळ । त्यावरी तुझें आसन अचळ । तप्त कांचन जैसें सुढाळ । तैसें निर्मळ निजांग तुझें ॥२९॥ शुभ्र कंचुकी शुभ्र अंबर । दिव्य मुक्तलग अळंकार । निजबोधवीणा घेऊन सुस्वर । गायन करिसी स्वानंदें ॥३०॥ ऐकतां शारदेचें गायन । तन्मय विधि विष्णु ईशान । अंबे तुझे सौंदर्य पाहोन । मीनकेतन[६] तटस्थ ॥३१॥ रंभा उर्वशी तिलोत्तमा । सावित्री अपर्णा मुख्य रमा । तुझ्या चातुर्यसमुद्राची सीमा । त्याही कदा न पावती ॥३२॥ अंबे तुझे गुण केवीं वर्णावे । केवीं अर्कास[७] अर्कीपुष्पें[८] पूजावें । अंबर मुष्टींत केवीं सांठवावें । पल्लवीं बांधवे वायु कैसा ॥३३॥ न करवे उर्वीचें वजन । न गणवे सिंधूचें जीवन । सप्तावरणें भेदोन । मशक केवीं जाऊ शकें ॥३४॥ ऐकोनि बाळकाचीं वचनें । जननी हृदयीं धरी प्रीतीनें । तैसें सरस्वती निजकृपेनें । घाली ठाणें जिव्हाग्रीं ॥३५॥ माझें मन मूढ चकोर । कुहूमाजी[९] इच्छी रोहिणीवर । तरी सरस्वती कृपाळु थोर । शुद्ध बीज प्रकटली ॥३६॥ बीजेपासून चढत्या कळा । तों तों चकोरासी अधिक सोहळा । तैसी येथें रघुनाथलीळा । चढेल आगळा रस पुढें ॥३७॥ ज्ञानाचे अनंत डोळे । उघडिले एकेचि वेळे । आतां वंदू श्रीगुरूचीं पाउलें । जयाचेनि प्रगटे दिव्य ज्ञान ॥३८॥ जो अज्ञानतिमिरच्छेदक । जो प्रकट वेदांतज्ञानार्क[१०] । तो ब्रह्मानंदमहाराज[११] देख । परमाद्भुत महिमा जयाचा ॥३९॥ जो कां पांडुरंगभक्त नर विख्यात । जो भक्त भीमातीरीं समाधिस्थ । तो यतिराजमहिमा अद्भुत । कवण वर्णूं शके पैं ॥४०॥ जागृती स्वप्न सुषुप्ति तुर्या पूर्ण । या चार अवस्थांवरी ज्याचें आसन । उन्मनीही निरसोन । स्वसुखें पूर्ण समाधिस्थ ॥४१॥ चांदिणें कैंचें नसतां मृगांक[१२] । किरणें कैंचीं नुगवतां अर्क । जीवनावांचोनि बीजां देख । अंकुर सहसा फुटेना ॥४२॥ जरी नेत्रांवीण दिसे पदार्थ । मंथनेंवीण[१३] जरी निवडे नवनीत । तरी सद्गुरूवांचोनि परमार्थ । ठायीं पडे जीवासी ॥४३॥ वर नसतां व्यर्थ वऱ्हाड । शिर नसतां कायसें धड । तैसे गुरुकृपेवीण काबाड[१४] । तपें व्रतें साधनें ॥४४॥ अंजनेंवीण न सांपडे निधान । गायत्रीवीण ब्राह्मणपण । सीमा कैंची ग्रामावीण । तैसें गुरूवीण ज्ञान नोहें ॥४५॥ म्हणोनि तनुमनधनेंसीं अनन्य । ब्रह्मानंदस्वामीस शरण । आरंभिली श्रीरामकथा गहन । ग्रंथ संपूर्ण सिद्धी पावो ॥४६॥ ऐसे ऐकतां सप्रेम बोल । बोलिला श्रीगुरु दयाळ । चकोराकारणे उतावेळ । मृगांक जैसा उगवे ॥४७॥ कीं चातकांलागीं धांवे जलधर[१५] । कीं क्षुधितापुढें क्षीरसागर । कीं कल्पतरू शोधीत आला घर । दरिद्रियाचें साक्षेपें ॥४८॥

१. शेळीचे दूध २. श्री सरस्वती ३. आनंदरूपी सरोवरातील हंसी ४. चातुर्यरूपी चाफ्याची कळी ५. कवींच्या हृदयात वास करणारी सरस्वती ६. मदन ७. सूर्यास ८. धोतऱ्याचे फूल ९. अमावस्येच्या रात्री १०. वेदांतज्ञानरूपी सूर्य ११. ग्रंथकाराचे पिता व गुरू १२. चंद्र १३. घुसळल्याशिवाय १४. व्यर्थ १५. वर्षाकालीन मेघ (ढग)

तैसा श्रीगुरु दयासागर। तेणें दिधला अभय वर। म्हणे सिद्धी पावेल साचार। रामविजय ग्रंथ हा ॥४९॥ आतां वंदूं संतसज्जन। जे वैराग्यवनींचे पंचानन[१]। कीं ज्ञानांबरींचे[२] चंडकिरण[३]। उदय अस्त नसे जयां ॥५०॥ जे भक्तसरोवरींचे राजहंस। जे कां अविद्यारण्यहुताश[४]। कीं ते पद्महस्ती[५] विशेष। भवरोगा वैद्य होती ॥५१॥ कीं जीव पावे पदासी। ऐसा मुहूर्त देणार ज्योतिषी। कीं ते पंचाक्षरी स्वप्रतापेंसीं। पंचभूतांसी पळविती जे ॥५२॥ कीं ते दैवी संपत्तीनें भाग्यवंत। मुमुक्षूंसी करिती दरिद्ररहित। कीं ते दयेचीं अद्‌भुत। गोपुरें काय उंचावलीं ॥५३॥ संत श्रोते चतुर पंडित। माझें बोलणें आरुष[६] अत्यंत। जैसा सरस्वतीपुढें मूढ बहुत। वाग्विलास दावीतसे ॥५४॥ सूर्यापुढें जैसा दीप देख। कीं जान्हवीस न्हाणा थिल्लरोदक। कीं कनकाद्री जो अति सुरेख। त्यासी अलंकार पितळेचे ॥५५॥ कामधेनूस अर्पिलें अजाक्षीर[७]। चंद्रासी शीतळ करी रंभापुत्र। कल्पतरु कल्पिलें देणार। त्यासी निंबोळ्या समर्पिल्या ॥५६॥ रत्नाकरास[८] काच समर्पिली। तैसी माझी ही आरुष बोली। परी तुह्मी प्रीति बहु ठेविली। प्राकृत शब्दीं नवल हें ॥५७॥ विष्णूसी भूषणें अपार। परी तुलसीवरी आवडी थोर। कीं पार्वतीपतीस बिल्वपत्र। भक्तीं वाहतां आवडे ॥५८॥ रायें दासीस पाठीं घालितां। तिची सर्वांवरी चाले सत्ता। अल्प मोलाचे अळंकार लेतां। जनां समस्तां थोर दिसे ॥५९॥ म्हणोनि तुम्ही संत प्रभु थोर। तुमचा महिमा न वर्णवे अपार। मोटेंत बांधवेल समीर। चरणीं अंबर क्रमवेल पैं ॥६०॥ गणवतील पृथ्वीचे रज:कण। मोजवेल सिंधूचें[९] जीवन[१०]। कनकाद्रीचा चेंडू करून। उडविजेल सर्वथा ॥६१॥ भोगींद्रमस्तकींचा[११] मणी। आणवेल एकादे क्षणीं। सूर्य जातां धरवेल गगनीं। नक्षत्रें गुणीं ओंविजेतील ॥६२॥ काढवेल शशिमंडळींचें[१२] अमृत। मोडवतील ऐरावतीचे दांत। कीं दिग्गज आणोन समस्त। एके ठायीं बांधिजेतील ॥६३॥ तुरंग करूनि प्रभंजन[१३]। करवेल सर्वत्रीं गमन। परी न कळे संतांचें महिमान। जे ब्रह्मानंदें पूर्ण सदा ॥६४॥ तों संत बोलती आनंदघन। मन निवालें तव बोल ऐकून। आम्हीं इच्छितों रामकथाश्रवण। वरी दृष्टांत गोड तुझे ॥६५॥ मेरू सुंदर रत्नेंकरून। कीं नक्षत्रें मंडित गगन। कीं वृक्ष फळीं परिपूर्ण। तैसा दृष्टांतें ग्रंथ शोभे ॥६६॥ कीं शांति क्षमा दया विशेष। तेणें मंडित सत्पुरुष। कीं परिवारासहित नरेश। दृष्टांत सुरस ग्रंथीं तैसे ॥६७॥ आधींच भूक लागली बहुत। त्याहीवरी वाढिलें पंचामृत। कीं दुर्बळासी अकस्मात। कल्पतरू भेटला ॥६८॥ कन्यार्थी हिंडतां भूमंडळ। त्यासी राजकन्या घाली माळ। कीं रोगियासी रसायन[१४] निर्मळ। अकस्मात जोडलें ॥६९॥ आतां बहु टाकोनि शब्दजाळ। बोलें रामकथा रसाळ। जैसी सिकता सांडोनि मराळ[१५]। मुक्ताफळेंचि सेविती ॥७०॥ कीं कोशगृहीं प्रवेशोनी। भांडारी रत्नें काढी निवडोनी। कीं दोष टाकून सज्जनीं। उत्तम गुण स्वीकारिजे ॥७१॥ ऐसे संतांचे बोल परिकर। ऐकोनि ब्रह्मानंदें श्रीधर। साष्टांग घालोनि नमस्कार। म्हणे सादर परिसिजे ॥७२॥ असंभाव्य श्रीरामचरित्र। शतकोटि ग्रंथ सविस्तर। वाल्मीक बोलिला अपार। कथासमुद्र अगम्य ॥७३॥

---

१. सिंह २. ज्ञानरूपी आकाशातील ३. रवी, सूर्य ४. अविद्यारूपी अरण्य नष्ट करणारा अग्नी ५. कमल हातात असणारे श्रीविष्णू ६. अव्यवस्थित ७. शेळीचे दूध ८. सागराला ९. समुद्राचे १०. पाणी ११. शेषाच्या माथ्यावरील १२. चंद्रमंडलातून १३. सोसाट्याचा वारा १४. औषध १५. हंस

जो सत्यवतीहृदयरत्न[१] । कथी जगद्गुरू पराशरनंदन[१] । तें व्यासोक्त रामायण । कोणा संपूर्ण न वर्णवे ।।७४।। वसिष्ठें कथिलें निश्चितीं । तें वासिष्ठरामायण म्हणती । शुकें कथिलें नाना रीतीं । शुकरामायण बोलती तया ।।७५।। जो अंजनीहृदयारविंदभ्रमर । तेणें पाहोन श्रीरामचरित्र । कथिलें नाटकरामायण साचार । अपार चरित्र निजमुखें ।।७६।। जो परमविश्वासें श्रीरामासी शरण । शक्रारिजनकबंधू[२] बिभीषण । तेणें रामचरित्र कथिलें पूर्ण । बिभीषणरामायण म्हणती तया ।।७७।। कमलोद्भव विष्णुसुत । तेणें नारदासी कथिलें हें चरित्र । तें ब्रह्मरामायण अद्भुत । उमेसी सांगत शिव रामायण ।।७८।। जो कलशोद्भव[३] महामुनी । जेणें जलधि आटिला आचमनेंकरूनी । तेणें रामकथा ठेविली विस्तारोनी । अगस्तिरामायण म्हणती तया ।।७९।। भोगींद्र कथी सर्पांप्रती । तें शेषरामायण बोलिजे पंडितीं । अध्यात्मरामायण समस्तीं । ऋषींनीं निवडून काढिलें ।।८०।। एक शेषरामायण सत्य । आगमरामायण एक बोलत । कूर्मरामायण यथार्थ । कूर्मपुराणीं बोलिलें ।।८१।। स्कंदरामायण अपार । एक पौलस्तिरामायण परिकर । कालिकाखंडीं सविस्तर । रामकथा कथियेली ।।८२।। रविअरुणसंवाद । तें अरुणरामायण प्रसिद्ध । पद्मपुराणीं अगाध । पद्मरामायण कथियेलें ।।८३।। भरतरामायण चांगलें । एक धर्मरामायण बोलिलें । आश्चर्यरामायण कथिलें । बकदाल्भ्यऋषीप्रती ।।८४।। मुळापासून इतुक्या कथा । कैशा वर्णवतील तत्त्वतां । त्यांमाजी वाल्मीकिनाटकाधारें कथा । रामविजयालागीं कथूं ।।८५।। समस्त कवींस नमस्कार । जो जगद्गुरू आचार्य श्रीशंकर । जेणें मतें उच्छेदोन समग्र । शुद्ध मार्ग वाढविला ।।८६।। पूर्वी एक सत्यवतीकुमर[१] । तैसाचि कलियुगीं श्रीशंकर । जो ज्ञानाचा सागर । जगदुद्धार केला जेणें ।।८७।। सकळ मतें उच्छेदून । सन्मार्ग वाढविला पूर्ण । सकळ मतवादी जंबूक[५] जाण । शंकरसिंह[६] गर्जतसे ।।८८।। सकळ मतवादी दरिद्री । शंकर श्रीमंत पृथ्वीवरी । संन्यासदीक्षा निर्धारीं । स्थापिली जेणें विधियुक्त ।।८९।। अवघे मतवादी रजनीचर[७] । शंकर त्यांवरी रघुवीर । कीं कौरव वधावया यादवेंद्र[८] । अति उदित साक्षेपें ।।९०।। तैसा श्रीशंकराचार्य सकळ । कुमतें[९] छेदी तात्काळ । त्या आचार्याचें पदकमळ । श्रीधरभ्रमरें वंदिलें ।।९१।। जो श्रीधराचार्य टीकाकार । त्यासी नमस्कारी श्रीधर । मधुसूदनादिक कवींद्र । ग्रंथ अपार जयांचे ।।९२।। जो श्रृंगारवनींचा[१०] विहंगम जाण । जो जयदेव पद्मावतीरमण । त्याची काव्यकला पाहून । पंडितजन तटस्थ ।।९३।। जो वेदांतक्षीरार्णवींचा[११] मीन । जेणें विवेकसिंधु रचिला पूर्ण । तो मुकुंदराज गुणनिधान । तयाचे चरण वंदिले ।।९४।। तारावया जन समग्र । पुन: अवतरला रमावर[१२] । गीतार्थ केला साचार । तो ज्ञानेश्वर जगद्गुरू ।।९५।। जो भानुदासकुलभूषण । प्रतिष्ठानवासी परिपूर्ण । त्या एकनाथें ग्रंथ संपूर्ण । बहुसाल कथियेले ।।९६।। जे चातुर्यराजधानीचे[१३] कळस[१४] । मुक्तेश्वर मुद्गलदास । ज्यांचे ग्रंथ पाहतां सुरस । ब्रह्मानंद उचंबळे ।।९७।। जैसा चंडांशु[१५] सतेज व्योमीं । तैसाचि केवळ वामनस्वामी । ज्याची श्लोकरचना या भूमी- । मंडळावरी अपूर्व ।।९८।। कृष्णदास जयराम । जो शांतिदयेचें निजधाम । ज्याचे ग्रंथ ज्ञानभरित परम । जो नि:सीम ब्रह्मचारी ।।९९।।

१. श्री वेदव्यास २. रावणाचा भाऊ ३. अगस्ती ऋषी ४. आद्य शंकराचार्य ५. कोल्हा ६. शंकराचार्यरूपी सिंह ७. राक्षस ८. श्रीकृष्ण ९. पाखंडी मते १०. श्रृंगाररसरूपी वनातील पक्षी म्हणजे कवी जयदेव ११. वेदान्तसागरातील मासा (आद्य कवी मुकुंदराज) १२. श्री विष्णू १३. चातुर्य हीच जणू राजधानी १४. शिखर १५. रवी

श्रीरामउपासक निर्मळ । जो भक्तिसरोवरींचा मराळ । तो रामदास महाराज केवळ । भक्ति प्रबळ लावी जनां ॥१००॥ ब्रह्मानंदस्वामीचा बंधु सत्य । नाम तयाचें श्रीरंगनाथ । ज्याची कविता समस्त । ऐकतां जन उद्धरले ॥१॥ असो आतां समस्त कविवर । अवघे ब्रह्मानंदरूप साचार । त्यांसी अनन्यशरण श्रीधर । द्यावा वर ग्रंथासी ॥२॥ रविकुळीं अवतरोनि श्रीरघुवीर । कैसें केलें लीलाचरित्र । धन्य त्या वाल्मीकाचें वक्त्र । कथा अपार बोलिला ॥३॥ हें वर्णितां श्रीरामचरित्र । तरला वाल्मीक साचार । पापें आचरला अपार । ऐका सादर गोष्टी ते ॥४॥ वाल्मीक पूर्वी द्विजसुत[१] । त्यजोनि आचार यज्ञोपवीत । किरातसंगें वाट पाडित । अति उन्मत्त विषयांध ॥५॥ महा दुर्धर कानन । देखतां भयभीत होय मन । पर्वतदरीमाजी स्थळ करून । सहपरिवारें वसे तेथें ॥६॥ भोंवतें द्वादश गांवेंपर्यंत । पाळती राखोनि वाट[२] पाडित[२] । केल्या ब्रह्महत्या असंख्यात । नाहीं गणती इतर जीवां ॥७॥ मत्स्य धरावयालागीं बक । बैसे होऊनियां सात्त्विक । कीं मूषकालागीं बिडालक[३] । बैसे टपत जयापरी ॥८॥ कीं अंगसंकोचें[४] पारधी । जपोनि[५] तत्काळ मृग साधी । तैसा वाल्हा जीव वधी । पापनिधि निर्दय ॥९॥ अपार जीव मारिले । पापाचे पर्वत सांचले । जैसे अंत्यजगृहाभोंवते पडिले । ढीग बहुत अस्थींचे ॥११०॥ ऐसें करितां पापाचरण । तयासी आलें वृद्धपण । पुत्र झाले अति दारुण । तरी आंगवण[६] न सोडी ॥११॥ शस्त्र हातीं घेऊनि वाल्हा । मार्ग रक्षीत जों बैसला । तों अकस्मात नारद प्रगटला । पूर्वपुण्येंकरूनियां ॥१२॥ चंद्रा वेष्टित नक्षत्रें जैसीं । भोंवतीं ऋषींची मांदी तैसी । तों पाळती[७] सांगती वाल्हियासी । जाती तापसी बहुसाल[८] ॥१३॥ वाटेसी धांवोन आडवा आला । शस्त्र उभारोनि ते वेळां । दटावोनि ऋषींचा मेळा । उभा केला क्षणभरी ॥१४॥ कीं स्वर्गपंथें जातां नेटें । जैसी यमपुरी लागे वाटे । कीं तपें आचरतां उद्धटें । कामक्रोध अडविती ॥१५॥ असो वाल्हा म्हणे तयांसी । मात्रा[९] आणा रे मजपासीं । नाहीं तरी मुकाल प्राणांसी । माझिया हस्तें या काळीं ॥१६॥ मग पुढें होऊन ब्रह्मनंदन । म्हणे ऐक एक आमुचें वचन । तुज आलें वृद्धपण । पापें अपार घडलीं कीं ॥१७॥ द्रव्य जोडिलें त्वां अपार । जहाले दुष्कृताचे संभार । तुझे पापासी वांटेकर । कोण आहेत हें विचारीं ॥१८॥ तुझें आलें जवळी मरण । यम जेव्हां गांजील दारुण । तेव्हां तुजला सोडवील कोण । पाहें विचारून अंतरीं ॥१९॥ दारा पुत्र धन यौवन । बंधु सेवक आप्त स्वजन । शस्त्रें अस्त्रें चतुरंग सैन्य । नये कामा ते वेळे ॥१२०॥ जीं जीं कर्में प्राणी करिती । तितुकीं देव सर्व विलोकिती । सकळ तत्त्वें व्यापून वर्तती । मग साक्ष देती परत्रीं ते ॥२१॥ यमपुरीस चित्रगुप्त । पत्रें काढूनि वाचित । मग त्यासारिखा दंड करीत । कोण तेथें सोडवील ॥२२॥ जो पुण्यपंथें न चाले नर । निंदी तीर्थयात्रा समग्र । त्यास ताम्रभूमी[१०] तप्त अपार । तीवरी चालविती हळुहळू ॥२३॥ जे परोपकार न करिती । त्यांसी असिपत्रावरी[११] हिंडविती । इकडून तिकडे शस्त्रें टोंचिती । कोण सोडवील ते स्थानीं ॥२४॥ तप्त लोहाचा स्तंभ दारुण । त्यासी भेटविती नेऊन । देवद्विजां[१२] जो न करी नमन । त्यासी जाण हीच गती ॥२५॥ जो संतांसी देखों न शके अपवित्र । त्याचे रागें गीध फोडिती नेत्र । जो कीर्तन स्मरण न करी अणुमात्र । जिव्हा तोडिती सांडसें ॥२६॥

१. ब्राह्मणाचा मुलगा २. वाटमारी करणे ३. मांजर ४. शरीराचा संकोच करून ५. टपून ६. सवय ७. पाळती ठेवण्यासाठी सोबती ८. अनेक ९. द्रव्य किंमती वस्तू १०. तांब्याच्या पत्र्याची जमीन ११. तलवारीच्या धारेवर १२. देव व ब्राह्मणांना

गुरु देव ब्राह्मण सांडूनी । जो षड्रस सेवी पापखाणी । महानरकींचे दुर्गंधपाणी । तयाचे वदनीं ओतिती ॥२७॥ जो तीर्थस्नान निंदी खळ । त्यासी तप्त कढयीमाजी जें तैल । त्यांत तळिती तत्काळ । कोण सोडवील तेथें पैं ॥२८॥ जे साधुसंतांसी पीडिती । त्यांचे अंगाचीं सालें काढिती । जे गुरु द्विज तीर्थें अव्हेरिती । त्यांचे तोंडी घालिती नरकमूत्र ॥२९॥ धर्मवाट[१] रोधोनि हरिती जे धन । त्यांसी कुंभीपाकीं[२] घालून । खालीं चेतविती कृशान[३]। माजी आक्रंदोनी चडफडती ॥१३०॥ लोहदंड करूनि तप्त । कानीं खोंविती यमदूत । जो नायके हरिकथामृत । गति निश्चित तयासी ॥॥३१॥ ऐसें बोलतां नारदऋषी । अनुताप जाहला त्याचे मानसीं । वेगें आला निजसदनासी[४] । स्त्रीसुतादिकांसी पुसत ॥३२॥ पापें घडलीं मजलागीं । कोणी होतां काय विभागी । तंव तीं म्हणती आमुचे अंगीं । न लागती पापें सर्वथा हीं ॥३३॥ आम्ही भाग्याचे वांटेकरी यथार्थ । पापें तुझी तूं भोगीं समस्त । वाल्हा झाला सद्गदित । म्हणे कैसें आतां करावें ॥३४॥ हा नरदेह उत्तम पूर्ण । केवळ भगवत्प्राप्तीचें कारण । म्यां आत्महित न करून । बुडालों कीं अधोगती ॥३५॥ पुण्यक्षेत्र[५] सरसाविलें[६] । तेथें कनकबीज[७] पेरिलें । कनकाचें ताट घडिलें । त्यात वाढिलें तृणबीज ॥३६॥ सुधारसकुंभ[८] दैवें जोडला । तो नेऊन उकिरडां ओतिला । चिंतामणी फोडून घातला । पायरीस अभाग्यें ॥३७॥ सुरभी[९] शोधीत आली घर । तिसी मारूनि काष्ठप्रहार । अभाग्यें घातली बाहेर । तोच प्रकार मज जाहला ॥३८॥ बळें कल्पवृक्ष तोडून । वाढविलें कंटकवन । राजहंस दवडून । दिवाभीत[१०] पाळिलें ॥३९॥ रंभा तोडूनि महामूर्खें । अर्की वाढविल्या सकौतुकें । ओसंडोनि सतेज मुक्तें । सिकताहरळ[११] भरियेली ॥१४०॥ असो ऐसा अनुतापें वाल्हा । नारदापासीं परतोन आला । सद्गद कंठ अश्रु डोळां । साष्टांग घातला नमस्कार ॥४१॥ तनुमनधनेंसीं अनन्य । स्वामी तुज मी आलों शरण । तूं कृपेची नौका करून । तारीं मज सागरीं ॥४२॥ महाराज तूं धन्वंतरी । माझा भवरोग दूर करीं । जळतों या वणव्याभीतरी । मेघा झडकरी वर्षें तूं ॥४३॥ पडलों मायेचे मेळीं । पंचभूतें मज झोंबलीं । वासनाविवशी[१२] गळां पडली । कदाकाळीं सोडीना ॥४४॥ अहंदेहबुद्धि[१३] डांकीण । ममता सटवी दारुण । लोभ झोटिंग एक क्षण । मज उमज घेऊं नेदी ॥४५॥ क्रोध महिषासुर दारुण । कामवेताळें[१४] झडपिलें पूर्ण । तृष्णा मायराणी[१५] अनुदिन । सर्वदाही न सोडी ॥४६॥ जाहलों मी अत्यंत क्षीण । पंचाक्षरी[१६] तूं ब्रह्मनंदन । सकल भूतें टाकीं झाडून । म्हणोनि चरण धरियेले ॥४७॥ अष्टभावें[१७] जाहला सद्गदित । मग मनीं विचारी ब्रह्मसुत[१८] । रोग पाहूनि वैद्य निश्चित । दिव्य मात्रा काढी जेवीं ॥४८॥ म्हणे हा अनधिकारी परम । 'मरा' ऐसें सांगे नाम । म्हणे हेंचि तूं जपें सप्रेम । मुख्य वर्म जाण पां ॥४९॥ तें जीवन नाम जपत । तेथेंचि बैसला ध्यानस्थ । अंगावरी वारुळ वाढत । ध्वनि उमटत आंतोनि ॥१५०॥ टोणपियाचा वृक्ष जाहला । तों नारद बहुकाळें पातला । त्या तरुवराखालीं उभा राहिला । श्रवणीं ऐकिला नामघोष ॥५१॥ वारुळाचे छिद्रांमधुनी । रामनामाची मधुरध्वनी । चातुर्यसमुद्र नारदमुनी । जाणिलें मनी वृत्त सर्व ॥५२॥

१. न्याय्य मार्ग २. एका नरकाचे नाव ३. अग्नी ४. स्वत:चे घरी ५. पुण्यभूमी ६. पेरणीसाठी तयार केली ७. धोतऱ्याचे बी ८. अमृतघट ९. कामधेनू १०. घुबड ११. वाळूचे खडे १२. वासनारूपी राक्षसी १३. देहाविषयी ममत्व १४. कामवासनारूपी वेताळ १५. पिशाची १६. मांत्रिक १७. भक्तीमुळे शरीरात उमटणारे सात्विक भाव १८. नारद

मग उकरोनियां वारुळ । बाहेर काढिला तो पुण्यशील । वर्मकळा[१] रगडून तत्काळ । सावध केला तेधवां ॥५३॥ जैसा भूमीवरी अर्क उतरला । तैसा श्रीगुरु नारद देखिला । धांवोनि चरणकमळा लागला । पापाचा जाहला संहार ॥५४॥ नाम जपतां श्रीरामाचें । दोष गेले अनंत जन्मांचे । जैसे पर्वत तृणाचे । अग्निसंगें भस्म होती ॥५५॥ पापें जाळावया समस्त । नामामाजी प्रताप बहुत । नामाचेनि न जळे निश्चित । ऐसें पाप नसेचि ॥५६॥ वाल्मीकें केली जीं पापें । तीं भस्म जाहलीं नामप्रतापें । नामापुढें अनेक तपें । तुच्छ ऐसें जाणिजे ॥५७॥ जैसा पर्वत होतां संदीप्त । मृगद्विजगण[२] न राहती तेथ । तैसीं नामाग्नीपुढें समस्त । पापारण्यें भस्म होती ॥५८॥ जैसीं स्वप्नीं घडलीं दुष्कृतें बहुत । तीं जागृतीं अवघीं मिथ्याभूत[३] । तैसे रामनामें समस्त । पापसमूह भस्म होती ॥५९॥ तोंवरी तमाची दाटणी । जों नुगवे वासरमणी[४] । तोंवरीच मद कीजे वारणीं[५] । जोंवरी सिंह नाहीं देखिला ॥१६०॥ सिंधु गर्जे तोंवरीच पाहीं । जों कलशोद्भव देखिला नाहीं । तोंवरी भूतांची परम घाई । जों मंत्रवादी न देखिला ॥६१॥ तोंवरीच पापांचा संभार । जों नामीं न धरी आदर । नामप्रताप अद्‌भुत थोर । तरला साचार वाल्मीक ॥६२॥ असो वाल्मीक म्हणे गुरुनाथा । जरी कृपा कराल सर्वथा । तरी रामचरित्रकथा । सविस्तर करीन मी ॥६३॥ ऐसें ऐकतां नारदमुनी । परम संतोषला अंतःकरणीं । वरद हस्त ठेवोनियां मूर्ध्नीं[६] । वदला तें श्रवणीं आकर्णिजे ॥६४॥ सहस्र वरुषांवरी । विष्णु अवतरेल दशरथउदरीं । तयाचें तूं भाष्य करीं । शतकोटी सविस्तर ॥६५॥ जन्मकर्मलीला[७] सर्व । जे जे तूं वदसील भाव । तैसाच वर्तेल राघव । अवतारठेव अभिनव पैं ॥६६॥ शतकोटी ग्रंथ वाल्मीकें निर्मिला । सुरस रस दिव्य ओतिला । तिहीं लोकांसी कलह लागला । व्यवहार[८] गेला शिवापाशीं ॥६७॥ परम चतुर कैलासनाथ । तीं ठायीं समान वांटिला ग्रंथ । शेवटीं दोन अक्षरें उरली यथार्थ । कंठीं धरिलीं उमावरें ॥६८॥ शीतळ उपचार पूर्वीं केले । परी ते नाहीं सफळ जाहले । चंद्रबिंब शिरीं धरिलें । जटेंत आकळिलें गंगेसी ॥६९॥ हिमनगकन्या[९] शीतळ सुंदर । अर्धांगी धरी कर्पूरगौर । ठायीं ठायीं वेष्टिले फणिवर[१०] । शीतळ थोर म्हणोनियां ॥१७०॥ गजचर्म अत्यंत शीतळ । तेंही पांघरे जाश्वनीळ[११] । परी न राहे हाळाहळ[१२] । जाळी प्रबळ अधिकचि ॥७१॥ मग हा ग्रंथ निवडितां थोर । दोन अक्षरें निवडिलीं साचार । तीं कंठीं धरितांचि उमावर । शीतळ शरीर जाहलें ॥७२॥ हृदयीं आठविला रघूत्तम । मुखीं स्मरतां रामनाम । मध्यें हळाहळ परम । भयभीत जाहलें ॥७३॥ मुखीं नाम हृदयीं राम । दाहकत्व सांडूनि जाहलें शम । भूषणरूप होऊनि परम । शिवकंठीं मिरवलें ॥७४॥ नामें तरला वाल्मीक । नामें तरले ब्रह्मादिक । शीतळ जाहला कैलासनायक[१३]। महिमा अद्‌भुत न वर्णवे ॥७५॥ किती गोड म्हणावा सुधारस । किती वाड[१४] म्हणावें आकाश । तेजस्वी परम चंडांश । किती म्हणोनि वर्णावा ॥७६॥ पृथ्वीस उपमा काय द्यावी । पाताळखोली किती सांगावी । कनकाद्रीची[१५] उंची किती वर्णावी । तैसी नामाची पदवी अपार ॥७७॥ किती वर्णावा विष्णूचा प्रताप । काय सांगावें शंकराचें तप । तैसा रामनाममहिमा अमूप[१६] । न वर्णवेचि सर्वथा ॥७८॥ प्राकृत भाषा म्हणोनी । अव्हेर न करावा पंडितजनीं । जैसीं कृष्णावेणीचीं[१७] तीरें दोन्ही । परी उदक एकचि जाणिजे ॥७९॥

१. स्नायू , सांधे, अशी स्थाने २. हरिणादी पशुपक्षी ३. आभास युक्त, खोटे ४. सूर्य ५. हत्तींनी ६. मस्तकावर ७. जन्म आणि कार्ये ८. तंटा, वाद ९. हिमालयपुत्री पार्वती १०. भुजंग ११. श्री शिव १२. विषजन्य आग १३. भगवान शंकर १४. विस्तीर्ण १५. मेरु पर्वताची १६. उपमा नसलेला १७. कृष्णा व वेणी नदी.

असो वाल्मीकें रचिला ग्रंथ । भारद्वाजाचे मुखें समस्त । असंख्य ऋषी श्रवण करीत । ब्रह्मानंदेंकरूनियां ॥१८०॥ हेचि कथा कैलासीं । शिव सांगे हैमवतीसी[1] । पाताळीं काद्रवेयकुळासी[2] । भोगींद्र सांगे हेचि कथा ॥८१॥ घटोद्भवाचे मुखें दिवसरजनी[3] । ऋषी श्रवण करिती कर्दळीवनीं । किंपुरुषखंडीं[4] स्वमुखेंकरूनी । वानरांसी सांगे हनुमंत ॥८२॥ नारदाप्रती सरसिजोद्भव[5] । सांगे रामकथा अभिनव । बदरिकाश्रमीं ऋषी सर्व । व्यासमुखें ऐकती ॥८३॥ तेचि प्राकृत भाषेंत निवाडे । श्रीधर वर्णी संतांपुढें । जैसे बाळक करी चाळे वेडे । परी आवडती जननीसी ॥८४॥ तैसे प्राकृत आणि संस्कृत । दोन्हीमाजी एकचि अर्थ । जैसा दोहीं स्त्रियांचा एक नाथ । दोन्ही हस्त एकाचेचि ॥८५॥ दोन्ही दाढा एकचि स्वर । पाहाणार एक दोन नेत्र । किंवा दोन पात्रांत पवित्र । एकचि दुग्ध घातलें ॥८६॥ जैसें त्रिवेणीचे[6] भरलें उदक । दोन पात्रीं गोडी एक । एक सुवर्णकूपिका अलोलिक । एक ताम्रधातूची घडियेली ॥८७॥ दोन्ही कुपिका नेऊनि देख । रामेश्वरासी केला अभिषेक । दोन्ही धातु परी उदक एक । देवासी समचि आवडती ॥८८॥ अबळां न कळे संस्कृतवाणी । जैसें आडांतील निर्मळ पाणी । परी दोरपात्रावाचोनी । अशक्त जनां केवीं निघे ॥८९॥ तों तडागासी[7] येतां त्वरें । तत्कालेंचि तृषा हरे । भोळे जन तारावया ईश्वरें । प्राकृत ग्रंथ निर्मिले ॥१९०॥ मुख्य संस्कृत पाहावें । परी तें अबळां नेणवे । महागज कैसा बांधवे । कमळतंतू[8] घेऊनियां ॥९१॥ सर्वांस मान्य गीर्वाण । जरी असेल पूर्वपुण्य । तरीच तेथींचें होय ज्ञान । आबालजन केवीं तरती ॥९२॥ उत्तम वस्त्रें लेत नृपती । तीं दुर्बळांसी प्राप्त न होती । मग ते घोंगडीच पांघरती । शीतउष्ण निवारणा ॥९३॥ जैसें दधि मंथितां बहुत । त्यांतून निघे नवनीत । कीं स्वातीजळापासोन[9] अद्भुत । मुक्ताफळें[10] निपजती ॥९४॥ कीं इक्षुदंडाचे[11] पोटीं शर्करा । रसनेस गोडी तेचि विचारा । कीं राजापासोनि राजपुत्रा । मान्यता होय बहुतचि ॥९५॥ महाराष्ट्रवचनें निश्चित । परी अत्यंत रसभरित । मधुमक्षिकांचे[12] मुखीं स्रवत । मधु सुरस जैसे कां ॥९६॥ गीर्वाण हें शशिमंडळ अद्भुत । त्याची प्रभा ही प्राकृत । संस्कृत ग्रंथ वर्णिती पंडित । अर्थ प्राकृत करिती कीं ॥९७॥ अर्कवृक्षीं[13] मधुघट[14] । जरी भरतील यथेष्ट । तरी गिरिकंदरीं करावया कष्ट । काय कारण धांवावें ॥९८॥ सिकतेमाजी दिव्य रत्न । जरी सांपडे न करितां प्रयत्न । तरी चतुरीं करावें जतन । किंवा अव्हेर करावा ॥९९॥ कष्टेंविण राज्य आलें हाता । तरी काय ओसंडावें[15] तत्त्वतां । प्राकृतभाषीं ऐकोनि कथा । लाभ श्रोतां घेइजे तेवीं ॥२००॥ मुक्ताफळांची उत्तम माळा । वरी सुगंध सुटला आगळा । तरी चतुरीं कां न घालावी गळां । अति आवडीकरोनियां ॥॥१॥ आधींच इक्षुदंड गोड । वरी आले साखरेचे घड । तैसी रघुनाथकथा सुरवाड । त्यावरी साहित्य पुरविलें ॥२॥ आतां श्रोतीं सावधान । वाल्मीकमहाराज गेले कथून । तेचि रामकथा संपूर्ण । मुळापासून ऐकिजे ॥३॥ दृष्टीं न पाहतां अवघा ग्रंथ । उगाच दोष ठेविती अकस्मात । ते शतमूर्ख जाणिजे निश्चित । नव्हती पंडित विवेकी ॥४॥ ग्रंथा नाम रामविजय । श्रवणें सदा पाविजे जय । चिंतित मनोरथ सिद्ध होय । एक आवर्तन[16] करितांचि ॥५॥ आदिपुरुष श्रीअवधूत । तोचि हा ब्रह्मानंद यथार्थ । श्रीधरवरदें अद्भुत । महिमा कोणा न वर्णवे ॥२०६॥ इति श्रीरामविजयग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकनाटकाधार[17] । सदा परिसोत भक्त चतुर । प्रथमाध्याय गोड हा ॥१॥ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ ओव्या २०७ ॥

## ॥ अध्याय पहिला समाप्त ॥

१. पार्वतीस २. सर्पकुळाला ३. रात्रंदिवस ४. वानरांचे वसतिस्थान ५. ब्रह्मदेव ६. गंगा यमुना सरस्वतीचे संगमस्थान (प्रयाग) ७. सरोवराजवळ ८. कमळाचे देठ ९. स्वाती नक्षत्रातील पावसाच्या थेंबामुळे १०. मोती ११. उसाचे १२. मधमाशांचे १३. धोतऱ्याचे झाड १४. मधाचे कलश १५. नाकारावे १६. पारायण

## ॥ अध्याय दुसरा ॥

# रावणाचा पूर्ववृत्तांत, दशरथाचा विवाह, भगवंताचा अवतार

॥ श्रीगणेशाय नमः॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः। जैसे मानससरोवरवेष्टित। मराळ दिसती शोभिवंत। तैसे श्रवणासी बैसले संत। लोचन अनंत जयांसी ॥१॥ श्रवणीं ऐकतां संतसज्जन। वाचेसी पारणें होय पूर्ण। जैसा राकाइंदु[१] विलोकून। सरितानाथ[२] उचंबळे ॥२॥ कीं वर्षाकाळीं गंगेसी पूर। कीं घन[३] गर्जतां नाचती मयूर। कीं वसंत देखोनि सुंदर। कोकिळा गर्जे आनंदें ॥३॥ कीं रवि देखतां कमलें विकासती। कीं दाता देखोनि याचक हर्षती। तैशा देखोनि संतमूर्ती। वाग्देवीस आनंद ॥४॥ जैसी इंद्रापुढें रंभा। दावी नृत्यकौतुकशोभा। तैसी देखतां संतसभा। वाग्वल्ली[४] आनंदे ॥५॥ कैसे द्यावे दृष्टांत। हें मी नेणें निश्चित। परी माझे अन्याय समस्त। संतीं पोटांत घालावे ॥६॥ शिवकंठीं हळाहळ। कीं सागरापोटीं वडवानळ। कीं सृष्टीचा भार सकळ। पाताळीं कूर्मे धरियेला ॥७॥ सकळां प्रकाश जैसा शशी। परी द्वितीयेसी लोक वाहती दशी[५]। कीं हिमनगजामातासी[६]। धत्तूरपुष्पें[७] समर्पिती ॥८॥ तैसेचि हे शब्द निश्चित। सज्जनीं हृदयीं धरिले सत्य। असो प्रथम अध्यायीं गतकथार्थ। उद्धरिला वाल्मीक नारदें ॥९॥ रामकथेचा आरंभ येथूनी। जेवीं मूळ संकीर्ण कृष्णावेणी। परी पुढें विशाळ समुद्रगामिनी[८]। जाणिजे सज्जनीं कथा तैसी ॥१०॥ कमलोद्भवापासून निश्चितीं। पुत्र जाहला त्या नाम पुलस्ती। महातपस्वी जैसा गभस्ती। चारी वेद ज्यासी मुखोद्गत ॥११॥ तृणबिंदुकन्या देववर्णी। ते पुलस्तीची जाण गृहिणी। विश्रवा नामें तिजपासोनी। पुत्र जाहला विख्यात ॥१२॥ भारद्वाजकन्या महासती। ती दिधली विश्रव्याप्रती। त्यांचे पोटीं निश्चितीं। कुबेर पुत्र जन्मला ॥१३॥ विश्रव्यापासोनि जन्म पूर्ण। म्हणोनि नाम वैश्रवण। तेणें तप करोनि दारुण। चतुरानन[९] वश केला ॥१४॥ कमलासन[९] संतोषून। पौत्रपुत्र म्हणोन। लंका पुष्पक देऊन। सागरोदरीं[१०] स्थापिला ॥१५॥ पूर्वी विधीनें लंका निर्मिली। ती दानवें बळेंचि घेतली। मागुती निर्जरीं सोडविली। मग दिधली कुबेरातें ॥१६॥ तों पाताळींचा दैत्य सुमाळी। विप्रवेषें आला भूमंडळीं। लंका देखोन तये वेळीं। मनामाजी आवेशला ॥१७॥ म्हणे हे लंका आमुची निश्चित। हा कोण येथें राज्य करीत। समाचार घेतां जाहलें श्रुत। सर्व वृत्त तयाचें ॥१८॥ कुबेर देखोन सुंदर। दैत्य करी मग विचार। याचे पित्यासी साचार। कन्या देऊं आपुली ॥१९॥ तिजपासोन जे होती सुत। तयां साह्य होऊं सर्व दैत्य। हें लंकाराज्य समस्त। हिरोन घेऊं क्षणार्ध ॥२०॥ ऐसा सुमाळी दैत्य दुर्जन। विप्रवेष अवलंबून। आला लटिकीच शांति धरून। कपटी पूर्ण दुरात्मा ॥२१॥ जैसा नटाचा वेष जाण। कीं विषाचें शीतळपण। कीं सावचोराचें[११] गोड वचन। परप्राणहरणार्थ ॥२२॥ कीं गोरियाचें[१२] गायन। कीं दांभिकाचें वरिवरी भजन। धनलुब्धाचें[१३] तत्त्वज्ञान। परधनहरणार्थ ॥२३॥ वरिवरी सुंदर इंद्रावण। किंवा बकाची शांति पूर्ण। कीं वेश्येचें मुखमंडण। कामुकमनहरणार्थ[१४] ॥२४॥

---

१. पौर्णिमेचा चंद्र २. समुद्र ३. ढग ४. वाणीरूप वेल ५. दोरा ६. श्री शंकरास ७. धोतऱ्याची फुले ८. नदी ९. ब्रह्मदेव १०. समुद्रामध्ये ११. ठकाचे १२. पारध्याचे १३. कृपण माणसाचे १४. कामी पुरुषाचे मन हरण करण्यासाठी

कीं साधुवेष धरोनि शुद्ध । यात्रेसी फिरती जैसे मैंद । कीं वाटपाडे निरंजनीं शुद्ध । सिद्ध होऊन बैसले ।।२५।। असो ऐसा सुमाळी पापराशी । तेणें आपुली कन्या कैकसी । घेऊन आला विश्रव्यापासीं । प्रार्थोनि त्यासी दिधली ।।२६।। म्हणे मी अकिंचन ब्राह्मण । एवढें घ्या जी कन्यारत्न । ऋषीनें कापट्य नेणोन । लाविलें लग्न तियेसीं ।।२७।। दैत्य गेला स्वस्थानासी । एके दिवशीं ते कैकसी । सूर्य जातां अस्ताचळासी। भोग पतीस मागत ।।२८।। जे संध्याकाळीं होय गर्भिणी । तरी महातामसी जन्मे प्राणी । तो होमकाळ साधोनी । कैकसी मागे भोगातें ।।२९।। स्वस्त्रीस भोग नेदी जरी । तरी बाळहत्या पडे त्याचे शिरीं । परी होम द्यावया दुराचारी[1] । जाऊं नेदी ऋषीतें ।।३०।। परम क्षोभोनियां ऋषी । अंगसंग केला तियेसीं । म्हणे तूं विप्रकन्या नव्हेसी । महातामसी पापरूपे ।।३१।। ब्रह्मराक्षस तुझे उदरीं । पुत्र होतील दुराचारी । येरी पतीचे चरण धरी । एक तरी सुपुत्र देइजे ।।३२।। रावण आणि कुंभकर्ण । तिसरा भक्तराज बिभीषण । तो पितृवरदानेंकरून[2] । साधु पूर्ण जन्मला ।।३३।। कुंभकर्ण जेव्हां जन्मला । मुख पसरोन टाहो फोडिला । तेणें भूगोळ थरारिला । प्रळय गमला जीवासीं ।।३४।। ताटिका शूर्पणखा भगिनी जाण । परी त्यांत रत्न बिभीषण । जैसा कागविष्ठेंत[3] अश्वत्थ[4] पावन । केवळ स्थान विष्णूचें ।।३५।। कीं वायसांत कोकिळा श्रेष्ठ केवळ । कीं शिंपीमाजी मुक्ताफळ[5] । कीं दैत्यकुळीं भजनशीळ । प्रल्हाद पूर्वी जन्मला ।।३६।। यावरी गोकर्णतीर्थीं जाऊन । तिघे करिती अनुष्ठान । रावणें आराधिला अपर्णारमण[6]। कुंभकर्णें कमलोद्भव[7] ।।३७।। श्रीविष्णूचें आराधन । करिता जाहला बिभीषण । ब्रह्मा येऊनि वरदान । देता जाहला तिघांतें ।।३८।। रावण मागे वरदान । इंद्रादिदेव संपूर्ण । यांसी बंदिशाळे रक्षीन । वर्तावे तिहीं मम आज्ञे ।।३९।। संपत्ति संतति विद्या धन । व्हावें सकळकळाप्रवीण[8] । याउपरी कुंभकर्ण । वर मागे अपेक्षित ।।४०।। तों देव जाहले उद्विग्न[9] । काय मागेल कुंभकर्ण । कीं हें चराचर भक्षीन । ऐसें वरदान मागेल काय ।।४१।। कीं गिळीन म्हणेल भूगोळ । कीं दाढे घालीन ऋषिमंडळ । मग सरस्वतीतें देव सकळ । प्रार्थिते जाहले तेधवां ।।४२।। तूं जिव्हाग्रीं वससी देवी । तरी त्या दुष्टासी भ्रांति घालावी । लोकीं सुखी राहिजे सर्वी । ऐसें वदवीं सरस्वती ।।४३।। कुंभकर्ण आधींच राक्षस । सरस्वती भ्रांति घाली विशेष । तों विधि म्हणे घटश्रोत्रास[10] । अपेक्षित माग कांहीं ।।४४।। मग बोले कुंभकर्ण । मज निद्रा दे कां संपूर्ण । अखंड करीन मी शयन । चतुरानन अवश्य म्हणे ।।४५।। तत्काळ निद्रा येऊन । पडला जैसा प्राणहीन । सुषुप्तीमाजी[11] सर्व ज्ञान । बुडोन गेलें तयाचें ।।४६।। मंदराचळ आडवा पडिला । कीं महावृक्ष उन्मळिला । निद्राभरें घोरूं लागला । तेणें दश दिशा घुमघुमिती ।।४७।। म्हैसे हस्ती श्वापदें काननीं । श्वासासरसीं प्रवेशती घ्राणीं[12] । उच्छ्वास टाकितां धरणीं । बाहेर पडती आरडत ।।४८।। निद्रा देहाची समाधि जाण । निद्रा जीवात्म्याचें आवरण[13] । कीं भ्रांतीचें विश्रांतिस्थान । कीं अज्ञान मूर्तिमंत ।।४९।। निद्रा तस्कराची[14] सहकारी । ध्याना अनुष्ठाना विघ्न करी । चातुर्य विद्या कळाकुसरी । निद्रेमाजी बुडती पैं ।।५०।। निद्रा मरणाची सांगातिणी[15] । निद्रा रात्रीची ज्येष्ठ भगिनी । निद्रा जीवाची विश्रांतिकारिणी[16] । आयुष्य हरोनि नेतसे ।।५१।।

१. दुष्ट २. वडिलांच्या वरदानामुळे ३. कावळ्याच्या विष्ठेत ४. पिंपळ ५. मोती ६. श्री शंकर ७. ब्रह्मदेव ८. सर्व कलांत प्रवीण ९. उदास १०. कुंभकर्णास ११. झोपेमध्ये १२. नाकात १३. वेष्टण १४. चोराची १५. सोबतीण १६. विश्राम देणारी

स्थूल[१] सूक्ष्म[२] कारणें[३] पाहीं । बुडोन जाती सुषुप्तिडोहीं । असो कुंभकर्णास शुद्धि नाहीं । जागा कदा नोहेचि ॥५२॥ कुंभकर्ण निद्रासागरीं । बुडोन गेला अहोरात्रीं । पिता देखोन चिंता करी । म्हणे व्यर्थ जन्म याचा ॥५३॥ मग तेणें प्रार्थिला कमळासन । मागतसे हें वरदान । षण्मास जाहलिया एक दिन । सर्वसुख भोगील ॥५४॥ मग बिभीषणासी चतुर्वक्त्र[४] । म्हणे माग इच्छित वर । तंव तो सत्त्वशीळ पवित्र । काय बोलता जाहला ॥५५॥ म्हणे सत्समागम[५] सच्छास्त्रश्रवण[६] । दया क्षमा उपरति भजन । निंदा वाद द्वेष गाळून । विष्णुचिंतन करीन मी ॥५६॥ आशा तृष्णा मनसा कल्पना । भ्रांति भुली इच्छा वासना । ममता अविद्या सांडूनि जाणा । विष्णुचिंतन करीन मी ॥५७॥ काम क्रोध मद मत्सर । मोह लोभ अहंकार । हे दूर करोनि साचार । विष्णुचिंतन करीन मी ॥५८॥ धन्य बिभीषणाची स्थिती । केवळ ओतिली सुखाची मूर्ती । कीं भक्तिरूप श्रीरामकीर्ती । विस्तारिली आधीं पुढें ॥५९॥ सूर्याआधीं उगवे अरुण । कीं ज्ञानाअगोदर भजन । कीं भजनाआधीं वैराग्य पूर्ण । तैसा बिभीषण जन्मला ॥६०॥ तपाअगोदर शुचित्व पूर्ण । कीं बोधाआधीं सत्त्वगुण । कीं सत्त्वाआधीं अद्भुत पूर्ण । पुण्य जैसें प्रगटतें ॥६१॥ कीं साक्षात्काराआधीं निजध्यास । मननाआधीं श्रवण विशेष । कीं श्रवणाआधीं सुरस । आवडी पुढें ठसावे ॥६२॥ कीं शमदमाआधीं विरक्ती । कीं आनंदाआधीं उपरती । कीं आत्मसुखाआधीं[७] शांती । पुढें जैसी ठसावे ॥६३॥ तैसा आधीं जन्मला बिभीषण । जैसें फळाअगोदर सुमन[८] । विधि संतोषला ऐकोन । म्हणे वंश धन्य याचेनि ॥६४॥ रामउपासक जे संत । तयांचीं लक्षणें हींच निश्चित । अमानित्व[९] अदंभित्व[१०] । अहिंसादि[११] सर्व गुण जेथें ॥६५॥ अंतरीं निग्रह करून । शांतिरसें भरले पूर्ण । आत्मस्तुति मनांतून । स्वप्नीं जयांसी नावडे ॥६६॥ दुजयाचे दोषगुणरीती । हें कधीं नावडे जयांचे चित्तीं । पराचे उत्तम गुण वानिती । न विसरती कदाही ॥६७॥ गर्व नेणती अणुमात्र । कोणासी न बोलती निष्ठुर । आपुली निंदा ऐकतां साचार । तिरस्कार नुपजेचि ॥६८॥ जैसे मेघ क्षारजळ प्राशिती । परी पृथ्वीवरी गोड वर्षती । धेनु तृण भक्षोनि देती । क्षीर अमृतासारिखें ॥६९॥ इक्षुदंडासी घालिती खत । तरी गोड होय रसभरित । गंगा पाप जाळूनि पुण्य देत । तैसे संत जाणावे ॥७०॥ परिस लोहकाळिमा झाकोन । तत्काळचि करी सुवर्ण । तैसेचि महाराज सज्जन । परदोष लपविती ॥७१॥ जैसी कुळवंत कामिनी । अवयव झांकी क्षणोक्षणीं । तैसें आपुलें सुकृत[१२] झांकोनी । सज्जन ठेविती ॥७२॥ असो सर्वलक्षणयुक्त । बिभीषण परम भक्त । तयासी विष्णुनाभ[४] सत्य । वर देता जाहला ॥७३॥ विरिंचि[४] म्हणे साचार । तुज भेटेल श्रीरघुवीर । तो चिरंजीव करील निर्धार । शशी मित्र असती जों ॥७४॥ रावण कुंभकर्ण ते वेळे । मेळविती राक्षसदळें । प्रहस्त महोदर पातले । प्रधान जाहले रावणाचे ॥७५॥ विद्युज्जिव्ह जंबुमाळी । वज्रदंष्ट्र विरूपाक्ष बळी । खर दूषण त्रिशिरा सकळी । विद्युन्माली माल्यवंत ॥७६॥ मत्त महामत्त युद्धोन्मत्त । शुक सारण दुर्धर समस्त । बळ महाबळ धांवत । रावणा वेष्टित सर्वही ॥७७॥ सकळ दळभार घेऊन । लंकेवरी गेला रावण । कदा नाटोपे वैश्रवण । बहुत युद्ध करितां पैं ॥७८॥ मग रावणें काय केलें । पितयाचें पत्र आणिलें । कुबेरासी पाठविलें । येरें वंदिलें मस्तकीं ॥७९॥

१. जडदेह २. वासनादेह ३. कारणदेह ४. ब्रह्मदेव ५. संतांचा सहवास ६. उत्तम शास्त्राचे श्रवण ७. निजानंदाआधी ८. फूल ९. मानाची अपेक्षा नसणे १०. खोटा आव आणीत नाही ११. हिंसा करीत नाही १२. पुण्यकर्म

उकलोनि वाची वैश्रवण । आंत लिहिलें वर्तमान । तुझा सापत्नबंधु[१] रावण । लंकाभुवन दीजे ॥८०॥ पितृआज्ञा[२] तें वेदवचन । मानोनि निघाला वैश्रवण । सकळ संपत्ति पुष्पकीं घालोन । विरिंचीपासीं गेला पैं ॥८१॥ मग कनकाद्रीचे[३] पाठारीं । निर्मूनि अलकावती पुरी । कुबेर तेथें अवसरीं । विष्णुसुतें[४] स्थापिला ॥८२॥ मयासुर मंदोदरी आणि शक्ती । देता जाहला रावणाप्रती । दीर्घज्वाळा बळीची पौत्री । ती दिधली कुंभकर्णा ॥८३॥ सरमानामें गंधर्वकन्या । ते दिधली बिभीषणा । सकळ भूप शरण रावणा । लंकेसी येती भयेंचि ॥८४॥ रावणें सर्व देश जिंकिले । गाईब्राह्मणांसी धरोनि बळें । मुखीं घालोनियां सगळे । दाढेखालीं रगडित ॥८५॥ कोठें लपावया नाही स्थान । सापडती तेथें भक्षी जाण । मग कुबेरें स्वर्गींहून । सांगोनि पाठविलें रावणा ॥८६॥ कुबेरसेवक बोले वचन । तुम्ही ऋषिपुत्र वेदसंपन्न । टाकिलीं वेदांची खंडें करून । शास्त्रज्ञान नसे तुम्हां ॥८७॥ आम्ही जाणते बा सर्व सृष्टीं । ऐसा अभिमान वाहतां पोटीं । गोब्राह्मण देखतां दृष्टीं । मारितां हा अधर्म ॥८८॥ समजोनियां शास्त्रार्थ । मग कर्में करणें अनुचित । त्यासी ऐहिक ना परमार्थ । भोगील अनर्थ अनेक तो ॥८९॥ अवलक्षणी[५] कुरूप देख । दर्पणी[६] न पाहे आपुलें मुख । तोंवरीच अभिमान अधिक । स्वस्वरूपाचा वाहतसे ॥९०॥ तैसे दोष आचरती । मग धर्मशास्त्र विलोकिती । परी वीट न मानिती चित्तीं । नवलरीति हे वाटे ॥९१॥ ऐसें बोलतां कुबेरदूत । रावण क्रोधावला अद्‌भुत । व्याघ्रमुखीं[७] मुष्टिघात[८] । ताडितां जेवीं खवळे पैं ॥९२॥ ऐसा सक्रोधे रावण । सकळ दळभार सिद्ध करून । रात्रीमाजीं जाऊन । घाला कुबेरावरी घातला ॥९३॥ पदीं ताडितां महाउरग[९] । कीं शुंडा पिळितां मातंग[१०] । कीं घृतें शिंपितां सवेग । पावक[११] जैसा खवळे पैं ॥९४॥ तैसा परम क्रोधावला रावण । त्यांत केलें मद्यपान । सर्व द्रव्य हिरोन । कुबेराचें घेतलें ॥९५॥ गज रथ आणि पुष्पक । वस्तू हरिल्या सकळिक । मग तो कुबेर यक्षनायक[१२] । गेला शरण शक्रातें[१३] ॥९६॥ मग तो कुबेर ते वेळां । शक्रें कोशगृहीं[१४] ठेविला । असो रावणासी पुत्र जाहला । मेघनाद प्रथमचि ॥९७॥ एक लक्ष पुत्रसंतती । सवा लक्ष पौत्रोत्पत्ती । ऐंशीं सहस्र युवती । भोगितां रावण न धाये ॥९८॥ अठरा क्षोणी[१५] वाजंत्री । गर्जताती अहोरात्रीं । पृथ्वीचे भूप महाद्वारीं । कर जोडूनि उभे सदा ॥९९॥ अस्ता जातां दिनकर । कर्पूरदीपिका[१६] अठरा सहस्र । पाजळोनि सभेसमोर । निशाचर तिष्ठती ॥१००॥ इंद्राचिया भयें पर्वत । रावणासी शरण येत । शक्र[१७] आमुचे पक्ष[१८] छेदित । रक्षीं त्वरित आम्हांसी ॥१०१॥ लंकेश[१९] तयांसी अभय देत । तुम्ही गज व्हा अवघे पर्वत । समस्त अचळां मानली मात । जाहले उन्मत्त वारण[२०] ॥२॥ रावण देवांवरी चालिला । मेघनादें इंद्र ते वेळां । ऐरावतासगट पाडिला । निजबळें रणांगणीं ॥३॥ ऐसा सतरा वेळां सहस्रनेत्र । जिंकी मंदोदरीचा पुत्र । मग इंद्रजित नाम थोर । ब्रीद ते दृढ बांधिलें ॥४॥ पाश घालोनि पाकशासन[१७] । इंद्रजितें आणिला बांधोन । मग विरिंचि आला धांवोन । होय प्रसन्न शक्रजिता ॥५॥ अपेक्षित देवोनि वर । सोडविला पुरंदर[१७] । मग रावणें देव समग्र । सेवेलागीं ठेविले ॥६॥ शक्रें आणावे नित्य हार । छत्र धरी रोहिणीवर[२१] । रसाधिपति[२२] निरंतर । वाहे नीर धांवतचि ॥७॥ गभस्ति[२३] होय द्वारपाळ । कुबेर आणि अनिळ[२४] । यांहीं सडासंमार्जन सकळ । गृहामाजी करावें ॥८॥

---

१. सावत्र भाऊ २. पित्याची आज्ञा ३. मेरु पर्वताच्या ४. ब्रह्मदेवाने ५. कुलक्षणी ६. आरशात ७. वाघाच्या तोंडात ८. मुठीचा ठोसा ९. मोठा साप १०. हत्ती ११. अग्नी १२. यक्षांचा मुख्य १३. इंद्राला १४. खजिन्यावर १५. प्रकारची १०. कापराचे दिवे १७. इंद्र १८. पंख १९. रावण २०. हत्ती २१. चंद्र २२. बुध २३. सूर्य २४. वायू

वस्त्रें धूत वैश्वानर[1] । पुरोहित जाहला विष्णुपुत्र[2] । पांडित्य करी अंगिराकुमर[3] । नारद तुंबर गाती सदा ॥९॥ दहावेळां पूजिला । रावण दश वक्त्रें पावला । वीस हस्त लाधला । शिवही केला वश तेणें ॥११०॥ कोणे एके समयीं रावण । पुष्पकविमानीं बैसोन । कैलासगिरि चढतां पूर्ण । तों नंदी रक्षक महाद्वारीं ॥११॥ म्हणे नको जाऊं लंकापती । शिवउमा आहेत एकांती । ऐसें ऐकतां मयजापती[4] । परम क्षोभ पावला ॥१२॥ नंदीस म्हणे ते वेळे । तुज मर्कटाचेनि बोलें । मी न राहें कदाकाळें । जाईन बळेंकरूनियां ॥१३॥ ऐसें बोलतां दशकंधर[4] । कोपला तेव्हां नंदिकेश्वर । शापशस्त्रें ताडिलें सत्वर । दशकंठासी तेधवां ॥१४॥ म्हणे उन्मत्त तूं मूढमती । तुज नर वानर रणीं वधिती । तुवां दशरुद्र पूजिले निगुती । अकरावा मारुति प्रगटेल ॥१५॥ तो वानररूपें अवतरोन । करील तुझें गर्वमोचन । ऐकतां क्रोधावला रावण । म्हणे हा उपडीन कैलासगिरी ॥१६॥ उचलोनियां कैलासपर्वत । लंकेत नेईन क्षणांत । म्हणोन तळीं घातला हात । समूळ उचलावयासी ॥१७॥ तें जाणोनि हिमनगजामात । निजपदें दडपिला पर्वत । सहस्र वर्षेंपर्यंत । आक्रंदत रावण ॥१८॥ मग करी शिवाचें स्तवन । प्रसन्न जाहला त्रिनयन । दशवक्त्र[4] दिधला सोडून । आला परतोन लंकेसी ॥१९॥ एकदा रेवातीरीं ध्यानस्थ । बैसला असतां मयजाकांत । पुढें सिकतालिंग[5] विराजित । तों पाणी चढत माघारें ॥१२०॥ सहस्रार्जुनें निजभुजेंकरून । कोंडिलें नर्मदेचें जीवन । ध्यान करितां रावण । आकंठपर्यंत बुडाला ॥२१॥ परम क्रोधावला दशमौळी[1] । धांवोनि आला तयाजवळी । म्हणे कोण रे तूं ये स्थळीं । रेवाजळ कोंडितोसी ॥२२॥ सहस्रार्जुनें कवळ घालून । ग्रीवेसी धरिला दशवदन । कीं मृगेंद्रें धरिला वारण । जाहले प्राण कासाविस ॥२३॥ बहुकाळ बंदीं घातला । मग पौलस्तिऋषि धांविन्नला । भिक्षा मागोनि तये वेळां । सोडविला राक्षस ॥२४॥ बळीचिया नगरा देख । बळेंच आला लंकानायक । जैसा व्याळाचे बिळीं मूषक । चारा घेऊं प्रवेशला ॥२५॥ तों बळीचिया महाद्वारीं । एक पुरुष उभा दंडधारी । जयाचिया तेजामाझारी । शशिमित्र झांकोळती ॥२६॥ तो महाराज त्रिविक्रम[6] । देखोनि बळीचें निजप्रेम । द्वारपाळ जाहला पुरुषोत्तम । अज अजित जगद्गुरू ॥२७॥ मग तयासी म्हणे रावण । बळीसी आणीं बोलावून । नाहीं तरी हे नगरी उचलोन । पालथी घालीन सागरीं ॥२८॥ मग म्हणे वैकुंठविलासी[6] । तूं बळीचा प्रताप नेणसी । आतांच येईल प्रत्ययासी । जाईं वेगेंसीं आंतौता[7] ॥२९॥ मग आंत प्रवेशला त्वरित । तों सभेसी बैसला विरोचनसुत[8] । तयासी म्हणे लंकानाथ । करावया समर पातलों मी ॥१३०॥ जैसा शुष्क तृणाचा पुतळा । धरावया आला वडवानळा । कीं वृषभ बळें माजला । खोंचूं धांवला सिंहासी ॥३१॥ व्याघ्रासी धरीन म्हणे बस्त[9] । कीं आळिका सुपर्णावरी[10] धांवत । ऐरावतीचा मोडावया दांत । शलभ[11] जैसा सरसावला ॥३२॥ वृश्चिक धांवे सत्वर । ताडावया खदिरांगार[12] । खद्योत[13] म्हणे दिवाकर । आसडून पाडीन खालता ॥३३॥ तैसा बळीप्रती रावण । सांगे आपुलें थोरपण । कीं सरस्वतीपुढें मतिमंदें येऊन । वाग्वाद आरंभिला ॥३४॥ हांसोनि बळी म्हणे ते वेळे । या वैकुंठनाथें द्वारपाळें । पूर्वीं नारसिंहरूप धरिलें । प्रल्हादभक्त रक्षावया ॥३५॥ नरसिंहगदाघायेंकरून । हिरण्यकशिपूचें कर्णभूषण । कुंडलें पडलीं उसळोन । तीं उचलोन घेईं तूं ॥३६॥

१. अग्नी २. ब्रह्मा ३. गुरु ४. रावण ५. वाळूचे लिंग ६. विष्णू ७. आत ८. बळी ९. मेंढा १०. गरुडावर ११. टोळ १२. निखारा १३. काजवा

तीं उचलों गेला दशकंधर । बळें लाविले वीसही कर । जैसा मशकासी न ढळे कुंजर[1] । तैसें जाहलें रावणा पैं ॥३७॥ निस्तेज जाहला ते वेळीं । तों बळीची राणी विंध्यावळी । सारिपाट खेळतां प्रीतिमेळीं । फासां हातींचा उसळला ॥३८॥ तों बळी म्हणे रावणासी । फांसा आणीं वेगेंसीं । परी तोही न उचले तयासी। राक्षसासी खेद वाटे॥३९॥ गदगदां हांसती दोघेंजणें। बंदीं घातले म्हणती देव याणें। येथें आला युद्धकारणें । तों फांसा यासी नुचलेचि ॥१४०॥ जाहला परम अपमान । माघारा चालिला दशवदन । तों मार्गीं बळीचे सेवकजन । त्यांणी रावण नागविला ॥४१॥ घेतली वस्त्रें शस्त्रें हिरून । मुखासी तेल मसी लावून । वीसही हस्त बांधोन । नगरामाजी हिंडविती ॥४२॥ एक अंगावरी धुळी टाकिती । एक दाढीधरोनि ओढिती । एक बळेंचि बैसविती । एक उठविती सवेंचि ॥४३॥ एक करिती शेणमार । काकुळती येत दशकंधर[2] । पळों पाहे जंव बाहेर । तंव द्वारपाळ जाऊं नेदी ॥४४॥ क्षुद्र द्वार मोरियेमधून । मस्तक घाली जंव रावण । तंव सर्वांठायीं वामन[3] । दंडावरी मारित ॥४५॥ बळीचे अश्वशाळेंत रावण । क्षुधाक्रांत हिंडे नग्न । चणे खातसे वेंचून । मागे कोरान्न घरोघरीं ॥४६॥ पोटासाठीं वाघ्या होऊन । म्हणे मी मल्हारीचा श्वान । कोठंबें[4] चोंडकें[5] काखे घेऊन । नाचोनि धान्य मेळवी ॥४७॥ तों दासींनी धरिला कौतुकें । उदक आणितां घातला काखें । तयां काकुळती येत दीनमुखें । मग सोडिती सत्वर ॥४८॥ मग विश्रवा धांवोन । बळीस भेटला येऊन । म्हणे बंदीस घातला रावण । तो भिक्षेस मज देइजे ॥४९॥ बळी बोले आण[6] वाहोन[6] । येथें कोणास नाहीं बंधन । ग्रामांत असे रावण । तो शोधोनि नेइजे ॥१५०॥ तों बळीचे अश्वशाळेंत देखिला । पिता देखोनि रडूं लागला । मग ऋषीनें वामन स्तविला । सोडवून नेला रावण ॥५१॥ परम लज्जित रावण । लंकेसी आला परतोन । मागुतीं पराक्रम धरोन । म्हणे मी जिंकीन वाळीतें ॥५२॥ तों समुद्रतीरीं शक्रसुत[7] । बैसला असे ध्यानस्थ । त्यासी धरावया लंकानाथ । पुष्पकांतून उतरला ॥५३॥ जैसा पंचाननापुढें[8] । मार्जार दावी आपले पवाडे । की पंडितापुढें महामूढे । वाग्वाद आरंभिला ॥५४॥ कीं रासभें[9] ब्रीद बांधोन । नारदापुढें मांडिलें गायन । कीं महाव्याघ्रावरी टवकारून[10] । जंबूक जैसा पातला ॥५५॥ तैसा वाळीपुढें उभा रावण । सावध होतां शक्रनंदन । ग्रीवेसी दशग्रीव धरोन । कक्षेमाजी दाटिला[11] ॥५६॥ चतु:समुद्रीं करोनि स्नान । किष्किंधेसी आला परतोन । अंगदाच्या पाळण्यावरी नेऊन । उफराटा रावण बांधिला ॥५७॥ क्षणक्षणां धरोनि दाढी । अंगद बाळभावें उपडी । मग विश्रवा धांवोनि तांतडी । भिक्षा मागे वाळीतें ॥५८॥ मग मुखासी काळें लावूनी । वाळीनें दिधला भिरकावूनी । लंकेंत पडिला येऊनी । खेद मनीं बहुत करी ॥५९॥ एकदा रावण पुसे विरिंचीतें । आमुचा अंत कवणाचेनि हातें । तें सत्य सांगावें आम्हातें । स्नेहचित्तेंकरूनियां[12] ॥१६०॥ विधि म्हणे अजपाळसुत । त्याचें नाम विख्यात दशरथ । त्यासी पुत्र होईल रघुनाथ । तुझा अंत त्याहातें ॥६१॥ रावणें केला मग पण । तरी मी दशरथासी वधीन । तों अजपाळपुत्राचें[13] लग्न । मांडिलें इकडे गजरेंसीं ॥६२॥ तों नारद सांगे अजपाळा । जतन करी दशरथकौसल्या । लग्नसोहळ्यामाजी घाला । घालील अकस्मात रावण ॥६३॥ ऐसें सांगता कमलोद्भवसुत[14] । मग जहाज घालोनि समुद्रांत । लग्न आरंभिलें तेथ । महागजरेंकरोनियां ॥६४॥

१. हत्ती २. रावण ३. विष्णू ४, ५. वाघ्याची झोळी वगैरे ६. शपथ घेऊन ७. वाली ८. सिंहापुढे ९. गाढवाने १०. रागाने ११. दाबला १२. प्रेमाने १३. दशरथाचे १४. नारद

सागरामाजी होतें लग्न । रावणें ही गोष्ट ऐकोन । तंव तो अष्टवर्गाचा दिन । घातला घाला रात्रींत ।।६५।। जैसे अंतरिक्षपक्षी[१] येती । तैसे राक्षस उड्या घेती । जहाज फोडोनि चूर्ण करिती । गदापर्वतघातेंचि ।।६६।। वऱ्हाड सर्व बुडविलें । रावणें कौसल्येसी घेतलें । जिचें स्वरूप न जाय वर्णिलें । तीस घातलें पेटींत ।।६७।। पेटी लंकेसी नेतां उचलोन । राक्षसें बोलविला एक मीन । तो बाहेर आला सागरांतून । त्यासी रावण आज्ञापी ।।६८।। ही पेटी करावी जतन । कोणा न द्यावी मजवांचून । लंकेंत प्रवेशला रावण । ती वस्तु जतन मत्स्य करी ।।६९।। समुद्राचे गहन[२] बेटीं । जेथें न पडे कोणाची दृष्टी । तेथें मत्स्यें ठेवूनि पेटी । गेला आपण स्वकार्या ।।१७०।। कैंचा सोहळा कैंचें लग्न । लोक समग्र गेले बुडोन । तरी दशरथ समुद्रांतून । उफाळला[३] अवचिता ।।७१।। ज्याचे पोटीं येणार श्रीराम । दुर्गम तेंचि होय सुगम । विष तें अमृत होय उत्तम । अपाय तोचि उपाय ।।७२।। तरी अंतरिक्ष चढे पांगुळ । देव जरी होय दयाळ । आंगणींच्या लता सकळ । कल्पलता होती त्या ।।७३।। दशरथ पाहे समुद्रांत । तो भंगलें जहाज अकस्मात । वाहत वाहत आलें तेथ । त्यावरी दशरथ बैसला ।।७४।। वायुवेगें जहाज गेलें । त्याच बेटासी येऊनि लागलें । दशरथें पेटी ते वेळे । सहज लीलें उघडिली ।।७५।। तों आंत कौसल्यानिधान[४] । पाहतां वेधला[५] अजनंदन[६] । तों नारद अकस्मात येऊन । उभा ठाके ते वेळीं ।।७६।। ज्यासी भूत भविष्य सर्व ज्ञान । तेणें मुहूर्तवेळा पाहून । तात्काळ दोघांसी लाविलें लग्न । विधियुक्त विधिसुतें ।।७७।। वोहरांसी[७] आशीर्वाद देत । जो वैकुंठवासी रमाकांत[८] । तो तुमचे पोटीं अवतरेल सत्य । भयभीत होऊं नका ।।७८।। दोघें पेटींत बैसवून । वेगें गेला ब्रह्मनंदन[९] । तों लंकेत दशवदन[१०] । कमळासनाप्रति[११] सांगे ।।७९।। तुवां जें भविष्य कथिलें । तें अवघेंचि असत्य झालें । जहाज फोडूनि लोक बुडविले । हिरोनि आणिलें कौसल्येसी ।।१८०।। मग बोले चतुरानन । मघांच दोघांसी लाविलें लग्न । कदा न टळे ब्रह्मवचन । कल्पांतींही दशवक्त्रा ।।८१।। येरू म्हणे जर जाहलें लग्न । तरी मी तुज इच्छित देईन । मग पेटी आणविली मत्स्यापासून । सभेमध्यें रावणें ।।८२।। त्यामाजी नवरी असे तत्त्वतां । ब्रह्मा म्हणे उघडी आतां । तों पेटी उघडूनि पाहतां । वोहरें उभयतां देखिलीं ।।८३।। परम आश्चर्य करी रावण । म्हणे खरें जाहलें ब्रह्मवचन । तरी मी या दोघांसी वधीन । शस्त्र घेऊन सरसावला ।।८४।। कौसल्या जाहली भयभीत । पतीचें वदन विलोकित । परी निर्भय वीर दशरथ । ना भी म्हणत कोसल्येतें ।।८५।। मी सूर्यवंशी महावीर । हें मशक काय दशकंधर । याचीं दाही शिरें समग्र । खंडीन आतां येथेंचि ।।८६।। मग रावणाचा हात । धरिता जाहला विष्णुसुत[१२] । म्हणे मज देईं इच्छित । माग म्हणत दशवदन ।।८७।। हीं दोघें वधूवरें आतां । मज देईं लंकानाथा । मंदोदरी[१३] म्हणे तत्त्वतां । वचन असत्य न करावें ।।८८।। गेला तरी जावो प्राण । परी असत्य न करावें वचन । यांसी वधितां येथेंचि विघ्न । उठेल दारुण आतांचि ।।८९।। बुद्धीचा प्रवर्तक भगवंत । ब्रह्मयासी म्हणे नेईं त्वरित । तेणें पेटी उचलोन अकस्मात । अयोध्येसी आणिली ।।१९०।। अयोध्येंत जाहला जयजयकार । वेगें पातला शचीवर[१४] । दशरथावरी धरी छत्र । कर्तव्य[१५] विचित्र हरीचें ।।९१।। दशरथ राज्यीं स्थापून । विधि[१२] आणि सहस्रनयन[१४] । वेगें पावले स्वस्थान । आनंदे मनीं उचंबळले ।।९२।।

---

१. आकाशातील पक्षी २. दुर्गम ३. वर आला ४. कौसल्यारूपी बहुमूल्य ठेव ५. आकृष्ट झाला ६. दशरथ ७. वधूवरांना ८. विष्णू ९. नारद १०. रावण ११. ब्रह्मदेवाला १२. ब्रह्मदेव १३. रावणाची पत्नी १४. इंद्र १५. लीला

पुष्पकीं बैसोनि जातां दशकंधर । एक देवस्त्री[1] देखिली सुंदर । तिचा बळेंचि धरिला कर । तिसीं अविचार करूं इच्छी ॥९३॥ तंव ते आक्रंदत नितंबिनी[2] । रावणें सोडिली तेचि क्षणीं । ती ब्रह्मयापासीं जाऊनी । गाऱ्हाणें सर्व सांगत ॥९४॥ रावणासी शापी सत्यलोकवासी[3] । परस्त्रीवर बलात्कार करिसी । तरी शतखंडें निश्चयेंसी । तुझे तनूचीं होतील ॥९५॥ जैसा सिंह आडांत पडिला । कीं महाव्याघ्र सांपळ्यांत सांपडला । तैसा रावण बांधला । शापपाशेंकरोनियां ॥९६॥ रावण पाप करी दारुण । गांजिले गाईब्राह्मण । पृथ्वी आक्रंदली पूर्ण । गेली शरण ब्रह्मया ॥९७॥ गाईच्या रूपें धरित्री । आक्रंदे विरिंचीच्या द्वारीं । प्रजा ऋषिगण ते अवसरीं । शरण आले विधातया ॥९८॥ विधि बाहेर आला ते क्षणीं । तों समस्त सांगती गाऱ्हाणीं । रावणें यज्ञ टाकिले मोडोनी । सत्कर्म अवनीं[4] चालेना ॥९९॥ एक म्हणे माझिया मखा । विघ्न करी नित्य ताटिका । एक म्हणे सुबाहु मारीच देखा । क्रतु[5] माझा विध्वंसिती ॥२००॥ एक सांगती ऋषीश्वर । आमुचीं कुटुंबें समग्र । कुंभकर्णें ग्रासिलीं थोर । अनर्थ मांडिला विधातया ॥१॥ त्रिदश[6] आणि पुरंदर । म्हणती बंदी पडले समग्र । कोणासी नाटोपे दशकंधर । काय विचार करावा ॥२॥ मग देव प्रजा ऋषिगण । मुख्य परमेष्ठी विष्णुनंदन । क्षीरसागरासी येऊन । अपार स्तवन मांडिलें ॥३॥ शेषशयन नारायण । कोटिसूर्यांची प्रभा पूर्ण । साठी सहस्र योजन । शेषतल्पक[7] शुभ्र तो ॥४॥ लक्षार्ध योजनें प्रमाण । वरी पहुडला श्रीभगवान । तो सच्चिदानंद रमारमण । अलंकारें मंडित ॥५॥ जे अनंत शक्तींची स्वामिनी । कमला विलसत चरणीं । जिच्या इच्छामात्रें करूनी । ब्रह्मांड हें विस्तारलें ॥६॥ एक लक्ष योजनें दैदीप्य । विराजमान मध्य मंडप । तेथींचें तेज पाहतां अमूप । मार्तंड[8] शशी[9] लोपती ॥७॥ गरुडपाचूंचे जोतें स्वयंभ । वरी हिऱ्यांचे विशाळ स्तंभ । माणिकांचीं उथाळीं[10] सुप्रभ । खालीं तोळंबे[10] हिरियांचे ॥८॥ सुवर्णाचीं तुळवटें[10] प्रचंडें । आरक्त रत्नांचे पसरिले दांडे । वरी किलच्या[10] झळकती निवाडें । गरुडपाचूंचिया साजिऱ्या ॥९॥ असो पैलतीरीं देव सकळी । उभे ठाकले बद्धांजुळी । म्हणती पूर्णब्रह्म वनमाळी । भक्तपाळका सर्वेशा ॥२१०॥ जय जय अनंतब्रह्मांडनायका । वेदवंद्या वेदपाळका । विश्वंभरा विश्वव्यापका । विश्वरक्षका जगद्गुरो ॥११॥ पुराणपुरुषा परात्परा । पंकजलोचना पयोब्धिविहारा । परमात्मया परम उदारा । भुवनसुंदरा भवहृदया[11] ॥१२॥ कर्ममोचका करुणाकरा । कैवल्यदायका कमळावरा । कर्मातीता कैटभसंहारा । कनकवसना[12] करुणाब्धी ॥१३॥ जय जय सकळदेवपाळका । जय जय सकळचित्तचाळका । निर्विकारा निरुपाधिका । निर्गुणा निश्चळा निःसंगा ॥१४॥ केशवा हरी मुरमर्दना । रमावल्लभा मधुसूदना । सकळदुरितकाननदहना । तमनाशना प्रतापसूर्या ॥१५॥ प्रळयसमुद्रीं तूं जनार्दन । विशाळ मीनरूप धरून । महादैत्य विदारून । वेदोद्धार तुवां केला ॥१६॥ परम विशाळ मंदराचळ । भेदीत चालिला पाताळ । तूं कूर्मरूप धरूनि घननीळ । पृष्ठी खालतीं दिधली ॥१७॥ हिरण्याक्ष दैत्य सबळ । कांखेसी घेऊन जातां भूमंडळ । वराहवेष तूं तमाळनीळ । दानव सकळ मर्दिले ॥१८॥ दानवबाळक प्रल्हाद । त्यास तुझा अखंड छंद । मग करूनि स्तंभभेद । प्रगटलासी नरहरी ॥१९॥ इंद्राचे कैवारें बळी । तो तुवां घातला पाताळीं । त्याचे द्वारीं तूं वनमाळी । द्वारपाळ अद्यापी ॥२२०॥

१. अप्सरा २. सुंदर स्त्री ३. ब्रह्मदेव ४. पृथ्वीवर ५. यज्ञ ६. देव ७. शेषनागाचा पलंग ८. सूर्य ९. चंद्र १०. सभामंडपाचे भाग ११. सर्वांतर्यामी १२. पिवळे वस्त्र धारण करणाऱ्या

नसतां सेना रथ सेवक । फरशधर तूं भृगुकुलतिलक[१]। तीन[२] सप्तकें[२] उर्वी नि:शंक । निक्षत्रिय केली हरी त्वां ।।२२१।। आतां रावण कुंभकर्ण असुर । इहीं त्रिभुवन पीडिलें समग्र । भक्तकैवारी तूं सर्वेश्वर । रक्षीं सत्वर दासांतें ।।२२।। तों क्षीरसागरींहूनि अद्भुत । ध्वनि उठली अकस्मात । रविकुळीं राजा दशरथ । अवतार तेथें घेतों मी ।।२३।। शेष होईल लक्ष्मण । भरत होईल पांचजन्य[३] । सुदर्शन[४] तोचि शत्रुघ्न । अवतार पूर्ण हे माझे ।।२४।। जनकराजा मिथिलापुरीं । कमळा जाईल त्याचे उदरीं । तुम्ही देव एकसरीं । वानररूपें अवतरा ।।२५।। शिव तो होईल हनुमंत । ब्रह्मा तो ऋक्ष जांबुवंत । धन्वंतरी तो सुषेण सत्य । अंगिरापति[५] तो अंगद जाणिजे ।।२६।। अदिती आणि कश्यप । तोचि कौसल्या आणि दशरथ भूप । तेथें अवतरेल चित्स्वरूप[६] । आत्माराम रघुवीर ।।२७।। सुग्रीव तो जाणिजे मित्र[७] । नळ तो अनळ[८] साचार । नीळ तो अनिळ[९] अवतार । यम[१०] तोचि ऋषभ पैं ।।२८।। ऐसी आज्ञा होतां समस्त । देव जयजयकारें गर्जत । आनंद न माय अंबरांत[११] । गेले त्वरित स्वस्थाना ।।२९।। श्रीरामकथा अति रसाळ । हेंचि मानससरोवर निर्मळ । तुम्ही चतुर श्रोते मराळ । बैसा सकळ एकपंक्ती ।।२३०।। श्रीरामकथा करितां श्रवण । होय पापांचें सर्व खंडण । चिंतिले मनोरथ होती पूर्ण । भक्तीकरून वाचितां ।।३१।। श्रोतयांसी पडतां विघ्न । श्रीराम निवारित स्वयें आपण । सर्वकाळ रामचरणीं लीन । असतां भवबंधन चुकेल ।।३२।। ब्रह्मानंदा आत्मयारामा । भक्तकामकल्पद्रुमा[१२] । श्रीधरवरदा[१३] पूर्णब्रह्मा । अक्षय अनामा अभंगा ।।३३।। स्वस्ति श्रीरामविजय ग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत भक्त चतुर । द्वितीयाध्याय गोड हा ।।२३४।। श्रीरामचंद्रार्पणमस्तु ।। ।। ओव्या २३४ ।।

।। अध्याय दुसरा समाप्त।।

---

१. भृगुवंशभूषण २. एकवीस वेळा ३. विष्णूचा शंख ४. सुदर्शन चक्र ५. देवांचा गुरु ६. चैतन्यरूप ७. सूर्य ८. अग्नी ९. वायु १०. यमराज ११. गगनात १२. भक्तांच्या इच्छा पूर्ण करणारा १३. श्रीधर कवीला वर देणाऱ्या

## ॥ अध्याय तिसरा ॥

# संततीसाठी पुत्रकामेष्टि-यज्ञ, हनुमंताचा जन्म

॥ श्रीगणेशाय नमः॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः। तुम्ही संत श्रोते भाविक। कविमुद्रारत्नपरीक्षक[१]। श्रोता देखोनि मृगांक[२] । वक्ता सोमकांत पाझरे॥१॥ तुम्ही बोधसमुद्रींची मुक्तें[३] पवित्रें। कीं चैतन्यनभींची दिव्य नक्षत्रें । कीं वैराग्यवनींचीं सुमने विचित्रें । संतरूपें विकासलीं॥२॥ निवडलीं रामकथामृतपात्रें। कीं ज्ञानभरित पिकलीं क्षेत्रें। कीं भजनपंथींचीं सरोवरें। संतरूपें भरली हो ॥३॥ कीं भवजलदजालप्रभंजन[४]। अज्ञानतिमिरच्छेदक चंडकिरण[५]। जो कां मदगजविरादक[६] पंचानन[७]। मत्सरकाननदहन[८] जो॥४॥ रामविजय ग्रंथ वैरागर। साहित्यरत्नें निघती अपार। हीं तुम्हीं अंगीकारावीं वारंवार। कासयासी प्रार्थावें॥५॥ कमळकोशींचा मकरंद बरा। हें नलगे सांगावें भ्रमरा। राजहंसासी घे मुक्तचारा[९]। ऐसें किमर्थ प्रार्थावें ॥६॥ शीतळ होई चंद्रमंडळा। कासया सांगावें वेळोवेळां। मित्रासी प्रकाश आगळा। पाडीं कासया म्हणावें ॥७॥ संतांसी धरा क्षमा शांती। ऐसें वदे तोचि मंदमती। प्रेमळासी करीं भक्ती। सांगावें नलगेचि हें ॥८॥ तैसे पंडित तुम्ही ज्ञानघन[१०] । करा सुरस रामकथाश्रवण। हें वारंवार म्हणतां दूषण। वक्तयासी झगटेल ॥९॥ असो पूर्वाध्यायीं कथा निश्चितीं। सांगितली रावणाची उत्पत्ती। कौसल्या दशरथ अयोध्येप्रती नेऊनि विधीनें स्थापिलीं ॥१०॥ सूर्यवंशभूषण[११] अद्भुत। अयोध्यापती राजा दशरथ। ज्याची पट्टराणी विख्यात। कुशल बहुत कौसल्या॥११॥ सुमित्रा कैकयी स्वरूपवंत। दोघींस वरी राव दशरथ। आणिक सातशें परिणीत। भोगांगना सुंदरा ॥१२॥ ज्ञानकळा कौसल्या सती। सुमित्रा केवळ सद्भक्ती। कैकयी ते कपटप्रकृती। रजतमयुक्त सर्वदा ॥१३॥ केवळ विवेक मूर्तिमंत। तोचि अजपाळसुत दशरथ। जो परमयोद्धा रणपंडित। धनुर्विद्या सर्व जाणे ॥१४॥ अंधारामाजी शब्द उठतां। तेथेंचि बाण मारी अवचिता। धन्य त्याची हस्तकुशलता। वीर दशरथाऐसा नसे ॥१५॥ परी पोटीं नसे पुत्रसंतान। तेणें राजेंद्र असे उद्विग्न। पुत्राविण शून्य सदन। बोलती शास्त्रज्ञ पंडित ॥१६॥ शरीर जैसें प्राणाविण। तारुण्याविण पंचबाण। दयेवीण व्यर्थ ज्ञान। शांतीवांचून वैराग्य ॥१७॥ संपत्ति जैसी धर्मेविण। पंडितावांचून सभासदन। कीं करणीविण[१२] व्यर्थ ज्ञान। दीपेंविण मंदिर जेवीं ॥१८॥ कीं वेदांतज्ञानावांचून। कोरडी व्युत्पत्ति व्यर्थ ज्ञान। कीं सत्पात्रावांचून[१३] दान। कीं स्नेहेंवीण बंधु जैसा ॥१९॥ कीं जळेंविण वापिका। कीं नृपावीण परिवार देखा। कीं नासिकावीण मुखा। शोभा जैसी न येचि ॥२०॥ कीं फळेंविण तरुवर। कीं राम स्मरणावीण मंदिर। तैसा पुत्रावीण वंश पवित्र। सर्वथा पावन नव्हेचि ॥२१॥ असो राजा दशरथ। संततीलागीं चिंताक्रांत। सदा विपिनें[१४] गहन हिंडत। मृगयामिषेंकरोनियां[१५] ॥२२॥ नावडे छत्रसिंहासन। नावडे चातुर्यकळा गायन। बहुत केले प्रयत्न। परी संतान नव्हेचि ॥२३॥ तों दशरथें स्वप्न देखिलें। दोघे पुरुष आपण वधिले। आणि एके स्त्रियेसी मारिलें। अपराधेंविण सर्वथा ॥२४॥

---

१. कवीचे गुणरूपी रत्न पारखणारे २. चंद्र ३. मोती ४. संसाररूप ढग विसकटून टाकणारा वायू ५. सूर्य ६. मदरूपी हत्तीचे विदारण करणारे. ७. सिंह ८. मत्सररूपी अरण्याचे दहन करणारे ९. मोत्यांचा चारा १०. अगाध ज्ञानी ११. सूर्यवंशाचे भूषण १२. क्रियेशिवाय १३. योग्य व्यक्तिशिवाय १४. वने १५. शिकारीच्या निमित्ताने

गजबजोनि उठिला त्वरित । कोणासीं न बोले मूकवत । वसिष्ठगृहास जाऊन त्वरित । नमोनि स्वप्न सांगतसे ॥२५॥ गुरु बोले हें दुष्ट स्वप्न । तीन श्वापदें येईं वधोन । मग याची शांति करून । दोषनिवारण करावें ॥२६॥ गुरुआज्ञेनें ते दिवसीं । राजेंद्र निघाला मृगयेसी । वासरमणि[१] गेला अस्तासी । परी श्वापद न सांपडे ॥२७॥ पडला अत्यंत अंधकार । एकला हिंडे नृपवर । धनुष्यासी लावूनि शर । शोधी कांतार[२] तेथवां ॥२८॥ तों एका सरोवराचे तीरीं । राजा गुप्त बैसे वृक्षावरी । कानाडी[३] ओढूनि ते अवसरीं । कर्णी ऐके सांचोल[४] ॥२९॥ तों ते मार्गीं श्रावण । आला मायबाप घेऊन । दिवसा बहुत विघ्नें आणि उष्ण । म्हणोनि रात्रीं गमन करी ॥३०॥ दोघें वृद्धें खांदीं घेउनी । श्रावण तीर्थे हिंडे मेदिनी[५] । त्या सरोवराचे तीरीं येउनी । उभा राहिला नावेक[६] ॥३१॥ तों तीं वृद्धें म्हणती श्रावणा । आम्हां करवीं उदकपाना । ऐकतां ऐसिया वचना । कावड खालीं ठेविली ॥३२॥ हातीं कमंडलु घेऊन । जीवनांत[७] प्रवेशला श्रावण । दशरथें सांचोल ऐकोन । निर्वाणबाण[८] सोडिला ॥३३॥ सपक्ष बाण हृदयीं भेदला । हातींचा कमंडलू खालीं पडला । देह भूमीवरी टाकिला । प्राण चालिला श्रावणाचा ॥३४॥ म्हणे कोणे सभाग्याचा बाण । करीत आला रामस्मरण । हृदय निवालें संपूर्ण । केलें पावन मजलागीं ॥३५॥ ऐकोनि मनुष्यांचे वचन । नृपवर जवळी आला धांवोन । तंव तो पडिलासे श्रावण । रामस्तवन करीतचि ॥३६॥ मग म्हणे कर्म पापकारी । पडली हत्या मजवरी । श्रावण म्हणे राया न करीं । खेद कांहीं सर्वथा ॥३७॥ माझीं मायबापें वृद्धें दीन । तयांसी करवीं उदकपान । मग मी सोडीन प्राण । सत्य जाण राजेंद्रा ॥३८॥ दोघें वृद्धें अत्यंत पाहीं । त्यांचे सेवेसी कोणी नाहीं । दशरथ गहिंवरला हृदयीं । शोकाकुलित[९] जाहला ॥३९॥ श्रावण म्हणे दशरथा । उदक दोघां पाजून त्वरिता । मग हे सांगावी वार्ता । नाहीं तरी प्राण त्यागिती ॥४०॥ उदक नेतां अयोध्याराणा । वृद्धें म्हणती बा रे श्रावणा । तंव तो न बोलेचि वचना । कांहीं केलिया सर्वथा ॥४१॥ कां रे श्रावणा न बोलसी । उदक मागितलें येवढे निशीं । बा रे म्हणोन कोपलासी । शिणलासी पाडसा ॥४२॥ उदयाचळीं[१०] मावळेल मित्र । शेष सांडील भूमिभार । तीव्र तपेल रोहिणीवर । तरी क्रोध अणुमात्र न ये तूतें ॥४३॥ जैसें गंगेचें निर्मळ जीवन । तैसें श्रावणा तुझें मन । तान्हया कां रे न बोलसी वचन । राजा ऐकोनि गहिंवरे ॥४४॥ मग अजराजपुत्र बोलिला । म्यां अवचितां श्रावण वधिला । तंव तिहीं धरणीवर देह टाकिला । प्राण जाहला कासाविस ॥४५॥ आठवोनि श्रावणाचे गुण । दोघें आक्रंदती दीनवदन । ऐसा पुत्र हें त्रिभुवन । शोधितांही न सांपडे ॥४६॥ अहा रे पुत्रा श्रावणा । गंभीरा गुणनिधाना । आमुचे प्राण करिती प्रयाणा । श्रावणा वदन दावीं कां ॥४७॥ या ब्रह्मांडमंडपांत । श्रावणाऐसा नाहीं सुत । जैसीं लक्ष्मी आणि वैकुंठनाथ । तैसीं भावित मातापिता ॥४८॥ जो न करी मातृपितृभजन[११] । जळो तयाचें ब्रह्मज्ञान । तो षट्शास्त्रें[१२] आला पढून । तरी त्याचें दर्शन न व्हावें ॥४९॥ त्याचें जप तप अनुष्ठान । दान अध्ययन श्रवण मनन । कळा चातुर्य व्यर्थ ज्ञान । जैसें भाषण मद्यपियांचें ॥५०॥ तेणें अभ्यासिल्या चौसष्टी कळा । त्या अवघ्याचि जाहल्या विकळा[१३] । जयासी मातापित्यांचा कंटाळा । त्या चांडाळा न शिवावें ॥५१॥

१. सूर्य २. अरण्य ३. आकर्ण ४. चाहूल ५. पृथ्वीवर ६. क्षणभर ७. पाण्यामध्ये ८. घातक बाण ९. दुःखी १०. पूर्वेला ११. आईवडिलांची भक्ती १२. वेदांत, न्याय, मीमांसा, योग, सांख्य, वैशेषिक ही सहा शास्त्रे १३. निष्फल

माता पिता गुरु देव जाण । चारही दैवतें समसमान । तोचि परम ज्ञाता जाण । न मोडी वचन श्रेष्ठांचें ॥५२॥ म्हणोनि पुत्र एक श्रावण । आठवूनि तयाचे गुण । दोघें पडलीं मूर्च्छा येऊन । जावया प्राण एकवटले ॥५३॥ मग तीं शाप देती प्राण जातां । म्हणती तुझाही पुत्र पुत्र करितां । प्राण जाईल रे दशरथा । आम्हांऐसाचि तत्काळ ॥५४॥ मग तिहीं सोडिला प्राण । रायें केलें तिघांचें दहन । उत्तरकार्य संपादून । अयोध्येसी परतला ॥५५॥ मनांत हर्ष मानी नृपवर । मज शाप जाहला तो केवळ वर । यांचे शापें तरी पुत्र । हो कां सत्वर मजलागी ॥५६॥ अयोध्येसी आला दशरथ । वसिष्ठासी सांगितला वृत्तांत । पुढें द्वादश वर्षेपर्यंत । दुष्काळ पडला पृथ्वीवरी ॥५७॥ न वर्षे कदा बलाहक[१] । अत्यंत तीव्र तपे अर्क[२] । धान्य तृण जीवन[३] सकळिक । नाहीं निःशंक पृथ्वीवरी ॥५८॥ गायी ब्राह्मण पीडिले बहुत । दैत्यगुरु[४] परम कापट्यवंत । तेणें जलद[१] आकर्षिले समस्त । वृष्टि एकाक्ष[४] होऊं नेदी ॥५९॥ वृष्टि जाहलिया परिपूर्ण । सुखी होतील गोब्राह्मण । ते करितील महायज्ञ । सुरांस पूर्ण बळ तेणें ॥६०॥ वृषपर्वा दैत्येंद्र थोर । त्यासी साह्य जाहला शुक्र । निर्जरभारांसहित[५] शक्र[६] । युद्ध करीत तयासीं ॥६१॥ बहुत दिवस जाहला संग्राम । परी शुक्र कपटी पूर्ण परम । मेघ वर्षो नेदी अधम । चिंताक्रांत शक्र जाहला ॥६२॥ वज्रधरासी[७] म्हणे अंगिरासुत[८] । अयोध्येचा राजा दशरथ । तो प्रतापार्क[९] रणपंडित । जिंकील दैत्य क्षणमात्रें ॥६३॥ मग मातली[१०] आणी विजयरथा । मूळ पाठविलें दशरथा । मातली सांगे समूळ वार्ता । अनावृष्टिकारणें जे ॥६४॥ ऐकोनि दैत्यप्रताप अद्‌भुत । तत्काळ रथीं बैसला दशरथ । तों कैकयी रायास प्रिय अत्यंत । काय बोलत तेधवां ॥६५॥ म्हणे मी समागमें येईन । आणि संग्राम तुमचा पाहीन । राजा म्हणे तूं सुकुमार पूर्ण । युद्धकंदन ते स्थानीं ॥६६॥ येरी म्हणे तुम्ही जवळीं असतां । मज भय नाहीं सर्वथा । ऐसे तिचे बोल ऐकतां । घेतली रथावरी तेधवां ॥६७॥ निराळमार्गें[११] रथ ते वेळीं । घेऊनि जात चपळ मातली । देवदैत्यांच्या रणमंडळीं । रथ अकस्मात उतरला ॥६८॥ वैकुंठींहूनि विनतासुत[१२] । क्षीराब्धितटीं[१३] उतरे अकस्मात । तैसा राजा दशरथ । सुरसमुदायांत उतरला ॥६९॥ अजपुत्र देखोनि पाकशासन । देता जाहला क्षेमालिंगन । दशरथ धनुष्य चढवून । उभा ठाकला रणांगणीं ॥७०॥ बाणापाठीं बाण सोडीत । जैसे शब्दामागें शब्द येत । कीं मेघ धारा वर्षत । शर सोडित त्याच रीतीं ॥७१॥ जैशा मेघाबाहेर निवडोनी । निघती कल्पांतसौदामिनी[१४] । तैसा एकेक बाण तूणीरांतुनी[१५] । ओढोनि काढी दशरथ ॥७२॥ दैत्यांचीं शिरें अकस्मात । गगनीं उडती असंख्यात । जैसे वृक्षावरोनि पक्षी उडत । प्रातःकाळीं एकदांचि ॥७३॥ मारिले दैत्यभार तेव्हां । तों पुढें आला वृषपर्वा । कपटकळा युद्धमावा[१६] । नानाप्रकारें दावित॥७४॥ परी दशरथ वीर समर्थ । कापट्यविद्या न चले तेथ । जैसें मूर्खाचें वाग्जाळ समस्त । उच्छेदी पंडित एकशब्दें ॥७५॥ जैसा मंत्रवादी[१७] महामती । त्यापुढें भूतचेष्टा न चालती । तैशा दशरथापुढें युद्धगती । कदा न चालती तयाच्या ॥७६॥ देखोनि दशरथाचा प्रताप तेव्हां । विरथ[१८] जाहला वृषपर्वा । पाठी देऊनि तेधवां । निघता जाहला सवेग ॥७७॥

१. ढग २. सूर्य ३. पाणी ४. शुक्राचार्य ५. देवांच्या सैन्यासह ६. इंद्र ७. इंद्राला ८. बृहस्पती ९. पराक्रमी १०. इंद्राच्या सारथ्याचे नाव ११. आकाशातून १२. गरुड १३. क्षीरसागराच्या काठावर १४. प्रलयकाळच्या विजा १५. भात्यातून १६. युद्धकला १७. सिद्ध मांत्रिक १८. रथहीन

घृतें शिंपिला वैश्वानर[१] । तैसा क्रोधायमान जाहला शुक्र । रथीं बैसोनियां शर । सोडिता जाहला प्रतापें ॥७८॥ जातवेदास्त्र[२] ते अवसरीं । सोडिता जाहला देवांवरी । अयोध्याधीशें झडकरी । जलदास्त्र[३] प्रेरिलें ॥७९॥ शुक्रें वातास्त्र[४] सोडिलें अद्‌भुत । येरें आड घातले पर्वत । वात कोंडिला समस्त । दैत्यगुरुनें देखिलें ॥८०॥ मग सोडिलें वज्रास्त्र[५] । पर्वत फोडिले समग्र । दशरथें सोडिलें माहेश्वर । देखोनि वज्रास्त्र विरालें ॥८१॥ शुक्र परम क्रोधायमान । काढिला एक निर्वाणबाण । रथाचा आंख छेदून । टाकिता जाहला तेधवां ॥८२॥ आंख छेदितां अकस्मात । खालीं पडावा जों दशरथ । तों कैकयी देखोनि धांवत । घालोनि हात आंख धरी ॥८३॥ पर्वताकार रथ थोर । दंडावरी घेतला भार समग्र । वीरश्रीरंगें[६] नृपवर । समाचार नेणे तो ॥८४॥ दशरथें सोडिला निर्वाणबाण । तोडिला कवीचा स्यंदन । अश्वांसहित कुटके[७] करून । रणमंडळी पाडिला ॥८५॥ विरथ जेव्हां जाहला शुक्र । दशरथें काढिला सूर्यमुख शर । म्हणे याचें छेदीन शिर । कापट्यमुकुटासहित[८] पैं ॥८६॥ मागुती विचारी अजनंदन । शुक्र तरी केवळ ब्राह्मण । याचा रक्षोनियां प्राण । मुकुट मात्र छेदावा ॥८७॥ निमिष न लागतां गेला बाण । मुकुट पाडिला तळीं छेदून । भयभीत भृगुनंदन । पळता जाहला तेधवां ॥८८॥ देव करिती जयजयकार । पळूं लागला दैत्यभार । जैसा महावात सुटतां समग्र । भूस उडे अंबरीं ॥८९॥ रायें कोदंडासी घातली गवसणी । तूणीर ठेविला आवरण घालोनी । जैसा कुंडामाजी देदीप्य अग्नी । आच्छादित याज्ञिक ॥९०॥ दशरथ पाहे सावधान । तों कैकयीनें हात घालून । धरिला असे महास्यंदन । वर्तमान कळलें तें ॥९१॥ आश्चर्य करी नृपवर। आजिचें युद्ध अनिवार । आम्हांसी जयलाभ समग्र। कैकयीनें दीधला॥९२॥ जैसें घर पडतां अकस्मात । निजबळें उचली बळवंत । तैसा कैकयीनें आजी रथ। सांवरिला रणांगणीं॥९३॥ खालीं उतरून दशरथ । प्रियेलागीं आलिंगित। म्हणे दोन वर मागें त्वरित । जे कां अपेक्षित मानसीं ॥९४॥ कैकयी आनंदली थोर । म्हणे मी जेव्हां मागेन वर । तेव्हां मज द्यावे साचार । म्हणोनि भाष घेतली ॥९५॥ महायुद्धीं जय पूर्ण । कैकयीस यावया काय कारण । काय होतें तीस वरदान । तेंचि कारण ऐका पां ॥९६॥ पितृगृहीं कैकयी असतां । एक तापसी आला अवचितां । तयासी प्रर्थोनियां माता । राहविती जाहली कैकयीची ॥९७॥ ऋषि बैसला अनुष्ठानातें । माता निरोपी कैकयीतें । उपकरणसामग्री लागेल यातें । ती सिद्ध करोनि देइंजे ॥९८॥ पुष्पें धूप दीप आरती । सिद्ध करोनि देत ऋषीप्रती । येरू प्राणायाम करूनि निश्चितीं । ध्यानीं जाहला निमग्न ॥९९॥ तंव कैकयीनें घेऊनि मस । लाविली ऋषीच्या मुखास । ध्यान जाहलिया तो महापुरुष । स्वमुख करें पुसीतसे ॥१००॥ तों हस्तास लागलें काळें । कर्तृत्व[९] कुमारीचें कळलें । ऋषीनें शापिलें ते वेळे । वदन काळें तुझें हो कां ॥१॥ तुजवरी अपेश येईल प्रचंड । जगांत होईल काळें तोंड । पुत्रद्वेष करिसील उदंड । नसतें बंड वाढविसी ॥२॥ मातेनें समाचार ऐकोन । वेगीं धरिले ऋषीचे चरण । स्वामी कैकयी बाळ अज्ञान । नेणोनि कर्म हें केलें ॥३॥ कांहीं द्यावे जी वरदान । मग ऋषी कृपाळु होऊन । म्हणे संग्रामीं पतीलागुन । जय देईल महारणीं ॥४॥ पूजासामग्री दिधली समस्त । तरी हा हस्त होईल यशवंत । त्या वरें या समयीं अद्‌भुत । जय प्राप्त कैकयीतें ॥५॥

१. अग्नी २. अग्निअस्त्र ३. पर्जन्य-अस्त्र ४. वायु-अस्त्र ५. वज्र-अस्त्र ६. वीरश्रीच्या आवेशात ७. तुकडे ८. कपटरूपी मुकुटासहित ९. कृत्य

असो इंद्र आणि बृहस्पती । दशरथाचें यश वानिती । वस्त्रें भूषणें अमरपती[१] । देता जाहला रायातें ॥६॥ वस्त्राभरणें[२] अद्‌भुतें । दिव्यमणि दिधला कैकयीतें । येरीनें घातला वेणीतें । परम प्रकाशवंत जो ॥७॥ तों देवआचार्य[३] बोले वचन । रावासी काय आहे संतान । दशरथ म्हणे पुत्रवदन । देखिलें नाहीं अद्यापि ॥८॥ सुरगुरु म्हणे राया वरिष्ठा । त्रिभुवनपति[४] येईल तुझिया पोटा । जयाचें ध्यान लागलें नीलकंठा । सनकादिक भक्तांसी ॥९॥ जो मायाचक्रचाळक । अनंत ब्रह्मांडांचा नायक । जो कमलोद्भवाचा[५] जनक । तो पुत्र देख तुझा राया ॥११०॥ जो वेदशास्त्रांचा जिव्हार । जो आदिमायेचा निजवर[६] । तो पुराणपुरुष अगोचर । तुझा पुत्र होईल कीं ॥११॥ विभांडकाचा पुत्र श्रृंगऋषी । हरिणीगर्भसंभूत[७] तेजोराशी । त्यासी आणावें नाना सायासीं । पुत्रेष्टि करावया ॥१२॥ त्यास नाहीं मनुष्यदर्शन । देखिलें नाहीं स्त्रियांचें वदन । त्यास शब्दविषयें मोहून । करोनि गायन आणावा ॥१३॥ शक्र म्हणे देवललना[८] । पाठवाव्या तया वना । रंभा उर्वशी शुभानना । ज्यांचे गायना मदन भुले ॥१४॥ दशरथें इंद्रगुरूची आज्ञा । घेऊन आला अयोध्याभुवना । आनंद जाहला सकळ जना । पर्जन्यवृष्टि जाहली ॥१५॥ असंभाव्य[९] पिकली मेदिनी । दुष्काळ गेला मूळींहुनी । जैसीं विष्णुसहस्रनामें करुनी । महापापें संहारती ॥१६॥ इकडे वीणा टाळ मृदंग । झल्लरी किंकिणी उपांग । देवांगना[८] घेऊन उपभोग । वना सवेग चालिल्या ॥१७॥ विभांडकऋषि तपोधन । नित्य प्रात:काळीं उठोन । करावया अनुष्ठान । जान्हवीतीराप्रति जाय ॥१८॥ मागें आश्रमीं एकला पुत्र । उंच बांधोनियां गोपुर । त्यावरी श्रृंगी तो परम चतुर । वेदाध्ययन करीतसे ॥१९॥ गज व्याघ्र सावजें बहुत । देखतां होय भयभीत । म्हणोनि उंच स्थळ बांधोनि सत्य । त्यावरी सुत बैसविला ॥१२०॥ विभांडकऋषि अनुष्ठान करून । दोन प्रहरां येत परतोन । परमानंदें पुत्र देखोन । अध्ययन सांगे तयातें ॥२१॥ चारही वेद मुखोद्गत । सकल शास्त्रें पारंगत । यागविधि कर्मे समस्त । करतलामलक तयातें ॥२२॥ असो विभांडक गेला स्नाना । तो समय पाहोन देवांगना । वेगीं पातल्या तया वना । सर्व संपत्ति घेऊनियां ॥२३॥ वरी बैसला ऋषिनंदन । तंव त्यांनी आरंभिलें गायन । जें ऐकतां भुले पंचबाण[१०] । स्वरूपलावण्य तयांचें ॥२४॥ जैशा केवळ सौदामिनी । मंडित दिसती वस्त्राभरणीं । ज्यांचीं स्वरूपें पाहोनी । सुधापानी[११] वेधले ॥२५॥ टाळ मृदंग सुस्वर । गायन ऐकून ऋषिपुत्र । वरोनि पाहे सादर । स्वरूप सुंदर न्याहाळोनी ॥२६॥ तंव नेत्रकटाक्ष हावभाव । दाविती नानापरींचें लाघव[१२] । श्रृंगीनें देखतांचि अपूर्व । भय वाटे मानसीं ॥२७॥ गायन ऐकतां सुस्वर । संतोष वाटे अपार । म्हणे मज धरावया साचार । पातले कोण न कळे हें ॥२८॥ भयेंकरून ते वेळां । श्रृंगी वायुवेगें पळाला । सवेचि विलोकी परतोनि डोळां । सुंदर स्वरूप तयांचें ॥२९॥ विभांडक अनुष्ठान करून । आश्रमासी येत परतोन । देवांगना जाती तेथोन । शापभयें ऋषीच्या ॥१३०॥ म्हणती विभांडकासी कळेल । तरी आम्हां तत्काळ शापील । यालागीं दोन प्रहर होतां सकळ । जाती वेगेंकरूनियां ॥३१॥ असो पिता आला आश्रमासी । श्रृंगी सांगे तयापाशीं । म्हणे येथें आले होते तापसी । उपमा ज्यांसी असेना ॥३२॥

१. इंद्र २. वस्त्रे व दागिने ३. बृहस्पती ४. श्री विष्णू ५. ब्रह्मदेवाचा ६. पती ७. हरिणीच्या पोटी जन्मलेला ८. अप्सरा ९. कल्पनातीत १०. मदन ११. देव १२. कौशल्य

मी तयांसी देखोनी । पळालों देहलोभेंकरूनी[१] । आतां न येती ते दुसरेनी । खंती मनी वाटतसे ॥३३॥ विभांडक म्हणे पुत्रासी। जरी आश्रमा आले संत ऋषी । तरी आपण आतिथ्य करावे तयांसी। पूजाविधिकरूनियां ॥३४॥ असो प्रात:काळीं विभांडक मुनी । गेला अनुष्ठानालागुनी । श्रृंगी चिंता करी मनीं । म्हणे कधीं नयनीं देखेन तयां ॥३५॥ विसरला लेखन पठन । ज्ञान ध्यान आणि मनन । लागलें मनीं स्त्रियांचें ध्यान । अनर्थ पूर्ण स्त्रीसंगें ॥३६॥ ज्यानें स्त्री न देखिली स्वप्नीं । त्यानें ती विलोकितां नयनीं । गेला सर्व विसरोनी । अनर्थ कामिनी तपासी ॥३७॥ मग ज्यांस अखंड स्त्रीचिंतन । ते कैसे तरतील जन । मूर्तिमंत भवाब्धिकामिन[२] । भुलवी सज्जन जाणते ॥३८॥ स्त्री केवळ अविद्येचा पसारा । महाअनृता[३] अविचारा । सकळ असत्याचा थारा[४] । भय न धरी पापाचें ॥३९॥ स्त्री अनर्थाचें गृह सबळ । कीं कलहाचें महामूळ । कीं विषवल्लीच केवळ । स्त्रीरूपें विस्तारली ॥१४०॥ स्त्री कामाची विशाळ दरी । कीं ते क्रोधव्याघ्राची[५] जाळी खरी । कीं ते पापसमुद्रलहरी[६] । कीं ते भजन असत्याचें ॥४१॥ कीं ते दु:खवृक्षाचें श्रेष्ठ फल । कीं ते मोहाचा पर्वत सबळ । कीं ते मत्सर-वनचि केवळ । किंवा भ्रांति अवतरली ॥४२॥ कीं दंभचि मूर्तिमंत विरूढला[७] । कीं अहंकार स्त्रीगड[८] बांधिला । कीं मूर्खत्व सकळ त्या स्थळा । मिरास[९] करूनि राहिलें ॥४३॥ कीं स्त्री मूर्तिमंत भवव्याधी[१०] । कीं षडूर्मींची[११] भरली नदी । कीं सकळ विकारांची मांदी । यात्रेसी आली त्या ठाया ॥४४॥ कवणें निर्मिली हे कुऱ्हाडी । सबळ पुण्यवृक्ष तोडी । कीं अविश्वासाची बेडी । जिवाच्या पायीं ठोकली ॥४५॥ कीं स्वर्गमोक्षअर्गळा[१२] सत्य । दर्शनें पुरुषाचें चित्त चोरित । स्पर्शबळें वीर्य हरीत । आसुरी प्रत्यक्ष कामिनी ॥४६॥ कौटिल्यदंभसंयुक्त[१३] । क्षमाशौचविवर्जित[१४] । महामंत्राचें सामर्थ्य । क्षणें हरीत न कळेचि ॥४७॥ गौडी माध्वी पैष्टी तीन्ही । मदिरा ऐशा प्रकट जनीं । चौथें मद्य ते कामिनी । दुर्गंधि खाणी पापाची ॥४८॥ काय विद्या काय तप । कायसें ध्यान काय तप । कासया ज्ञान खटाटोप । हरिलें सर्व स्त्रियांनी ॥४९॥ जिव्हा दग्ध परान्नें पाहीं । हस्त दग्ध प्रतिग्रहीं[१५] । मन दग्ध स्त्रीचे ठायीं । करूनि काय जप तप ॥१५०॥ व्यर्थ करिती पुरश्चरण । स्त्रियेनें हरोनि नेलें मन । करूं बैसतां जों ध्यान । तों ध्यानीं चिंतन स्त्रियेचें ॥५१॥ काय अध्ययन काय कीर्तन । व्यर्थ गेलें पुराणश्रवण । काय धरूनी धर्म दान । स्त्रियांनीं मन हरियलें ॥५२॥ स्त्री स्वरूपाची धरोनी दिवी[१६] । महानरकाची वाट दावी । सज्ञानासही भुलवी । वनीं हिंडवी विषयाचिया ॥५३॥ कीं काळें दूती पाठविली देखा । चाळवूनि नेत महानरका । दुराविलें मोक्षसुखा । अध:पातीं पाडिलें ॥५४॥ आतां असो हा अनुवाद[१७] । जरी कृपा करील ब्रह्मानंद । तरीच तुटेल भवबंध । हृदयीं बोध ठसावे ॥५५॥ जरी कृपा करील जगज्जीवन । तरी हरिरूप दिसे जन वन । कैचा पुरुष नपुंसक कामिन । व्यापिलें पूर्ण श्रीरामें ॥५६॥ नर नारी मिथ्या भास । अवघा वोतला पुराणपुरुष[१८] । जैं कृपा करील सर्वेश[१९] । ब्रह्मानंदस्वामी[२०] पैं ॥५७॥ असो आतां श्रृंगऋषी । म्हणे कधीं येतील ते तापसी । तों अकस्मात त्या समयासी । रंभा उर्वशी पातल्या ॥५८॥ उत्तम स्वरूपें मंजुळ गायन । सुंदर मुख आकर्ण नयन । श्रृंगीलागीं खुणावून । कामभाव दाविती ॥५९॥ नानापक्वान्नें अमृतफळें । श्रृंगीस देती बहु रसाळें । मग तो उतरोनि खालें । जवळीं येवोनि बैसला ॥१६०॥

१. प्राण वाचविण्यासाठी २. संसारेच्छू ३. फार खोट्या ४. आश्रयस्थान ५. क्रोधरूपी वाघाची ६. पापरूपी समुद्राची लाट ७. वाढला ८. स्त्रीरूपी किल्ला ९. आश्रय १०. भवरूपी रोग ११. कामक्रोधादी सहा ऊर्मी १२. स्वर्ग व मोक्ष यांच्या दारावरील अडसर १३. कुटिलपणा, दंभ यांनी युक्त १४. क्षमा, शुद्धता नसलेल्या १५. दान घेणे १६. दिवटी १७. विस्तार १८. ईश्वर १९. स्वामी २०. सद्गुरु ब्रह्मानंद

तयांसी पुसे आवडीकरून । सांगा तुमची नामखूण । हीं गलंडें काय म्हणोन । वक्ष:स्थळीं तुमच्या पैं ॥६१॥ येरी गदगदां हांसती । तुझिया माथां श्रृंग निश्चितीं । म्हणोनि श्रृंगऋषी म्हणती । तुजलागीं ऋषिपुत्रा ॥६२॥ आमुचें नांव गलंडऋषी । बहु सुख असे आम्हांपाशीं । येरु म्हणे तें दाखवा आम्हांसी । चवी कैसी पाहों पां ॥६३॥ त्या म्हणती जी तत्त्वतां । कामासन तुज शिकवूं आतां । तों मदनें मोहिलें ऋषिसुता । आसक्त सुरतालागीं होय ॥६४॥ मग तो म्हणे मी तुम्हांआधीन । जिकडे न्याल तिकडे येईन । मग त्यांनीं विमानीं बैसवून । आणियेला अयोध्येसी ॥६५॥ दशरथें करूनि नमस्कार । केला बहुत आदर । म्हणे महाराज तुम्ही बहु थोर । दर्शन आम्हां दिधलें ॥६६॥ मग पाळककन्या[1] आपुली । श्रृंगऋषीस दिधली । लग्नसोहळा ते वेळीं । चार दिवस जाहला ॥६७॥ मग ऋषी मेळविले बहुत । जे शापानुग्रहसमर्थ[2] । वसिष्ठ मुख्य आचार्य जेथ । न पडे पदार्थ न्यून कांहीं ॥६८॥ इकडे ज्ञानीं पाहे विभांडकमुनी । तों स्त्रियांनी सुत नेला चाळवुनी[3] । परम क्रोधाविष्ट होऊनी । अयोध्येसी पातला ॥६९॥ तों ऋषिवेष्टित देखिला कुमर । जैसा नक्षत्रीं वेष्टिला रोहिणीवर । कीं किरणीं वेष्टिला दिवाकर[4] । तैसा स्वसुत देखिला ॥१७०॥ स्नुषा देखोनि नयनीं । विभांडक निवाला मनीं । दशरथ लागला ऋषिचरणीं । आनंदेंकरूनि तेधवां ॥७१॥ विभांडक आनंदे बहुत । नृपासी आशीर्वाद देत । तुज होतील चौघे सुत । जे कां समर्थ त्रिभुवनीं ॥७२॥ असो यज्ञमंडपीं श्रृंगी आपण । सकळ ऋषिमंडळ घेऊन । स्वाहाकारासी अवदान[5] । मंत्रयुक्त टाकीत ॥७३॥ पूर्णाहुतीचिये काळीं । प्रत्यक्ष प्रगटला ज्वाळामाळी[6] । जैसा सूर्य उगवे उदयाचळीं । प्रात:काळीं अकस्मात ॥७४॥ चत्वारिश्रृंग[7] द्विमूर्धान[8] । सप्तपाणी[9] त्रिचरण[10] । देखतां यज्ञनारायण[11] । ऋषिजन सुखावले ॥७५॥ हातीं पायसताट भरून । श्रृंगीपाशीं देत कृशान । म्हणे अविलंबें पिंड करून । तिघीं राणियांस देइजे ॥७६॥ बहु त्वरा करावी ये क्षणीं । विलंबें होय कार्यहानी । पोटा येईल कैवल्यदानी[12]। क्षीरसागरविहारी[12] जो ॥७७॥ ऐसें बोलोनि तये काळीं । गुप्त जाहला ज्वाळामाळी । श्रृंगीनें वसिष्ठा-जवळी । पायसपात्र दीधलें ॥७८॥ वसिष्ठें करूनि तीन विभाग । राणियांस देत सवेग । कौसल्येसी श्रेष्ठ भाग । देता जाहला ऋषि तो ॥७९॥ दुजा सुमित्रेप्रती देत । तिजा कैकयीकरीं घालीत । देखोनि ऐसें अद्‌भुत । क्रोध आला कनिष्ठेतें ॥१८०॥ म्हणे मी रायासी प्रियकर । म्यां रथचक्रीं घालोनि कर । रणीं विजयी केला नृपवर । इंद्रादिक देवांदेखतां ॥८१॥ वयेंकरूनि वृद्ध फार । ते ज्येष्ठ नव्हे साचार । जियेमाजी गुण थोर । तीच श्रेष्ठ जाणिजे ॥८२॥केतकीचें लघु पत्र । त्यास मानिती सर्वत्र । इतर पत्रें दिसती थोर । परी चतुर न मानिती ॥८३॥ अमोलिक लहान रत्न । काय करावे थोर पाषाण । मृगेंद्राची[13] आकृति लहान । थोर वारण कासया ॥८४॥ जवादिबिडालाचें[14] वृषण सुवास । लहान परी आवडी श्रीमंतांस । रासभाचें थोर बहुवस । न शिवे कोणी तयातें ॥८५॥ मज आधीं न देतां मान । काय करावा भाग मागून । म्हणोनि कैकयी रुसोन । अधोवदन[16] बैसली ॥८६॥ मग बोले वसिष्ठ मुनी । विघ्न होईल येच क्षणीं । तों करींचा[17] पिंड झडपोनी । घारीनें नेला अकस्मात ॥८७॥ हाहाकार जाहला ते अवसरीं । निमिष न लागतां गेली घारी । कैकयी पडे धरणीवरी । आक्रंदत[18] तेधवां ॥८८॥ म्हणे माझें पूर्वकर्म गहन । मज कैचें पुत्रसंतान । अभाग्यासी निधान । जिरेल कोठून सांग पां ॥८९॥

१. मानलेली मुलगी २. शाप देणे किंवा कृपा करणे या दोन्हीस समर्थ ३. भुलवून ४. सूर्य ५. आहुती ६. अग्नी ७. चार शिंगे ८. दोन मस्तके ९. सात हात १०. तीन पाय ११. यज्ञ पुरुष १२. मोक्षदाता व क्षीरसागरात राहाणारा १३. सिंहाची १४. विशेष जातीचे मांजर १५. गाढव १६. खाली तोंड करून १७. हातातील १८. आक्रोश करीत

परम चिंताक्रांत दशरथ । कौसल्येकडे विलोकित । मग कैकयीचें समाधान करीत । पट्टमहिषी[१] तेधवां ॥१९०॥ कौसल्या सुमित्रा दोघी जणी । अर्ध अर्ध विभाग काढोनी । देत्या जाहल्या ते क्षणीं । पूर्ण पिंड कैकयीतें ॥९१॥ जैशा भागीरथी आणि मंदाकिनी । तैशा कौसल्या सुमित्रा दोघीजणी । मत्सर अणुमात्र मनीं । न करिती स्वप्नीं सर्वथा ॥९२॥ जे अत्यंत कुटिल देख । तयांसी स्वप्नींही नाहीं सुख । न कदा मानिती कोणी लोक । सदा अपेशपात्र ते ॥९३॥ असो वसिष्ठें दिधलें तीर्थ । तिघीही पिंड प्राशन करीत । कैकयीच्या कंठी पिंड अडकत । कासाविस जाहली ते ॥९४॥ मग वसिष्ठें शिंपितां तीर्थ । अंतरीं पिंड उतरत । आनंदला राजा दशरथ । दानें देत अपार ॥९५॥ वस्त्राभरणें उदंड दक्षिणा । देवोनि गौरविलें ब्राह्मणां । सकळ ऋषी पावले स्वस्थाना । श्रृंगी आदिकरूनि ॥९६॥ तिघी राण्या जाहल्या गर्भस्थ[२] । आनंदला राजा दशरथ । म्हणे माझें भाग्य उदित । दिसतें पुढें येथोनी ॥९७॥ घारीनें जो पिंड झडपिला । त्याचा वृत्तांत काय जाहला । श्रोतयांनीं आक्षेप केला । कथा समूळ सांगा पां ॥९८॥ तरी केसरीनामें वानर । त्याची स्त्री अंजनी सुंदर । ऋष्यमूकपर्वतीं घोर । तप करीत बैसली ॥९९॥ सात सहस्र वर्षेपर्यंत । मौन धरोनि शुचिष्मंत । आराधिला उमाकांत । प्रसन्न जाहला तपांतीं ॥२००॥ म्हणे अंजनी माग इच्छित । येरी म्हणे देई अक्षय सुत । परम प्रतापी यशवंत । महाभक्त वज्रदेही[३] ॥१॥ मग बोले उमावर[४] । अकरावा जो मी महारुद्र । तुझें उदरीं अक्षय अवतार । धरितों अंजनी जाण पां ॥२॥ ऐकें शुभवदने अंजनी । तूं अंजुळीपात्र[५] पसरुनी । बैसें सावध माझें ध्यानीं । अंतर्दृष्टी[६] करूनियां ॥३॥ सुटेल अद्‌भुत प्रभंजन । साक्षात लोकप्राणेश[७] आपण । प्रसाद देईल आणोन । तो तूं भक्षीं अविलंबें ॥४॥ स्वस्थळा गेला शूलपाणी । ध्यानस्थ बैसली अंजनी । नयन झांकोनि निजमनीं । ब्रह्मानंदें उचंबळें ॥५॥ तंव कैकयीहातींचा पिंड झडपोनि । घारी नेत असतां गगनीं । तों चंडसमीरें[७] ते क्षणीं । पिंड मुखींचा आसुडिला[८] ॥६॥ तो अंजनीच्या करांत । आणोन घातला अकस्मात । तो तत्काळ ती भक्षित । शिवस्मरण करोनियां ॥७॥ घारी ते देवांगना वहिली । नृत्य करितां चांचरी[९] गेली । मग विधीनें[१०] शापिली । घारी होई म्हणोनि ॥८॥ मग ते सुवर्चसा नामें देवांगना । लागे कमलोद्भवाचे[११] चरणा । विधी म्हणे दशरथ राणा । अयोध्येचा नृपवर ॥९॥ त्याच्या मखसमयीं[१२] पिंड झडपितां । उद्धरसील तूं तत्त्वतां । अंजनीकरीं पिंड पडतां । निजस्थाना येसी तूं ॥२१०॥ असो घारी ब्रह्मवरेंकरूनी[१३] । उद्धरोनि पावली स्वस्थानी । इकडे नवमास भरतां अंजनी । प्रसूत जाहली तेधवां ॥११॥ ऋषिपत्न्या पाहती ते वेळां । बळिया तो बाळ जन्मला । कीं वासरमणि प्रकटला । वानरवेषें दैदीप्य ॥१२॥ विद्युत्प्राय[१४] कुंडलें झळकती । गंडस्थळीं पडली दीप्ती । दृढ कौपीन निश्चितीं । कटिप्रदेशीं मौंजी झळके ॥१३॥ तळपतसे यज्ञोपवीत । ऐसें वानररूप अद्‌भुत । मुखीं पुच्छाग्रीं आरक्त । वर्ण दिसत प्रवालसम[१५] ॥१४॥ परम क्षुधाक्रांत[१६] बाळ । चहूंकडे पाहे चंचळ । तों अंजनी उतावेळ । फळें गेली आणावया ॥१५॥ रुदन करी क्षुधित बाळ । तों आरक्त दिसे सूर्यमंडळ । म्हणे हें दिसे उत्तम फळ । उडे चपळ मारुती ॥१६॥

---

१. पट्टराणी कौसल्या २. गरोदर ३. कठीण देहाचा ४. शंकर ५. ओंजळ हेच पात्र ६. ध्यान लावून ७. सोसाट्याचा वारा ८. सोडविला ९. चुकली १०. ब्रह्मदेवाने ११. ब्रह्मदेवाचे १२. यज्ञाच्या वेळी १३. ब्रह्मदेवाच्या वराने १४. विजेसारखी तेजस्वी १५. लाल १६. भुकेलेला

पिंजारल्या रोमावळी[१] । सिंहनादें गर्जे निराळीं । दिग्गजांचीं बैसली[२] टाळीं[३] । आंदोळली वसुंधरा ॥१७॥ स्फुरण दाटलें थोर । गाजवी पुच्छाचा फडत्कार । मागें अंगवातें तरुवर । उन्मळोनि जाती आकाशीं ॥१८॥ चपळ पदद्वय तैसेच हस्त । प्रतापें झेंपावे गगनांत । उड्डाणावर उड्डाण घेत । जात आदित्य लक्षोनियां ॥१९॥ कीं उर्वीवरोनि[४] सुपर्ण । जाय वैकुंठपीठ लक्षून । तैसाचि अंजनीहृदयरत्न[५] । भानुमंडळा आटोपी ॥२२०॥ मनोवेगासी मागें टाकुनी । हनुमंत वेगें जात गगनीं । तों लोकप्राणेश धांवुनी । धरीन म्हणे स्वपुत्रा ॥२१॥ परम तीव्र सूर्यमंडळ । तेजें आहाळेल माझें बाळ । म्हणून धरूं पाहे अनिळ । परी तो चपळ नाटोपे ॥२२॥ मग हिमाचलाचे शीतलांबुकण[६] । मागुन शिंपी प्रभंजन । हनुमंत मुख पसरोन । सूर्याजवळी पातला ॥२३॥ तों ते दिवसीं सूर्यग्रहण । राहु आला मुख पसरोन । मारुतीस क्रोध आला दारुण । सिंहिकासुत[७] देखतां ॥२४॥ म्हणे मी अत्यंत क्षुधित । फळ भक्षावया आलों येथ । हा आला कोण अकस्मात । ग्रासाआड माझिया ॥२५॥ सबळ पुच्छघायेकरून । फोडिलें राहूचें वदन । भिरकाविला पायीं धरून । मूर्च्छा येऊन पडला तो ॥२६॥ जैसा शुंडादंडेंकरून[८] देख । महागज विदारी बिडालक । कीं भुजंगाचे कवेंत मूषक । अकस्मात सांपडला ॥२७॥ राहूचे कैवारें केत[९]। कपीवरी धांवला उन्मत्त । जैसा केसरीपुढें जंबुक येत । आपलें मरण विसरूनियां ॥२८॥ केतु देखतांचि हनुमंतें । तेथेंचि मर्दितां मुष्टिघातें । आंग चुकवोनी वेगें बहुतें । पळता जाहला केतू पैं ॥२९॥ राहु आणि केत । इंद्रापाशीं आले धांवत । अशुद्धें[१०] नाहाले जेवीं पर्वत । सिंदूरेंकरून माखिले ॥२३०॥ आक्रोशें बोलती दोघेजण । तूं सुरेश सहस्रनयन । आम्हांवरी कोप धरून । हें कां विघ्न धाडिलें ॥३१॥ नवा पुच्छराहु[११] करून । आम्हांवरी दिधला पाठवून । आश्चर्य करी शचीरमण[१२] । म्हणे हें कर्तृत्व कोणाचें ॥३२॥ कोणीं केली विपरीत करणी । त्यास संहारावया वज्रपाणी[१२] । त्रिदशसमुदाय घेऊनी । वायुवेगें धांविन्नला ॥३३॥ राहु पुढें पुढें धांवत । मागें देवांसहित अमरनाथ[१२] । तो इकडे अंजनीसुत । सूर्य ग्रासूं धांवतसे ॥३४॥ चळचळां कांपे मित्र[१३] । म्हणे हा कैंचा आला अमित्र । दिनमान सांडोनि दिनकर । पळों न लाहे सर्वथा ॥३५॥ प्रतापरुद्र मारुती । सूर्यमंडळ धरिलें हातीं । हे फळ नव्हे निश्चितीं । म्हणोनि पुढती टाकिलें ॥३६॥ जैसा केवळ वडवानळ । तैसेंच देदीप्यमान सूर्यमंडळ । फळ नव्हे म्हणोनि अंजनीबाळ । टाकीता जाहला पुढती पैं ॥३७॥ माघारा पाहे परतोन । तों राहु आला शक्रास[१४] घेऊन । पुढती क्रोध आला दारुण । म्हणे आतां न सोडीं यासी ॥३८॥ साह्य करून अमरपती[१२] । मजवरी आला पुढती । जैसे शलभ मिळूनि येती । कल्पांतविजू धरावया ॥३९॥ ऐसें बोलत वायुनंदन[१५] । राहूवरी लोटला येऊन । इंद्रादेखतां ताडण । राहूसी केलें बहुसाल ॥२४०॥ जैसा पर्वत पडे अकस्मात । तैसा राहूसी दे मुष्टिघात । ग्रहपूजा यथासांग तेथ । वायुसुतें मांडिली ॥४१॥ राहु आक्रोशें फोडी हांका । म्हणे काय पाहसी अमरनायका । मग शक्रें ऐरावती देखा । अकस्मात प्रेरिला ॥४२॥ जिकडे धांवे ऐरावत । तिकडे भारें उर्वी लवत । कीं दुसरा मेरु मूर्तिमंत । शक्राचें वाहन जाहला ॥४३॥ तों सबळ लोटला ऐरावती । चपळ धावला वीर मारुती । जैसा वज्राघात पर्वतीं । तैसा कुंभस्थळीं[१६] ताडिला ॥४४॥ धाकें ऐरावत तो पळे । पाकशासन निजबळें । ऐरावत आकळितां नाकळे । रान घेतलें भयेंचि ॥४५॥

१. अंगावरील लव २-३. कानठळ्या बसल्या ४. पृथ्वीवरून ५. मारुती ६. थंड पाण्याचे कण ७. राहू ८. सोंडेने ९. केतु ग्रह १०. रक्ताने ११. हनुमंत १२. इंद्र १३. सूर्य १४. इंद्रास १५. मारुती १६. गंडस्थळी

जैसी दुर्बळाची स्त्री नष्ट बहुत । ती न मानी त्याचा वचनार्थ । तैसा इंद्रासी ऐरावत । नाटोपेचि सर्वथा ॥४६॥ असो विवेक करूनि बहुत । काम क्रोध आवरिती महंत । तैसा सहस्राक्षें ऐरावत । पुढती समोर आणिला ॥४७॥ मागुता धांवे पवनसुत । धरी ऐरावताचे चारही दंत । उलथोनि खालीं पाडित । शक्रासहित तेधवां ॥४८॥ हस्तचपेटें[1] हनुमंतें ते वेळीं । शक्राचा किरीट पाडिला भूतळीं । सकळ देवसेना ते काळीं । भयभीत जाहली ॥४९॥ इंद्राची झोटी मोकळी । मागुती ऐरावत आकळी । हनुमंतावरी बळेंचि घाली । परी गज न टाकी पाउल पुढें ॥२५०॥ गज पळे रानोरान । परम घाबरला सहस्रनयन । तो यम हस्तीं दंड घेऊन । हनुमंतावरी धांविन्नला ॥५१॥ यमें दंड प्रेरावा जों ते वेळां । तों मारुति अंगावरी कोसळला । मुष्टिघात हृदयीं दिधला । यम पाडिला धरणीवरी ॥५२॥ वक्ष:स्थळी वळघोनि[2] हनुमंत । पुढती मुष्टिघात प्रेरित । हातींचा दंड हिरोनि घेत । तेणेंचि ताडित तयासी ॥५३॥ यमें धरिले मारुतीचे चरण । म्हणे मी तुजला अनन्य शरण । हस्त जोडूनियां वरुण । स्तुति करीत मारुतीची ॥५४॥ कुबेर धांवोन ते समयीं । लागे हनुमंताचे पायीं । तों ऐरावतारूढ[3] लवलाहीं । शक्र वेगें पातला ॥५५॥ ऐसें देखोनि ते अवसरीं । मारुति धांवे शचीवरावरी[4] । ऐरावतास पुच्छीं धरी । पृथ्वीवरी आपटावया ॥५६॥ पुच्छ धरूनि भोवंडी गज । पृथ्वीसहित कांपती दिग्गज । अवनीवरी देवराज । वज्रासह पाडिला ॥५७॥ बळें गज आपटिला धरणीं । देवांस मांडली महापळणी । कडेकपाटीं[5] जाऊनी । महायोद्धे दडाले ॥५८॥ म्हणती पृथ्वी गेली रसातळा । एकचि हाहाकार जाहला । तों अमरेंद्रें[6] ते वेळां । आव[7] धरिला पुढती पैं ॥५९॥ वज्र बळें भोवंडित । मुखावरी ताडिला हनुमंत । तेणें मूर्च्छना दाटली बहुत । पडे वायुसुत पृथ्वीवरी ॥२६०॥ कनकाद्रीवरून[8] कोसळला । पर्वतदरीमाजी पडला । लोकप्राणेश धांविन्नला । सुत धरिला पोटासीं ॥६१॥ कासाविस वायुनंदन । विकळ पडला अचेतन । वायु रडे स्फुंदस्फुंदोन । पुढें घेऊन हनुमंता ॥६२॥ म्हणे दुर्जन हा अमरेंद्र । तान्हयावरी घातलें वज्र । परम निर्दय पुरंदर[9] । करीन संहार तयाचा ॥६३॥ माझिया तान्हयाचा जातां प्राण । आटीन सकळ त्रिभुवन । जैसे प्रल्हादाकारणें दैत्य संपूर्ण । श्रीनृसिहें आटिले ॥६४॥ वायुआधीन सकळांचे प्राण । आकर्षिले न लागतां क्षण । श्वासोच्छवास कोंडून । केलें त्रिभुवन कासाविस ॥६५॥ मग इंद्र विरिंचि सकळ सुरवर । रमावर[10] आणि उमावर[11] । सकळ प्रजा ऋषीश्वर । शरण आले वायूतें ॥६६॥ पोटासी धरूनि हनुमंत । वायु दिर्घस्वरें रडत । तों ब्रह्मादि देव समस्त । प्राणनाथें[12] देखिले ॥६७॥ हनुमंत कडेवरी घेउनी । वायु उभा राहे ते क्षणीं । तीन्ही देव देखोनि नयनीं । नमस्कार करी तेधवां ॥६८॥ मग बोले कमळासन[13] । पुत्राचा कैवार घेऊन । अवघे जन निर्दाळून । टाकिशी काय प्राणेशा ॥६९॥ येरू म्हणे न उठतां माझा सुत । इंद्रासी आटीन देवांसहित । ऐकोनी हांसे इंदिरानाथ[10] । वर देतसे संतोषोनि ॥२७०॥ पूर्ण पिंडाचा हनुमंत । यासी स्वप्नींही नाहीं मृत्य । ब्रह्मकल्पपर्यंत । चिरंजीव पुत्र तुझा ॥७१॥ मग बोले कर्पूरगौर[11] । माझिये तृतीय नेत्रींचा वैश्वानर । क्षणें जाळील चराचर । परी यासी बाधे ना ॥७२॥ माझीं त्रिशूळादि आयुधें तत्त्वतां । तीं न रुतती हनुमंता । मग विरिंचि होय बोलता । निजवरदान ऐका तें ॥७३॥

१. हाताच्या फटक्याने २. वळून ३. ऐरावतावर बसून ४. इंद्रावर ५. गिरिगुहांत ६. इंद्राने ७. धैर्य ८. मेरू पर्वतावरून ९. इंद्र १०. विष्णू ११. शिव १२. वायूने १३. ब्रह्मदेव

माझें ब्रह्मास्त्र आणि पाश । कदा न बाधितील यास । म्यां जीं शस्त्रें निर्मिली बहुवस । तींही यास न बाधिती ॥७४॥ मग इंद्रही वदे सवेग वर । माझें यासी न बाधे वज्र । हा वज्रदेही साचार । अक्षय अभंग सर्वदा ॥७५॥ हनुवटीस झगडलें वज्र । यास हनुमंत नाम साचार । कुबेर म्हणे बहुत असुर । क्षय पावती हस्तें याच्या ॥७६॥ यम वदे वरदान । यास काळदंड न बाधी पूर्ण । याचे करिती जे नामस्मरण । त्यांसी बंधन न करीं मी ॥७७॥ मग बोले रसाधिपती[१] । अभंग असो यास शक्ती । कधीं श्रम न पावे मारुती । युद्ध करितां बहुसाल ॥७८॥ दिव्य कमळांची सुमनमाळ । न सुके लोटतां बहुकाळ । ती विश्वकर्में[२] तत्काळ । गळां घातली मारुतीच्या ॥७९॥ समस्तीं देऊन वरदाना । गेले आपापले स्वस्थाना । वायूनें हनुमंत ते क्षणां । अंजनीजवळ आणिला ॥२८०॥ मारुतीस हृदयीं धरोनी । स्फुंदस्फुंदोनि रडे जननी । मुखामाजी स्तन घालूनी । वदन कुरवाळी वेळोवेळां ॥८१॥ रामविजय ग्रंथ सुरस । त्यामाजी हनुमंतजन्म विशेष । श्रवण करिती जे सावकाश । ग्रहपीडा त्यांस न होय ॥८२॥ हनुमंतजन्मकथन । निजभावें करितां श्रवण । दुष्टग्रहविघ्नें[३] दारुण । न बाधती कदाही ॥८३॥ पुढें रसाळ कथा बहुत । डोहळे पुसेल राजा दशरथ । अजन्मा[४] जन्मेल रघुनाथ । तोच कथार्थ अवधारा ॥८४॥ जैसें जों जों क्षेत्र पिकत । तों तों कणसें घनदाट दिसत । तैसे प्रसंगाहून प्रसंग बहुत । रसभरित असती पैं ॥८५॥ जयासी नाहीं पुत्रसंतान । त्यानें करावें विजयावर्तन[५] । संतति संपत्ति परिपूर्ण । सदा नांदती त्याचे गृहीं ॥८६॥ येथोनि श्रीरामचरित्रकथा गहन । श्रोतीं परिसावी सावधान । तेणें ब्रह्मानंद ठसावोन । कैवल्यपद[६] पाविजे ॥८७॥ ब्रह्मानंदा श्रीरघुवीरा । विषकंठहृदया[७] परात्परा[८] । वेदवंद्या[९] श्रीधरवरा । दीनोद्धारा[१०] जगद्गुरो ॥८८॥ स्वस्ति श्रीरामविजय ग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकनाटकाधार । श्रवण करोत पंडित चतुर । तृतीयाध्याय गोड हा ॥२८९॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ ओव्या २८९ ॥

## ॥ अध्याय तिसरा समाप्त॥

१. बुध २. विश्वकर्म्यानें ३. दुष्ट ग्रहांमुळे येणारी विघ्ने ४. जन्मरहित ५. दहा पारायणे ६. मोक्ष ७. श्रीशिवाच्या हृदयात राहणारा ८. प्रकृतीच्या पलीकडचा ९. वेदांनाही वंद्य १०. दीनांचा उद्धारकर्ता

## ।। अध्याय चौथा ।।

# श्रीरामचंद्रांचा जन्म

।। श्रीगणेशाय नमः।। श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः। चतुर श्रोते करिती प्रश्न। तृतीयाध्यायीं हनुमंतजनन। सांगितलें तुवां संपूर्ण। कथा अद्भुत नवलचि ।।१।। आणिके पुराणीं साचार । हनुमंतजन्मकथाप्रकार । वेगळाचि असे विचार । पृथक्पृथक् कथियेला ।।२।। तरी पुराणांतरीं विपरीत । कथा पडावया काय निमित्त । याचें प्रत्युत्तर यथार्थ । सांग समस्तां कळावया ।।३।। ऐसें श्रोतयांचें वाग्जाळ । परिसोनियां कवि कुशळ । शब्द बोले अति रसाळ । परिसा सकळ श्रोते हो ।।४।। अनादिसिद्ध[1] अवतारमाळा । जगदीशें गुंफिल्या अवलीळा । जैसें तरंगापूर्वीं जळा । व्यापोनियां असणें कीं ।।५।। जैसी रहाटघटमाळिका[2] । तेवीं हें अवतारचरित्र देखा । कीं भगणें[3] मित्र[4]- मृगांका[5] । प्रदक्षिणा करणें मेरूची ।।६।। कीं जपमाळेचे मणी । तेचि येती परतोनी । तैसे अवतार ब्रह्मांडभुवनीं । फिरती माळेसारिखे ।।७।। तरी कल्पपरत्वें अवतार । जे जे वेळे जें जें चरित्र । तैसेंचि बोलिला सत्यवतीकुमर । कथा साचार तितुक्याही ।।८।। एके अवतारी वर्तलें एक । तों दुसरे अवतारीं विशेष कौतुक । तरी तितुकेंही सत्य देख । विपरीतार्थ न मानिजे ।।९।। रणामाजी महावीर । तैसा जाणिजे कवीश्वर । बहुत श्रोतयांचे भार । परम चतुर सागर जे ।।१०।। सभानायक प्रवीण अत्यंत । करीं संदेहधनुष्य[6] घेत । प्रश्नाक्षरशर[7] सोडित । वक्ता समोर लक्षोनी ।।११।। मग कवीनें धैर्यठाण मांडून । चढविलें स्फूर्तीचें शरासन । शास्त्रसंमताचे बाण । सोडी अभंग अनिवार ।।१२।। सत्त्व ओढी काढूनि सत्वर । क्षमावेशें[8] सोडी शर । परम कौशल्यें साचार । प्रश्नबाण छेदित ।।१३।। श्रोत्यावक्तांचें संधान । तटस्थ पाहती विचक्षण । धन्य धन्य म्हणून । तर्जनी मस्तक डोलविती ।।१४।। आवेशा चढले दोघेजण । सप्रेमें करिती नामस्मरण । तो सघनघोष ऐकून । शंकाश्वापदें दूर पळती ।।१५।। वक्त्याचें वाग्बाण अत्यंत । अर्थगौरवमुख[9] लखलखीत । पद्यरचनापक्षमंडित[10] । सुरंग मिरवत साहित्य ।।१६।। ऐसे शर सुटतां अपार । भेदलें श्रोतयाचें अंतर । डोलविलें तेणें शिर । सुखोर्मीचेनि[11] भरें पैं ।।१७।। वैरभाव नसतां किंचित । हें आनंदाचें युद्ध होत । क्षीराब्धीच्या लहरी मिळत । जैशा एकमेकांसी ।।१८।। निष्कपट श्रोता पुसत । निरभिमान वक्ता बोलत । शब्दकौशल्य युद्ध सत्य । जाणती पंडित विवेकी ।।१९।। देवभक्तांचा अनुवाद । तेथें काय आहे वैरसंबंध । कीं गुरुशिष्यांचा संवाद । आनंदयुद्ध शब्दांचें ।।२०।। असो आतां बहुत युक्ती । चातुर्यसिंधुमंथनपद्धती[12] । वर्म जाणिजे पंडितीं । चातुर्यरीतीकळा ज्या ।।२१।। कवीची घडामोडी बहुत । युक्तिसागरींची रत्नें काढित । एक गव्हाचे प्रकार बहुत । करी जैसी सुगरिणी ।।२२।। एके मृत्तिकेचे घट अपार । एका तंतूचे पट विचित्र । एक हेम बहुत अलंकार । हाटक-घडणार[13] करी जैसा ।।२३।। एके काष्ठीं शिल्पकार । युक्ति दाखवी अपार । तैसा जो कवि चतुर । शब्दसाहित्य विवरी पैं ।।२४।। असो हें सर्व बोलणें । बोलावें लागलें श्रोतयांकारणें । पुढें रघुनाथकथा परिसणें । श्रीधर चतुरां विनवीतसे ।।२५।।

---

१. ज्याला प्रारंभ नाही असा सनातन २. रहाटाच्या लोट्यांची माळ ३. तारका ४. सूर्याला ५. चंद्राला ६. संशयरूपी धनुष्य ७. प्रश्नाची अक्षरे हेच बाण ८. क्षमेने मन भरून येऊन ९. उत्तम अर्थ हेच बाणाचे अग्र १०. काव्य रचना हीच त्या बाणांची पिसे ११. सुखाची ऊर्मी येऊन १२. चातुर्यरूपी समुद्राचे घुसळण करणे १३. सोनार

मागील कथानुसंधान । तृतीयाध्यायीं निरूपण । सांगितलें हनुमंतजन्मकथन । मूळग्रंथआधारें ।।२६।। सिंहावलोकनें तत्त्वतां । श्रोतीं परिसिजे मागील कथा । तिघी राण्या जाहल्या गर्भस्था । कौसल्या सुमित्रा कैकयी ।।२७।। जैसा शुद्धबिजेचा मृगांक । दिवसेंदिवस कळा अधिक । कीं पळोपळीं चढे अर्क । उदयाद्रीहूनि[१] पश्चिमे ।।२८।। कीं करितां संतसमागम । दिवसेंदिवस वाढे प्रेम । कीं औदार्येंकरूनि[२] परम । कीर्ति वाढे सत्वर ।।२९।। तैसे राणियांचे गर्भ वाढती । तों वसिष्ठ बोले दशरथाप्रती । राया धर्मशास्त्रीं ऐसी रीती । डोहळे स्त्रियांसी पुसावे ।।३०।। ऐसें बोलतां ब्रह्मर्षी । हर्ष वाटला रायासी । नमोनि वसिष्ठचरणांसी । राजेंद्र तेव्हां चालिला ।।३१।। जैसा शचीचिया मंदिरांत । वृत्रासुरशत्रु[३] प्रवेशत । तैसाचि अजपाळसुत । कैकयीसदनीं प्रवेशला ।।३२।। पिंडप्राशनाचे काळीं । कैकयी होती रुसली । म्हणोनि राजेंद्र ये वेळीं । तिचे सदनीं प्रवेशला ।।३३।। दूती जाणविती स्वामिनीतें । डोहळे पुसावया तुम्हांतें । नृपति स्वयें येतसे येथें । सुमुहूर्त पाहोनियां ।।३४।। सुंदरपणाचा अभिमान । त्याहीवरी कैकयी गर्भिण । जैसी अल्पविद्या गर्व पूर्ण । तैसें येथें जाहलें ।।३५।। जैसी गारुडियांची विद्या किंचित । परी ब्रीदें[४] बांधिती बहुत । कीं निर्नासिक[५] वाहत । रूपाभिमान विशेष पैं ।।३६।। बिंदुमात्र विष वृश्चिका । परी पुच्छाग्र सदा वरुतें देखा । किंचित ज्ञान होतां महामूर्खा । मग तो न गणी वाचस्पतीतें[६] ।।३७।। खडाणे[७] धेनूसी दुग्ध किंचित । परी लत्ताप्रहार[८] दे बहुत । अल्पोदकें[९] घट उचंबळत । अंग भिजत वाहकाचें ।।३८।। तैसें कैकयीस जाहलें तये वेळीं । प्रीतीनें दशरथ आला जवळी । आपण सेजेवरी निजली । नाहीं धरिली मर्यादा ।।३९।। स्त्री सेवक अपत्य दासी । श्वान मर्कट कुरुपियासी । मर्यादा तुटतां मग सकळांसी । ते अनिवार जाणिजे ।।४०।। म्हणोनि मर्यादा कांहीं तेथ । कैकयी न धरी देखतां दशरथ । तिसी डोहळे पुसे नृपनाथ । उभा समीप राहोनी ।।४१।। म्हणे कैकयी बोल वचन । तुज जें आवडे मनांतून । तें मी समस्त पुरवीन । सत्य जाण प्रियकरे ।।४२।। मग काय बोले ते वेळे । तुम्ही काय पुरवाल माझे डोहळे । माझे मनींचे जे सोहळे । ते पूर्णकर्ता दिसेना ।।४३।। मग बोले अजनंदन[१०] । तुजकारणें वेंचीन प्राण । परी तुझे डोहळे पुरवीन । सत्य जाण सुकुमारे ।।४४।। मग ती म्हणे जी नृपवरा । डोहळे हेचि माझे अवधारा । कौसल्या सुमित्रेचिया कुमरां । दिगंतरा दवडावें ।।४५।। पाठवावे दूर कानना । त्यांचा समाचार पुनः कळेना । आमचें वर्तमान त्यांचिया कर्णां । सहसाही न जावें ।।४६।। राज्य द्यावें माझिया पुत्रा । हेंचि डोहळे होती राजेंद्रा । तुम्ही म्हणाल अधर्म खरा । तरी तो दोष मजवरी घालिजे ।।४७।। मज निंदितील जों जों लोक । तों तों वाटेल परम सुख । समस्त जनां व्हावें दुःख । हेंचि मजला आवडे ।।४८।। ऐसें कैकयी वदे ते अवसरीं । ऐकतां नृप खोंचला[११] अंतरीं । कीं काळिजीं घातली सुरी । कीं अंगावरी चपळा पडे ।।४९।। वचन नव्हे तें केवळ । दुःखवल्लीचें[१२] श्रेष्ठ फळ । कीं संचरलें हळाहळ[१३] । हृदयीं वाटे दशरथा ।।५०।। वाटे पर्वत कोसळला । कीं काळसर्प जिव्हारीं झोंबला । कीं तप्तशस्त्रघाय[१४] पडिला । अंगावरी अकस्मात ।।५१।। कैकयीवचन कलशोद्भव[१५] पूर्ण । प्राशिलें आयुष्यसागरजीवन[१६] । राव घाबरा होय जैसा चतुरानन । वेद हरण केले जेव्हां ।।५२।।

१. पूर्वेकडून २. उदारपणाने ३. इंद्र ४. वल्गना ५. नकटा ६. बृहस्पतीला ७. भाकड ८. लाथेचा मार ९. थोड्याशा पाण्याने १०. दशरथ ११. दुःखी झाला १२. दुःखरूपी वेलीचे १३. महाभयंकर विष १४. तापलेल्या शस्त्राचा घाव १५. अगस्ती १६.आयुष्यरूपी सागराचे पाणी

परम खेद पावला नृपवर । तीस नेदीच प्रत्युत्तर । मग सुमित्रेचें मंदिर । प्रवेशता जाहला ॥५३॥ संसारतापें जे संतप्त । ते संतसमागमें जैसे निवत । तैसाचि राजा दशरथ । सुमित्रासदनीं सुखावला ॥५४॥ तिचें नांव सुमित्रा सती । परी नामाऐसीच आहे रीती । वरकड नांवें जीं ठेविती । तीं तों व्यर्थचि जाणिजे ॥५५॥ नांव ठेविलें उदार कर्ण । आडका[१] वेंचितां जाय प्राण । बृहस्पति नाम ज्यालागून । धड वचन बोलतां न ये ॥५६॥ कमलनयन[२] नाम विशेष । परी दोहीं डोळ्यां वाढले वडस[३] । क्षीरसिंधु[४] नाम पुत्रास । परी तक्र[५] तयासी मिळेना ॥५७॥ नांव ठेविलें पंचानन । तरी जंबुक देखतां पळे उठोन । जन्म गेला मागतां कोरान्न । सार्वभौम नाम तयातें ॥५८॥ नाम ठेविलें जया मदन । तो कुरूप कुलक्षण । तैसी सुमित्रा नव्हे पूर्ण । करणी नामासारिखी ॥५९॥ नृप आला ऐकतां कर्णीं । समोर आली हंसगामिनी । दशरथाचिये चरणीं । मस्तक ठेवी सद्भावें ॥६०॥ स्त्रियांस देव तो आपला नाथ । पुत्रासी माता पिता सत्य । शिष्यासी गुरु दैवत । गृहस्थासी दैवत अतिथि पैं ॥६१॥ म्हणोन सुमित्रेनें अजनंदन । पूजिला षोडशोपचारें करून । उभी ठाकली कर जोडून । अधोवदन सलज्ज ॥६२॥ कैकयीडोहळ्यांचें दुःख प्रबळ । राव विसरला हो सकळ । जैसा बोध ठसावतां निर्मळ । तमजाळ[६] वितुळे पैं ॥६३॥ राजा म्हणे सुमित्रेसी । काय डोहळे होताती मानसीं । ते मज सांग निश्चयेंसीं । कुरंगनेत्रे[७] सुमित्रे ॥६४॥ मग किंचित हास्य करून । बोले सलज्ज अधोवदन । जें ऐकतां सुखसंपन्न । अजनंदन होय पैं ॥६५॥ म्हणे हेच आवडी बहुवस । कौसल्यागर्भी जगन्निवास[८] । अवतरेल जो आदिपुरुष । जगद्वंद्य जगदात्मा ॥६६॥ त्याची अहोरात्र सेवा बरवी । वाटे मम पुत्रेंचि करावी । जाणीव शहाणीव आघवी । ओंवाळावी तयावरूनि ॥६७॥ सेवेपरतें थोर साधन । मम पुत्रासी न माने आन । आपुले अंगाचें हांतरुण[९] । ज्येष्ठसेवनालागीं[१०] करूं ॥६८॥ त्रिभुवनराज्य तृणासमान । त्याहूनि अधिक ज्येष्ठभजन[११] । चारही मुक्ति वाटती गौण । ज्येष्ठसेवेपुढें पैं ॥६९॥ सुधारस त्यजोनि निर्मळ । कोणास आवडेल हळाहळ । उत्तम सांडूनि तांदूळ । सिकता कां हो शिजवावी ॥७०॥ त्यजोनि सुंदर रायकेळें। कोण भक्षील अर्कफळें। कल्पद्रुमीं जो विहंगम खेळे। तो नातळे बाभुळेसी॥७१॥ मानससरोवरींचा हंस पाहीं। तो कदा न राहे उलूकगृहीं[१२]। बुडी दिधली क्षीराब्धिडोहीं। दग्ध वन नावडे तया ॥७२॥ नंदनवनींचा भ्रमर कदाकाळीं। अर्कपुष्पीं रुंजी न घाली। जेणें इंद्रभवनीं निद्रा केली। खदिरांगारीं न निजे तो॥७३॥ रंभेतुल्य जाया चांगली। सांडोनि प्रेत कोण कवळी। तैसी भजनीं आवडी धरिली। कदा विषयीं न रमे तो॥७४॥ म्हणोनि राजचक्रचूडामणी[१३]। माझी आवडी जेष्ठभजनीं । ऐसे सुमित्रेचे शब्द कर्णीं। आकर्णिले दशरथें॥७५॥ वाटे अमृत प्राशन केलें । कीं त्रिभुवनराज्य हातासि आलें । तैसें नृपाचें मन संतोषलें । आलिंगिलें सुमित्रेसी ॥७६॥ म्हणे ऐक सुकुमारे राजसे । चंपककलिके परमडोळसे[१४]। तुवां डोहळे इच्छिले जे मानसें। ते मी सर्वस्वें पुरवीन ॥७७॥ नानाभूषणें अलंकार । ओवाळी तिजवरूनि नृपवर । दानें देवविलीं अपार । सुमित्रेहातीं याचकां ॥७८॥ याउपरी ज्येष्ठ राणी । कौसल्या नामें ज्ञानखाणी। जे पुराणपुरुषाची जननी। ख्याती त्रिभुवनीं जियेची ॥७९॥

१. पैसा. २. कमळासमान सुंदर डोळ्यांचा ३. मोतीबिंदू ४. क्षीरसमुद्र ५. ताक ६. अंधार ७. हरिणाक्षी ८. श्रीविष्णू ९. शय्या १०. वडील बंधु रामासाठी ११. ज्येष्ठांची भक्ती १२. घुबडाच्या घरी १३. चक्रवर्ती राजा १४. सुंदर डोळे असलेली

जे परब्रह्मरसाची मूस[१]। कीं निजप्रकाशरत्नमांदुस[२] ।। क्षीराब्धिजाहृदयविलास[३] । जिनें अंतरीं सांठविला ।।८०।। जो इंदिरावर त्रिभुवनेश्वर। ज्याचे आज्ञाधारक विधी शचीवर[४] । हृदयीं ध्याय अपर्णावर[५] ।। कौसल्याउदरनिवासी जो ।।८१।। असो कौसल्येचे मंदिरीं। प्रवेशता जाहला श्रावणारी[६]। सेवक राहविले बाहेरी । द्वारमर्यादा धरोनियां ।।८२।। कौसल्या ज्ञानकळा परम। तीस अंतर्बाह्य व्यापला राम। चराचर अवघें परब्रह्म। न दिसे विषम कदाही ।।८३।। सांडोनि जागृति सुषुप्ति स्वप्न। नयनीं ल्याली ज्ञानांजन। चराचर अवघें निरंजन-। रूप दिसे कौसल्या ।।८४।। दशरथ प्रवेशोनि अंतरीं । पाहे स्थूळ-वोसरीवरी। मग सूक्ष्मदेह-माजघरीं। न दिसे कदा कौसल्या ।।८५।। कारण-कोठडींत[७] पाहे सादर। तंव तेथें अवघा अंधार ।। मग महाकारण उपरी थोर। त्यावरी नृप चढियला ।।८६।। तेथेंही न दिसे कौसल्या सती। मग चकित पाहे नृपती। जिनें उदरीं सांठवला जगत्पती । तिची स्थिति कळेना ।।८७।। मग परात्पर[८] परसांत। प्रवेशे तेव्हां अजपाळसुत। तों ती बैसली समाधिस्थ। निर्विकल्पवृक्षातळीं[९]।।८८।। अंतरीं दृष्टि मुरडली । वरदळ स्वनाम विसरली । ब्रह्मानंदरूप जाहली । न चाले बोली द्वैताची ।।८९।। जैसा परम सतेज मित्र[१०]। तेथें डाग न लागे अणुमात्र । स्वरूपीं पहुडतां योगेश्वर । ज्ञान राहे ऐलीकडे ।।९०।। कल्पांतविजूस मशक गिळी । पिपीलिका[११] मेरू कक्षेसी[१२] घाली । धेनुवत्स मृगेंद्रा आकळी । एक वेळ घडेल हें ।।९१।। परी चतुरा[१३] विश्वरूपावरी । दृष्टांत न चाले निर्धारीं । श्रोत्रियांचे[१४] यज्ञशाळेभीतरी । कोठें महार प्रवेशेल ।।९२।। वडवानळापुढें कर्पूर जाण । कीं जळनिधिमाजी लवण । तैसी बुद्धि आणि मन । स्वसुखावरी[१५] विरालीं ।।९३।। असो स्वानंदसागरांत ।। कौसल्या पूर्ण समाधिस्थ । जवळी उभा ठाकला दशरथ । पाहे तटस्थ उगाचि ।।९४।। कौसल्या स्वस्वरूपीं लीन । हे दशरथासी नेणवे खूण । म्हणे हे रुसली संपूर्ण । तरीच वचन न बोले ।।९५।। म्हणून राजचक्रचूडामणी । कौसल्येजवळ स्वयें बैसोनी । स्नेहें तीस हृदयीं धरूनी । समाधान करीतसे ।।९६।। तरी ते न उघडी नयन । नाहीं शरीराचें भान । मी स्त्रीपुरुषस्मरण । गेली विसरोन कौसल्या ।।९७।। अलंकार कैंचे एक सुवर्ण । तरंग लटिके अवघें जीवन । तैसें विश्व नाहीं एक रघुनंदन । आनंदघन विस्तारला ।।९८।। ऐसी कौसल्येची स्थिति जाहली । राजा म्हणे हे झडपिली । कीं महद्भूतें पूर्ण घेरली । ओळखी मोडली[१६] इयेची ।।९९।। राजा म्हणे देव ऋषि सिद्ध । इहीं दिधला आशीर्वाद । कीं पोटा येईल ब्रह्मानंद । आदिपुरुष श्रीराम ।।१००।। ऐकतां रामनामस्मरण । कौसल्येनें उघडिले नयन । तों जगदाभास[१७] संपूर्ण । रघुनंदनरूप दिसे ।।१।। राजा म्हणे हो नितंबिनी । कुरंगनेत्रे गजगामिनी । काय जे आवडी असेल मनीं । डोहळे पुरवीन सर्व ते ।।२।। भ्रम टाकीं बोलें वचन । तों कौसल्या बोले गर्जोन । मी जगदात्मा रघुनंदन । कैंचें अज्ञान मजपासीं ।।३।। स्थूळ लिंग आणि कारण । त्याहूनि माझें रूप भिन्न । महाकारण हें निरसून । आत्माराम वेगळा मी ।।४।। द्वैताद्वैत[१८] महाद्वैत[१९] । याहून वेगळा मी अतीत । सच्चिदानंद शब्द जेथ । खुंटोनियां राहिला ।।५।। जीव शिव दोन पक्ष । ध्याता ध्यान लय लक्ष । यांवेगळा मी सर्वसाक्ष । अचिंत्य अलक्ष श्रीराम ।।६।।

१. उत्पत्तिस्थान २. आत्मप्रकाशरूपी रत्नाची पेटी ३. लक्ष्मीपती विष्णू. ४. इंद्र ५. श्रीशंकर ६. दशरथ ७. कारणदेह ८. परात्पर स्थानरूपी परसांत ९. भेदाभेदरहित १०. सूर्य ११. मुंगी १२. काखेत १३. चतुर माणूस असला तरी १४. ब्राह्मणांच्या १५. आत्मानंदाच्या ठिकाणी. १६. नाहीशी झाली. १७. सर्वत्र १८. जीव-शिव यात अद्वैत मानणे १९. जीव, शिव व जगत् सर्व एकच मानणे

राजा म्हणे कौसल्ये ऐकें । मी कोण आहें मज ओळखें । डोहळे पुसावया महासुखें । तुजजवळी बैसलों ॥७॥ येरी म्हणे ज्ञाता ज्ञेय ज्ञान । हें सर्व गेलें आटोन । नाहीं स्त्रीपुरुषनपुंसकपण । मीतूंपण तेथें कैंचें ॥८॥ नृप म्हणे हे महद्भूतें[१] घेरली । ओळखी सर्व मोडली । मग पुसे गोष्ट मागली । धाकुटपणींची तियेतें ॥९॥ राजा म्हणे शशांकवदने । गुणसरिते पद्मनयने । वऱ्हाड बुडवोनि तुज रावणें । नेले होतें आठवतें कीं ॥११०॥ शत्रूचें नाम ऐकता कर्णीं । हांक फोडिली भुजा पिटोनी । म्हणे धनुष्यबाण दे आणूनी । टाकीन छेदोनि दाही शिरें ॥११॥ ताटिका मारूनियां आधी । ऋषियाग पाववीन सिद्धी । महाराक्षस वधोनि युद्धीं । गाधितनय[२] तोषवीन ॥१२॥ शिवचाप परम प्रचंड । मोडूनि करीन दुखंड । माझी ज्ञानशक्ति[३] जे अखंड । पणें जिंकोनि आणीन ते ॥१३॥ जेणें निःक्षत्रिय केली अवनी पूर्ण । त्याचा गर्व हरीन न लागतां क्षण । मी एकपत्नी रघुनंदन । पितृवचन पालक ॥१४॥ मी सेवीन घोर विपिन । परिवारेंसीं त्रिशिरा खर दूषण । क्षणमात्रें टाकीन वधोन । अग्नि तृण जाळी जेवीं ॥१५॥ रिसां[४] वानरांहातीं । लंका घालीन पालथी । माझा वज्रदेही मारुती । परम पुरुषार्थी महावीर ॥१६॥ क्षणें जाळील राक्षसनगर । शत्रूंचीं शिरें छेदीन अपार । पाषाणीं पालाणोनि समुद्र । लंकापुर घेईन मी ॥१७॥ कौसल्या हांक फोडी दारुण । लंकेपुढें माजवीन रण । महाढिसाळ[५] कुंभकर्ण । टाकीन छेदून क्षणार्धें ॥१८॥ सहपरिवारें वधोनि दशशिर[६] । बंदींचे सोडवीन सुरवर । माझा बिभीषण प्रियकर । छत्र धरवीन तयावरी ॥१९॥ स्वपदीं[७] स्थापोनि निजभक्त । मी अयोध्येसी येईन रघुनाथ । आधि[८] व्याधि जरा मृत्य । यांविरहित करीन प्रजा ॥१२०॥ स्त्रीपुरुष-नपुंसकभेद । यांवेगळा मी ब्रह्मानंद[९] । मायाचक्रचाळक शुद्ध । निष्कलंक[१०] अभेद पैं ॥२१॥ मी प्रळयकाळासी शासनकर्ता । आदिमायेचा निजभर्ता । कर्ता हर्ता पाळिता । मजपरता नसेची ॥२२॥ मी अज[११] अजित[१२] सर्वेश्वर । मीच नटलों चराचर । धरोनि नाना अवतार । मी मजमाजी सामावें ॥२३॥ ऐसें ऐकतां दशरथ । म्हणे ही भूतें घेरली यथार्थ । फांटा फुटलासे[१३] बहुत । बडबडत भलतेंचि ॥२४॥ पंचाक्षरी आणा पाचारून । महाराज सद्गुरु ज्ञानघन । तो सरसिजोद्भवनंदन । बोलावून आणा वेगीं ॥२५॥ जेणें दर्भावरी धरिली अवनी । कमंडलु ठेविला सूर्यासनीं[१४] । इंद्रसभेसी नेला वासरमणी । अद्भुत करणी जयाची ॥२६॥ वसिष्ठ आला धांवोन । राजा दृढ धरी चरण । म्हणे कौसल्येसारिखें निधान । भूतें संपूर्ण ग्रासिलें ॥२७॥ म्यां याग केला सायासीं । कीं पुत्र होईल कौसल्येसी । तों मध्येंच हे विवशी । उठली ऋषि काय करूं ॥२८॥ मग म्हणे ब्रह्मसुत । इच्या पोटा येईल रघुनाथ । तीस गोष्टी हे विपरीत । कालत्रयीं घडेना ॥२९॥ अंधकूपीं पडेल तरणी[१५] । कोरान्न मागेल चिंतामणी । सुधारस[१६] गेला कडवटोनी । हें कालत्रयीं घडेना ॥१३०॥ क्षुधेनें पीडिला क्षीरसागर । सुरतरूसी[१७] येईल दरिद्र । तीव्र तपेल रोहिणीवर । हें कालत्रयीं घडेना ॥३१॥ अंधत्व आलें अग्निनेत्रीं । ताम्रनाणें मागे कनकाद्री[१८] । अंत्यज नांदेल श्रोत्रियमंदिरीं । हें कालत्रयीं घडेना ॥३२॥ असो वसिष्ठ कौसल्येजवळी । येऊन विलोकी तये वेळीं । तंव ती श्रीरामरूप जाहली । अंतर्बाह्य समूळ ॥३३॥

---

१. मोठ्या भुताने २. ऋषी विश्वामित्र ३. सीता ४. अस्वले ५. अगडबंब ६. रावण ७. आत्मस्थानी ८. आधिदैविक संकट ९. आत्मानंद १०. कलंक नसलेला ११. जन्म नसलेला १२. जिंकला न जाणारा १३. बुद्धी भरकटली १४. सूर्याच्या जागी १५. सूर्य १६. अमृत १७. कल्पवृक्षाला १८. मेरू पर्वत

न दिसे स्त्रियेची आकृती । धनुष्यबाण घेऊनि हातीं । आकर्ण नयन विराजती । देखे मूर्ति जगद्वंद्य[1] ।।३४।। मूर्ति पाहतां आनंदघन । सद्गद जाहला ब्रह्मनंदन । अष्टभावें दाटला पूर्ण । गेला विसरोनि देहभाव ।।३५।। वसिष्ठ कौसल्या ते अवसरीं । मुरालीं ब्रह्मानंदसागरीं । दशरथ परम अंतरीं । घाबरा जाहला नेणोनियां ।।३६।। वसिष्ठासारिखा महामुनी । भूतें झडपिला ये क्षणीं । या भूताची करता झाडणी । कोणी त्रिभुवनीं दिसेना ।।३७।। मी हतभाग्य संपूर्ण । मज कैंचें पुत्रसंतान । कौसल्याही गेली झडपोन । ब्रह्मानंदें मूर्च्छित ।।३८।। निरपराध वधिला श्रावण । तेणें हें दु:ख देतो दारुण । ऐसा तो महाराज अजनंदन । जळाला पूर्ण अंतरी ।।३९।। तों स्वानंदलहरी[2] जिरवून । वसिष्ठें उघडिले नयन । राजा धांवोन धरी चरण । आनंद न माय अंतरीं ।।१४०।। रायासी कैसी परी जाहली । कीं पूरीं बुडतां नौका आली । अंधकूपीं पडतां तात्काळी । हस्त सूर्ये दीधला ।।४१।। सर्प डंखितां गरुड धांवें । गजें कोंडितां केसरी पावे । कीं क्षुधितापुढें हेलावे । क्षीरसागर येऊनियां ।।४२।। कीं वणव्यांत जळतां वरुषे घन ।। कीं हुडहुडी भरतां धडके कृशान[3] । कीं दारिद्र्यें पीडितां लक्ष्मी आपण । घरीं येऊन बैसली ।।४३।। ऐसा आनंदला राजा दशरथ । म्हणे सद्गुरु स्वामी तूं समर्थ । मज नवल हें वाटत । तुजही भूतें झडपिलें ।।४४।। आम्ही अत्यंत भाग्यहीन । कैचें देखों पुत्रसंतान । मग हास्यमुख ब्रह्मनंदन । काय गर्जोन बोलत ।।४५।। जो नीलग्रीवहृदयरत्न[4] । जो कमलोद्भवाचें[5] देवतार्चन । सनकादिक करोनि यत्न । हृदयसंबळींत[6] वाहती पैं ।।४६।। तो वैकुंठपुरविलासी[7] । आला कौसल्येच्या गर्भासी । मारूनि सकळ दुष्टांसी । देव सोडवील बंदींचे ।।४७।। जें जें कौसल्या बोलिली सत्य । तितुकें होईल यथार्थ । तुज होतील चार सुत । सत्य वचन राजेंद्रा ।।४८।। शंख चक्र शेष नारायण । चतुर्धा रूपें प्रकटेल जगज्जीवन । ज्याची कथा ऐकतां पापी जन । उद्धरोनि तरतील ।।४९।। माध्यान्हा येईल चंडकिरण । पुष्य नक्षत्र साधून । अवतरेल रघुनंदन । पूर्णब्रह्म जगद्गुरू ।।१५०।। ऐसीं वसिष्ठाचीं वचनें । कीं स्वानंदनभींचीं[8] उडुगणें[9] । कीं सत्यवैरागरींचीं[10] रत्नें । निवडोनि दिधलीं दशरथा ।।५१।। तेणे कर्णद्वारें त्वरित । सांठविलीं हृदयसंदुकेंत[11] । धांवोनि गुरूचे पाय धरीत । म्हणे कृतार्थ जाहलों मी ।।५२।। असो भरलिया नवमास । प्रसूतिसमय कौसल्येस । कवण ऋतु कवण दिवस । सावकाश ऐका तें ।।५३।। वसंतऋतु चैत्र मास । शुक्लपक्ष नवमी दिवस । सूर्यवंशी जगन्निवास । सूर्यावासरीं जन्मला ।।५४।। माध्यान्हा आला चंडकिरण । पुष्य नक्षत्र साधून । अवतरला रघुनंदन । पूर्णब्रह्म जगद्गुरु ।।५५।। श्रीराम केवळ परब्रह्म । त्यासी जाहला म्हणतां जन्म । संत हांसतील परम । तत्त्वज्ञानवेत्ते[12] जे ।।५६।। ज्याची लीला ऐकतां अपार । खंडे[13] जन्म मृत्यु दुर्धर । त्या रामासी जन्मसंसार । काळत्रयीं घडेना ।।५७।। दाविली लौकिक करणी । कीं कौसल्या जाहली गर्भिणी । तो ब्रह्मानंद मोक्षदानी । जन्मकर्म त्या कैंचें ।।५८।। क्षीरसागरींहून नारायण । येऊन अयोध्येसी जाहला सगुण । शेषलक्ष्मीसहित जगज्जीवन । तैसाचि तेथें संचरला ।।५९।। जो अनंतकल्याणदायक । अज अजित निष्कलंक । भक्त तारावयासी देख । जगन्नायक अवतरला ।।१६०।।

१. श्रीविष्णू २. आत्मानंदाच्या लहरी ३. अग्नी ४. शिवहृदयात वास करणारा ५. ब्रह्मदेवाचे ६. हृदयरूपी पवित्र वस्त्रात ७. विष्णू ८. स्वानंद हेच आकाश ९. नक्षत्रे १०. सत्याची खाण ११. हृदयरूपी पेटीत १२. तत्त्वज्ञानी १३. नष्ट होतात

देव करिती जयजयकार । करील राक्षससंहार । म्हणती आतां अवतरेल हा रघुवीर । बंधमुक्त करील आम्हां ॥६१॥ असो अयोध्यापुरीं निराळीं । विमानांची दाटी जाहली । दुंदुभींची घाई लागली । पुष्पें वर्षती अपार ॥६२॥ असो ते कौसल्या सती । बैसली असतां एकांतीं । तों आठ वरुषांची मूर्ती । सन्मुख देखे अकस्मात ॥६३॥ निमासुर[१] वदन सुंदर । तेजें भरलें निजमंदिर । ज्या तेजासी शशि मित्र । लोपोनि जाती विलोकितां ॥६४॥ पदकमलमकरंदसेवना[२] । भ्रमरी[३] जाहली क्षीराब्धिकन्या[४] । कदाही न विसंबे चरणां । कृपण धनालागीं जैसा ॥६५॥ संध्याराग[५] अरुण[६] बालार्क[७] । दिव्य रत्नांचे काढिले रंग देख । तळवे तैसे सुरेख । श्रीरामाचे वाटती ॥६६॥ चंद्र क्षयरोगें कष्टी होउनी । निजांगाचीं दश शकलें करोनी । सुरवाडला[८] रामचरणीं । स्वानंदधणी[९] घेतसे ॥६७॥ रमा पदीं रंगली दिवसनिशीं । तों बंधु[१०] पाहुणा आला शशी । तोही राहिला अक्षय व्हावयासी । न जायचि माघारा ॥६८॥ ध्वज वज्रांकुश पद्म । ऊर्ध्वरेखा चक्रादि चिन्हें उत्तम । यांचा अर्थ ऐकता परम । सुख होय भक्तांसी ॥६९॥ सात्त्विक प्रेमळासी देखा । ऊर्ध्व संकेत दावी ऊर्ध्वरेखा । सत्यशील धार्मिकां भाविकां । ऊर्ध्वपंथ दावित ॥१७०॥ विद्यामदें मत्त गज । एक भाग्यमदें डुलती सहज । त्यांसी आकर्षावया सहज । अकुंश पायीं झळकतसे ॥७१॥ पायीं झळके दिव्य पद्म । तें पद्मेचें अक्षय धाम । ते जगमाऊली सप्रेम । तये पदीं सुरवाडली ॥७२॥ अहंकार जड पर्वत । शरणांगतां बाधक यथार्थ । तो फोडावयासी तळपत । वज्र पायीं रामाच्या ॥७३॥ भवसागर तरावया गहन । जहाज अद्भुत रामचरण । त्यावरी ध्वज विराजमान । रात्रंदिन तळपतसे ॥७४॥ काम क्रोध दुर्धर असुर । त्यांचे छेदावया शिर । देदीप्यमान दिव्य चक्र । श्रीरामतळवां झळकतसे ॥७५॥ मळरहित प्रपद[११] सुंदर । घोंटी त्रिकोण यंत्राकार । इंद्रनीळ उपमा साचार । न पुरती कठीण म्हणोनियां ॥७६॥ पदतलें[१२] आरक्त साजिरीं । वसे तेथें सरसिजोद्भवकुमरी । विश्रांति घ्यावया अहोरात्रीं । रामचरणीं रंगली हो ॥७७॥ किती पापें हरावीं दिवसरजनीं । म्हणोनि श्रमली जन्हुनंदिनी । शुभ वांकीरूप होउनी । रामचरणीं विराजे ॥७८॥ मांड्या सुकुमार सांवळिया । तेथें सुरवाडली मित्रतनया[१३] । कीं यमानुजा[१४] अपवाद चुकवावया । महदाश्रय करीतसे ॥७९॥ ऐसी रामपदीं त्रिवेणी साचार । प्रयाग तीर्थराज पावन थोर । प्रेमें माघमासीं सभाग्य नर । प्रात:स्नानासी धांवती ॥१८०॥ भक्त मुमुक्षु साधक संत । हेचि राजहंस विराजत । वांकीवरी रत्नें तळपत । तेचि तपस्वी तपताती ॥८१॥ चरणध्वज झळके स्पष्ट । तोचि जाणिजे अक्षयवट । जेथें सनकादिक वरिष्ठ । क्षेत्रसंन्यासी जाहले ॥८२॥ प्रयागीं मोक्ष देह त्यागितां । येथें मोक्ष श्रवण करितां । देहीं असतां विदेहता । येत हाता भक्तांच्या ॥८३॥ त्या प्रयागीं कष्ट बहुत । येतां जातां भोगिती अमित । हा प्रयाग ध्यानीं अकस्मात । प्रकटे सत्य भक्तांच्या ॥८४॥ तोडर वांकी नूपुरें । असुरांवरी गर्जती[१५] गजरें । वाटे नभ गाळोनि एकसरें । पोटऱ्या जानू वोतिल्या ॥८५॥ कीं सरळ कर्दळीचे स्तंभ । कीं गरुडपाचूंचे उगवले कोंभ । कीं इंद्रनीळ गाळोनि सुप्रभ । जानू जंघा वोतिल्या ॥८६॥

---

१. कोमल २. चरणरूपी कमलांचा सुगंध सेवन करण्यासाठी ३. भुंगी ४. लक्ष्मी ५. संध्याकाळचे आकाशातील रंग ६. अरुणोदयाचे रंग ७. बालसूर्य ८. सुखाने राहिला ९. आत्मानंदाचा लाभ १०. चंद्र हा लक्ष्मीचा भाऊ ११. पावलांचा वरचा भाग १२. पायाचे तळवे १३. यमुनानदी १४. यमाची धाकटी बहीण यमुना १५. नूपुर आदींचा ध्वनी हीच रणगर्जना

मिळाल्या सहस्र चपळा । तैसा कांसे झळके पीतांबर पिंवळा । वरी तळपे कटिमेखळा[१] । पाहतां डोळां आल्हाद ॥८७॥ कटिमेखळेवरी महामणी । कीं पंक्तीं बैसले वासरमणी[२] । दाहकत्व सांडूनि जघनीं । श्रीरामाच्या लागले ॥८८॥ वेदांतींच्या श्रुति गहन । अर्थ बोलती जेवीं शोधून । तैशा क्षुद्रघंटा[३] रुणझुण । शब्द करिती रसाळ ॥८९॥ देखून कटिप्रदेश सुकुमार । लाजोनि वना गेला मृगेंद्र । वाटे त्या दुःखें स्वशरीर । वाहन केलें दुर्गेचें ॥१९०॥ गंभीरावर्त[४] नाभिस्थान । जेथें जन्मला चतुरानन । सत्त्व रज तम गाळून । त्रिवळी वरी विराजे ॥९१॥ कौस्तुभतेज अपार । पाहतां भुलती शशिमित्र । गुणीं ओंविलीं नक्षत्रें समग्र । मुक्ताहार डोलती तेवीं ॥९२॥ कीं त्या मुक्तांच्या माळा बहुत । रघुपतीच्या गळां डोलत । कीं मुक्तारूपें समस्त । अनंत ब्रह्मांडें गुंफिलीं ॥९३॥ मुक्तामाळांचें तेज गहन । परी त्यांचा पालटला वर्ण । दिसती इंद्रनीळासमान । श्यामलांगीं[५] रघुपतीच्या ॥९४॥ नीळ गगनावरी सुंदर । मंदाकिनीओघ[६] दिसे शुभ्र । तैसा अम्लान सुमनहार । श्यामतनुवरी शोभत ॥९६॥ कीं मेघीं स्थिरावली क्षणप्रभा[७] । तैशी वैजयंतीची शोभा । सहस्रमुखाच्या जिभा । गुण वर्णितां शिणल्या हो ॥९७॥ अनंत भक्त हृदयीं धरिले । तरीच वक्षःस्थळ रुंदावलें । ब्रह्मानंद मुरोनि वोतिलें । हृदयस्थान सत्य पैं ॥९८॥ श्रीवत्स झळके सव्यांगीं[८] । श्रीनिकेतन[९] वामभागीं । उटी शोभे श्यामलांगी । कोण्या दृष्टांतें तें ऐका ॥९९॥ मित्रकन्येवरी[१०] जान्हवीजळ[११] । कीं राकाइंदुप्रभेनें शोभे निराळ । कीं देदीप्य मणि इंद्रनीळ । आवरण त्यावरी काश्मीराचें ॥२००॥ कीं हाळाहळ जाहलें अपार । म्हणोनि धांवला कर्पूरगौर[१२] । चंदनरूपें तो प्राणमित्र[१३] । श्यामलांगीं जडला हो ॥१॥ तैसी उटी दिसे सुढाळ । कीं चंद्रबिंब उकले निर्मळ । कीं मुक्ताफळांचा गोळा सुढाळ । इंद्रनीळा चर्चियेला ॥२॥ शंख चक्र धनुष्य बाण । चोहों हस्तीं शोभायमान । हस्तकटकांचे[१४] तेजेंकरून । उजळीत नभातें ॥३॥ क्षणप्रभेचीं चक्रें तळपती । तैशा मुद्रिका करीं झळकती । किंवा औपासक यंत्रे रेखिती । तेचि गती येथें दिसे ॥४॥ प्रळयाग्नीनें उघडिले नयन । तेवीं कीर्तिमुखें[१५] परिपूर्ण । कीं निष्कलंक रोहिणीरमण । पदक हृदयीं डोलतसे ॥५॥ कंबुकंठ[१६] अति शोभत । नासिक सरळ सुकुमार बहुत । मंदस्मितवदन विराजत । कोटि मन्मथ ओंवाळिजे ॥६॥ विद्रुमवर्ण[१७] अधर सतेज । माजी ओळीनें झळकती द्विज[१८] । त्या तेजें शशि नक्षत्रें तेजःपुंज । झांकोळती पाहतां ॥७॥ त्रैलोक्यींचा मेळवोनि आनंद । वोतिलें रामाचें वदनारविंद[१९] । आकर्ण नेत्र भ्रुकुटी विशद[२०] । धनुष्याकृती शोभती ॥८॥ स्वानंदसरोवरींचीं कमलदलें । तैसे आकर्ण नयन विकासले । ज्या कृपादृष्टीनें निवाले । प्रेमळ जन सर्वही ॥९॥ कुंडलें तळपती मकराकार । कीं जडले रवि रोहिणीवर । कीं अंगिरापुत्र[२१] भृगुपुत्र[२२] । विचार पुसती रामातें ॥२१०॥ कीं वेदसागरींच्या[२३] रत्नज्योती[२४] । पूर्वउत्तर मीमांसा निश्चितीं । कुंडलरूपें जाणविती । अर्थविशेष स्वामीतें ॥११॥ श्रीरामतनु सुकुमार । तेणें शोभती अलंकार । पीतवर्ण टिळक सुंदर । अनुपम्य रेखिला ॥१२॥ सुवर्णोदक[२५] नदीचा पूर । नीलगिरिपाठारीं[२६] निरंतर । तैसा टिळक सुंदर । विशाळ भाळीं[२७] झळकतसे ॥१३॥ जैसा कल्पांतींचा दिनकर । तैसा मुकुट दिसे जाज्वल्य थोर । तेज तळपतसे अपार । दिगंतरींही[२८] न समाये ॥१४॥

१. कमरपट्टा २. सूर्य ३. घागऱ्या ४. खोल ५. सावळ्या अंगी ६. गंगेचा प्रवाह ७. वीज ८. हृदयाच्या उजव्या अंगाला ९. लक्ष्मीच १०. यमुनेवर ११. गंगेचे पाणी १२. शिव १३. प्राणप्रिय शंकर १४. हातावरील कडे १५. एक दागिना १६. सुंदर कंठ १७. लाल १८. दात १९. वदनरूपी कमळ २०. स्पष्ट २१. बृहस्पती २२. शुक्र २३. वेदरूपी सागरातील २४. रत्नांचे तेज २५. सोन्याचे पाणी २६. नीलगिरीच्या पठारावर २७. कपाळावर २८. चहूकडे

दावाग्नीचे कल्लोळ भडकत । तैसें उत्तरीय वस्त्र रुळत । दशांप्रति मुक्तें झळकत । कृत्तिकापुंजासारखी ॥१५॥ तें परम तेजाळ क्षीरोदक । कीं शुभ्र यशा चढलें बीक[१] । शुभ्रश्वेत मृडानीनायक[२] । कर्पूरेंकरूनि उटिला कीं ॥१६॥ कीं दिव्य रजत तगट घडलें । कीं पारदें[३] कैलास डवरिलें[४] । कीं जान्हवीतोयें ओपविलें । दिनकरनाथें स्वहस्तें ॥१७॥ सच्चिदानंदतनु सगुण । अतसीकुसुमाभास[५] पूर्ण । त्याचि रंगेंकरून । नीलोत्पलें राबविलीं ॥१८॥ नभासी चढला तोच रंग । त्याचि प्रभेनें रंगले मेघ । इंद्रनीळही सुरंग । त्याच प्रकाशें प्रकाशले ॥१९॥ तेथींचें सौंदर्य अद्भुत । गरुडपाचूंचे तेज दिसत । मर्गजासी बीक चढत । तनु सांवळी देखोनियां ॥२२०॥ तो वैकुंठींचा वेल्हाळ सुंदर । भक्तमंदिरांगणमंदार[६] । कुरवंडी करूनि सांडावे साचार । कोटि मकरध्वज वरोनियां ॥२१॥ ब्रह्मांड फोडोनि बाहेरी । अंगींचा सुवास धांवणें करी । लावण्यामृतसागर[७] कैटभारी । लीलावतारी साधक जो ॥२२॥ पूर्णब्रह्मानंद रघुवीर । लीलाविग्रही श्रीधरवर । हृदयीं रेखिला निरंतर । निजभक्तीं प्रेमभरें ॥२३॥ असो कौसल्या बोले ते अवसरीं । भक्तवत्सला मधुकैटभारी । तूं आतां बाळवेष धरीं । माझे उदरीं अवतरें ॥२४॥ लोक म्हणतील कौसल्यानंदन । ऐसा होई तूं मनमोहन । कमलदलराजीवनयन[८] । हास्यवदन विलोकीं ॥२५॥ सजलजलदवर्ण[९] कोमळ । कौसल्येपुढें जाहला बाळ । तवं ते परम सुवेळ । पुष्यार्कयोग ते समयीं ॥२६॥ जो क्षीरसागरवासी तमालनीळ[१०] । तो कौसल्येपुढें जाहला बाळ । चरणांगुष्ठ[११] धरोनि कोमळ । मुखकमळीं घालीतसे ॥२७॥ भक्त चरणीं लागले बहुत । गोड गोड म्हणोन वाखाणित । यालागीं गोडी रघुनाथ । स्वयें पाहत चाखोनियां ॥२८॥ कीं स्वचरणगोडी[१२] सेवित । भक्तांसी लोभ लागावया बहुत । म्हणोनियां कौसल्यासुत । कौतुकार्थ दावीतसे ॥२९॥ पुत्र झाला कौसल्येस । लागला वाद्यांचा एकचि घोष । सुरांसहित सुरेश । जयजयकार नभीं करिती ॥२३०॥ सुमनसंभार ते अवसरीं । देव वर्षती अयोध्येवरी । दुंदुभिनाद अंबरीं । न समायेचि तेधवां ॥३१॥ हळदीकुंकुमें ताटें भरोनी । बिदोबिदीं धांवती सुवासिनी । पावल्या कौसल्येच्या सदनीं । वेगेंकरोनि तेधवां ॥३२॥ मंगळतुरांचा[१३] एकचि नाद । घरोघरीं होता ब्रह्मानंद । ते समयींचा आनंद । भोगींद्र वर्णू शकेना ॥३३॥ आनंदला ब्रह्मनंदन । चहूंकडोन धांवले ब्राह्मण । जैसा क्षीरसागर देखोन । क्षुधार्थी वेगें धावती ॥३४॥ कीं महापर्वकाळ प्रगटला । प्रयागासी धांवे भक्तमेळा । कीं गांवासमीप परीस निघाला । दुर्बळ धांवती घ्यावया ॥३५॥ कीं तृषाक्रांत गोभार[१४] सकळी । धांवती जैसे गंगाजळीं । की वृक्ष दाटले देखून फळीं । विहंगम[१५] जैसे झेपावती ॥३६॥ तैसी ब्राह्मणांची ते काळीं । दाटी जाहली राजाजवळी । पुत्रमुख पहावया ते वेळीं । दशरथराव चालिला ॥३७॥ दशरथ म्हणे याचकांसी । जे जे इच्छा असेल मानसीं । ते ते मागा मजपाशी । येच समयीं देईन ॥३८॥ भांडारें फोडिलीं बहुत । याचकांसी म्हणे दशरथ । मोटा[१६] बांधोनि अमित । आवडे तितुकें न्या आतां ॥३९॥ समागमें घेऊन ब्राह्मण । महाराज तो अजनंदन[१७] । प्रवेशला आनंदेकरून । कौसल्यासदनीं तेधवां ॥२४०॥ दशरथें करोनियां स्नान । केलें आधीं पुण्याहवाचन । पहावयासी पुत्रवदन । राजा जवळी पातला ॥४१॥

१. कळस २. शंकर ३. पाऱ्याने ४. शोभिवंत केले ५. अतसीच्या फुलांसारखे ६. भक्तांच्या घरापुढील अंगणातील मंदार वृक्ष ७. सौंदर्यरूपी अमृताचा सागर ८. कमलनयन ९. मेघश्याम १०. तमालपत्रा समान सावळा ११. पायाचा अंगठा १२. आपल्या चरणांची गोडी १३. मंगलवाद्यांचा १४. गायींचा कळप १५. पक्षी १६. गाठोडे १७. दशरथ

श्रीरामवदन ते अवसरीं । न्याहाळितां तोषला अंतरी । मधुबिंदु घालोनि मुखाभीतरीं । मधुकैटभारी तोषविला ।।४२।। श्रीरामाचें जातक । करी तेव्हां नृपनायक । गोभूरत्नें[१] असंख्य । मग देत याचकांसी ।।४३।। रत्नजडित सिंहासन । त्यावरी माय[२] बैसे श्रीराम घेऊन । मृगांकवर्ण[३] चामरें जाण । दोघी ढाळिती दोहींकडे ।।४४।। पीकपात्र धरुनी हातीं । समीप बैसे एक दूती । कनकांबराची[४] घेऊन बुंथी[५] । बैसली सती कौसल्या ।।४५।। भोंवते वेष्टिले विद्वज्जन । जाणती जे भविष्यज्ञान । सातशतें स्त्रिया धांवोन । येत्या जाहल्या दशरथाच्या ।।४६।। जैशा केवळ विद्युल्लता । तैशा अलंकारवस्त्रमंडिता[६] । पाळा[७] कौसल्येभोवत्या । शोभल्या कैशा ते वेळीं ।।४७।। महामाया आदिभगवती । तीभोंवत्या मिळाल्या अनंत शक्ती । कीं सूर्यचक्रासी वेष्टिती । किरणें जैसी तयापरी ।।४८।। वसिष्ठ गुरु होऊनि पुढें । विलोकी श्रीरामाचें रूपडें । जे जे जन्मकर्मनिवाडे[८] । ते रायापुढें सांगत ।।४९।। म्हणे हा क्षीरसागरविहारी । जन्मला कौसल्येचे उदरीं । निजजन तारावयासी निर्धारीं । अवतरला आदिपुरुष ।।२५०।। द्वादश वर्षे यासी भरतां । एक द्विज येईल अवचिता । प्रार्थोनियां दशरथा । घेऊन यासी जाईल ।।५१।। आरंभीं सोडोनि एक बाण । एक राक्षसी वधील दारुण । गोब्राह्मणमखपाळण[९] । करील जाण पुत्र तुझा ।।५२।। कृशान[१०] प्रवेशे शुष्कविपिनीं[११] । तैसा जाळील राक्षस मखरक्षणीं[१२] । पुढें चरणस्पर्शेंकरूनी[१३] । एक ललना उद्धरील ।।५३।। परम प्रचंड कोदंड । तें स्वदंडबळें करील दुखंड । एकपत्नीव्रत प्रचंड । वीर होईल त्रिभुवनीं ।।५४।। महायोद्धा एक ब्राह्मण । त्यास जिंकील न लगतां क्षण । बंधुसहित परतोन । अयोध्येसी येईल ।।५५।। राज्यीं बसतां हा वरिष्ठ । मग एक होईल अरिष्ट । नगरलोक पावती कष्ट । खेद उत्कट करितील ।।५६।। हा नरवीर पंचानन । प्रेमें पाळील पितृवचन । मग स्त्रीसमवेत कानन । चतुर्दश वर्षे सेवील ।।५७।। हा नसतां आश्रमांत । एक राक्षस येईल अकस्मात । याचे स्त्रियेस नेईल सत्य । षण्मासपर्यंत[१४] निर्धारें ।।५८।। मग हा स्त्री शोधितां अरण्यांत । वानर मिळतील अकस्मात । एक वानर उन्मत्त । त्यास मारील हा न कळतां ।।५९।। ब्रह्मांड नाचवील नखाग्रीं । ऐसा एक वानरकेसरी[१५] । जाऊन समुद्रसंभवपुरीं[१६] । महाप्रयत्न करील तो ।।२६०।। शुद्धि[१७] आणितां राघवेंद्र । पाषाणीं पालाणील समुद्र । शरण येईल एक रजनीचर[१८] । चिरंजीव त्यासी करील हा ।।६१।। मारूनि राक्षसां सकळां । सोडवील सुरांच्या बंदिशाळा । मागुती येईल स्वस्थळा । अयोध्यापुरा गजरेंसीं ।।६२।। अकरा सहस्र संवत्सर । राज्य करील हा राजेंद्र । पुढें पुत्रासीं युद्ध थोर । करील कौतुकेंकरूनियां ।।६३।। शेवटीं अयोध्या विमानीं घालोनी । नेऊन ठेवील वैकुंठभुवनीं । ऐसें जातक ऐकोनि कर्णीं । राव दशरथ तोषला ।।६४।। स्तनपान करितां रघुनंदन । पाहे वसिष्ठाकडे परतोन । कीं वाल्मीकभाष्य संपूर्ण । कथिलें येणें अवलीलें ।।६५।। तों सुमित्रेसी जाहला पुत्र । म्हणोनि धांवत आले विप्र । क्षीरसागरींहूनी श्रीधर । कौसल्यामंदिरीं पातला ।।६६।। तंव तो भोगींद्र[१९] पाळती घेत । पाठिराखा पातला त्वरित । सुमित्रेचे शेजे रिघत । बाळदशा धरोनियां ।।६७।। सुमित्रा स्वप्न देखत । कीं मज जाहला सुलक्षण सुत । सावध होवोनियां पाहत । पुढें खेळत बाळक तो ।।६८।। ऐसा जन्मला सुमित्रानंदन । विप्रांसहित दशरथ येऊन । तत्काळ केलें पुण्याहवाचन । जातकर्मादि सर्वही ।।६९।। कैकयीसी जाहले दोन कुमर । ते विष्णूचे शंखचक्रअवतार । परी कैसे जन्मले तो विचार । कैकयीस नेणवे[२०] ।।२७०।।

१. गायी, जमीन व रत्ने २. कौसल्या ३. चंद्रासारखे शुभ्र ४. पीतवस्त्राची ५. ओढणी ६. वस्त्रे व भूषणे यांनी सजलेल्या ७. समूह ८. भावी आयुष्यात काय काय करणार त्यासंबंधी भविष्य ९. गायी, ब्राह्मण व यज्ञ यांचे पालन करणारा १०. अग्नी ११. वाळलेल्या अरण्यांत १२. यज्ञरक्षणार्थ १३. पायाच्या स्पर्शाने १४. सहा महिने १५. श्रेष्ठ वानर १६. लंकेत १७. सीतेचा शोध १८. राक्षस (बिभीषण) १९. शेष २०. कळले नाही

सुषुप्तीमाजी कैकयी निमग्न । जैसा पंकगर्तेंत[1] पाषाण । पुत्र येऊनि दोघेजण । दोहीकडे खेळताती ॥७१॥ दासी येऊन कैकयीप्रती । थापटोनि जागी करिती । दोघे पुत्र जन्मले निश्चितीं । सावध होऊनि पाहें पां ॥७२॥ कैकयी पाहे पुत्रमुख । तों मित्र[2] आणि मृगांक[3] । तेवीं दोघे खेळती बाळक । देखतां सुख वाटलें ॥७३॥ रायें तेथेंही येऊन । अवलोकिले दोघे नंदन । सुखी केले याचकजन । वस्त्राभरणेंकरूनियां[4] ॥७४॥ बारा दिवसपर्यंत । महोत्साह राव करीत । मंगळतुरें गर्जत । रात्रंदिवस राजगृहीं ॥७५॥ तेरावें दिवशीं वसिष्ठऋषी । नामकरण ठेवी चौघांसी । कौसल्येचा राम तेजोराशी[5] । जो वैकुंठवासी जगदात्मा ॥७६॥ सुमित्रेचा नंदन । त्याचें नाम ठेविलें लक्ष्मण । जो काद्रवेयकुलभूषण[6] । विष्णू शयन ज्यावरी करी ॥७७॥ कैकयीचे जे कां सुत । भरत शत्रुघ्न निश्चित । चौघे दाशरथी[7] जगविख्यात । ऐका चरित्र तयांचें ॥७८॥ ज्यांची जन्मकर्मलीला[8] ऐकतां । पळ सुटे सर्व दुरितां । जैसा महाप्रभंजन सुटतां । जलदजाळ[9] वितळें पैं ॥७९॥ श्रीरामकथा मानससरोवर । तुम्ही संत श्रोते राजहंस चतुर । साहित्यमुक्तें[10] सुढाळ थोर । सेवा निरंतर आदरें ॥२८०॥ श्रीरामकथासुधारस[11] । तुम्ही पंडित श्रोते त्रिदश[12] । प्राशन करा सावकाश । अति सुरस ग्रंथ हा ॥८१॥ पुराणपुरुष परात्पर । तो ब्रह्मानंद श्रीधरवर । अयोध्येंत अवतरला साचार । त्याचें चरित्र परिसा पुढें ॥८२॥ स्वस्ति श्रीरामविजय ग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत भक्त चतुर । चतुर्थाध्याय गोड हा ॥८३॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ओंव्या ॥ २८३ ॥

॥ अध्याय चौथा समाप्त॥

१. चिखलाच्या खड्ड्यात २. सूर्य ३. चंद्र ४. वस्त्रे व दागिने वगैरे देऊन ५. अतिशय तेजस्वी ६. सर्पकुळाचे भूषण (लक्ष्मण) ७. दशरथ पुत्र ८. चरित्र ९. ढगांचा ताफा १०. साहित्यातील अलंकार हेच मोती ११. श्रीरामकथा हेच अमृत १२. देव

## ॥ अध्याय पाचवा ॥

# विश्वामित्रांचे दशरथाकडे आगमन

॥ श्रीगणेशाय नमः॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः। श्रीरामकथा तेज:पुंज। हेंचि विशाळ दिव्य जहाज। जयासी नव खण सहज। नवविधा भक्तीचे ॥१॥ एकाएका खणाआंत। बैसले अनुतापी महाभक्त। प्रेमाचें शीड वरी फडकत। पालवीत मुमुक्षूंतें ॥२॥ येथें कर्णधार निश्चित। स्वयें जाणिजे श्रीरघुनाथ। तोचि पैलपारासी नेत। निजदासां बैसवुनी ॥३॥ त्या श्रीरामाचें नाम गोड। कथा ज्याची गगनाहूनि वाड। जे लीला ऐकतां पुरे कोड। नलगे चाड आणिकांची ॥४॥ जों जों श्रोते कथेसी सादर। तों तों रस चढे अपार। जैसा पुष्करीं देखतां रोहिणीवर। चंद्रकांता पाझर सुटे ॥५॥ बृहस्पतीसारिखा वक्ता। मतिमंद मिळालिया श्रोता। तैं व्यर्थ गेली ते कथा। जों नाहीं सादरता श्रोतयांसी ॥६॥ जैसें काननामाजी[१] रुदन। कोणी न पुसे तयालागून। तैसें मतिमंदाप्रति श्रवण। करविणें त्याच प्रकारें ॥७॥ जैसीं अन्नें केलीं स्वादिष्ट। परी जेवणार बैसले रोगिष्ट। तरी ते सुगरणीचे कष्ट। शून्यस्थानीं पडिले कीं ॥८॥ षड्रसअन्नें परिकर। परी तो जेवूं जाणे काय खर। पंकगर्तेत सुंदर। हिरा नेऊन टाकिला ॥९॥ कवित्वसागरींची[२] रत्नें दृष्टांत[३]। त्यांचे परीक्षक ज्ञाते पंडित। मतिमंद कुटिल निश्चित। त्यांस परीक्षा न कळे हे ॥१०॥ सुधारस उकिरडां ओतिला। गर्भांधासी दर्पण दाविला। कीं दिव्य मंचक घातला। चिताभूमीस नेउनी ॥११॥ कीं कागासी समर्पिलीं अमृतफळें। उष्ट्रापुढें[४] सोलींव केळें। कीं जे मृत्युप्राय निजेले। त्यांसी पूजिलें व्यर्थ जेवीं ॥१२॥ कीं अनर्घ्य रत्नमाळा। घातली दिवाभीताचे गळां। कीं कस्तूरीटिळक रेखिला। सूकराचे[५] ललाटीं ॥१३॥ तैसी मतिमंदापुढें कथा। वाग्विलासिनी[६] संतापे बोलतां। जैसी पद्मिणी[७] राजदुहिता। षंढाप्रती दीधली ॥१४॥ भग्न पात्रामाजी नीर। कदाकाळीं न राहे स्थिर। तरी तुम्ही भक्तवरिष्ठ चतुर। कथा सादर परिसा हो ॥१५॥ आधींच मुक्ताफळ[८] वरी सुवास। आधीच हिरा त्यावरी परिस। तैसा आधीं चतुर वरी प्रेमरस। श्रीरामासी आवडे तो ॥१६॥ असो चतुर्थाध्यायाचे अंतीं। कथा सुरस परिसिली संतीं। सांगितली श्रीरामाची जन्मस्थिती। बंधूंसहित सर्वही ॥१७॥ जो सरसिजोद्भवाचा[९] पिता। त्यासी दशरथ बाप कौसल्या माता। भक्त तारावया तत्त्वतां। अयोध्येमाजी प्रकटला ॥१८॥ दशरथाचें भाग्य थोर। रत्नजडित पालख[१०] सुंदर। चारही लांबविले परिकर। चौघे कुमर निजती तेथें ॥१९॥ तेरावे दिवशीं पाळणां। पहुडविला रामराणा। जो अगम्य वेदपुराणां। जो जो म्हणोनि हालविती ॥२०॥ जो सनकादिकांचें ध्यान। मृडानीपतीचें[११] चिंतन। जो चतुरास्याचें[१२] देवतार्चन। त्याला जो जो म्हणोनि हालविती ॥२१॥ जो आदिमायेचा निजवर। जो पुराणपुरुष परात्पर। जो मायाचक्रचाळक चतुर। जो जो म्हणोनि हालविती ॥२२॥ जो अगम्य[१३] दशशतवदना[१४]। प्रेमपाळणीं तो रामराणा। जवळी ज्या उभ्या ललना। सुवासिनी कोण त्या ऐका ॥२३॥

---

१. अरण्यात २. काव्यरूपी समुद्रातील ३. दृष्टांत हीच रत्ने ४. उंटापुढे ५. डुकराच्या ६. सरस्वती ७. सुलक्षणी स्त्री ८. मोती ९. ब्रह्मदेवाचा १०. पालखी ११. श्रीशंकराचे १२. ब्रह्मदेवाचे १३. कळण्यास कठीण १४. शेषाला

पाळण्याभोंवत्या कामिनी[१] । शांति क्षमा दया उन्मनी । उपरति[२] सद्विद्या[३] भामिनी । जो जो शब्दें हालविती ॥२४॥ निर्वाणदीक्षा स्वरूपस्थिती । मुमुक्षा निष्कामना प्रतीती[४] । सुलीनता समाधि सद्‌गती । लीला गाती स्वानंदें ॥२५॥ परा[५] पश्यंती[६] मध्यमा[७] वैखरी[८] । गजरें गाती चौघी नारी । चाऱ्ही[९] मुक्ति निर्धारीं । चहूं कोणीं तटस्थ ॥२६॥ घरांत मुख्य ह्या सुंदरी । इतर बैसल्या बाहेरी । जागृति स्वप्न सुषुप्ति नारी । त्यांसी रावणारी दिसेना ॥२७॥ असंभावना[१०] विपरीतभावना[१०] । विक्षेपता गतायाता[१०] जाणा । तुर्या[१०]दावी शहाणपणा । बहुत जाणती असें मी ॥२८॥ बारा[११] सोळा[१२] चौदा[१३] नारी । गलबला करिती बाहेरी । चौसष्टी[१४] दाविती कळाकुसरी । परी अंतरीं प्रवेश नव्हेचि ॥२९॥ असो सकळ नितंबिनी । ओटी कौसल्येची भरूनी । वस्त्रें अलंकार समर्पूनी । सदनीं गेल्या आपुलाल्या ॥३०॥ अयोध्येसी जन्मतां रघुपती । विघ्नें राक्षसां जाणवती । प्रळयविजा कडकडून पडती । लंकेवरी अकस्मात ॥३१॥ कांपों लागलें लंकानगर । भूंकप होत वारंवार । उगेंच मोडलें राजछत्र । सभा प्रेतवत दिसतसे ॥३२॥ महाद्वारीं भूमि उलत । रावण जों भद्रीं[१५] चढत । तों दाही मस्तकींचे पडत । मुकुट खालीं उगेचि ॥३३॥ शक्रारि[१६] पाहे आरसा निर्मळ । तों आंत न दिसे शिरकमळ । राजमंदिरावरी अमंगळ । दिवाभीतें बोभाती ॥३४॥ स्वप्न देखे मंदोदरी । कीं मर्कटें तोडिली गळसरी । विगतधवा ज्या कां नारी । ओटी भरिती धुळीनें ॥३५॥ ललाट शून्य[१७] सुलोचना । देखती जाहली मयकन्या[१८] । चिंता पडली रावणा । म्हणे ईश्वर क्षोभला कीं ॥३६॥ ईश्वर जाहलिया पाठमोरा । नसतीं विघ्नें येती घरा । महारत्नें होती गारा । कोणी न पुसती तयांतें ॥३७॥ आपुले द्रव्य लोकांवरी । तें बुडोन जाय न लाभे करीं । ज्यांचे देणें ते द्वारीं । बैसती आण घालोनी ॥३८॥ वैरियां करीं सांपडे वर्म । अपयश येऊन बुडे धर्म । विशेष वाढे क्रोध काम । तरी देव क्षोभला जाणिजे ॥३९॥ आपुले जे कां शत्रु पूर्ण । ज्यांसी आपण पीडिलें दारुण । अडल्या धरणें त्यांचे चरण । तरी देव क्षोभला जाणिजे ॥४०॥ लाभाकारणें निघे उदीमास[१९] । तों हानीच होय दिवसेंदिवस । पूज्यस्थानीं अपमान विशेष । तरी देव क्षोभला जाणिजे ॥४१॥ सुहृद आप्त द्वेष करिती । नसते व्यवहार गळां पडती । सदा तळमळ वाटे चित्तीं । तरी देव क्षोभला जाणिजे ॥४२॥ आपुलें राज्य संपत्ति धन । शत्रु भोगूं पाहे आपण । देहीं पीडा व्याधीविण । तरी देव क्षोभला जाणिजे ॥४३॥ विद्या बहुत जवळी असे । परी तयासी कोणी न पुसे । बोलों जातां मति भ्रंशे । तरी देव क्षोभला जाणिजे ॥४४॥ ठेविली ठेव न सांपडे । नसतीच व्याधी अंगीं जडे । सदा भय वाटे चहूंकडे । तरी देव क्षोभला जाणिजे ॥४५॥ वृद्धपणीं येई दरिद्र । स्त्री मृत्यु पावे गेले नेत्र । उपेक्षूनि हेळसिती[२०] पुत्र । तरी देव क्षोभला जाणिजे ॥४६॥ असो लंकेमाजी रावण । सांगे प्रधानासी बोलवून । अहोरात्र सावधान । लंकानगर रक्षावें ॥४७॥ अयोध्येसी राम जन्मतां तत्काळ । वृक्ष विराजती सदा सुफळ । गाई दुभती त्रिकाळ । क्षीर तुंबळ न सांवरे ॥४८॥

१. स्त्रिया २. वैराग्य ३. आत्मविद्या ४. प्रत्यक्ष अनुभव ५,६,७,८. चार वाणी ९. चार मुक्ती-सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता १०. बुद्धीच्या विविध अवस्था ११. बारा राशी १२. षोडशकला १३. चौदा विद्या १४. चौसष्ट कला १५. गच्चीवर १६. इंद्रजित १७. कुंकूविरहित कपाळाची १८. मंदोदरी १९. व्यापारास २०. तिरस्कार करतात

आधिव्याधिरहित लोक । नाहीं चिंता दारिद्र्य दु:ख । शुष्क[१] धरणी अपार पीक । पिकों लागली तेधवां ॥४९॥अवतरतांच जगज्जीवन । जन जरारहित[२] जाहले तरुण । अविद्या पाप मुळींहून । देशधडी जाहलें ॥५०॥ दरिद्री जाहले भाग्यवंत । मूर्ख ते बोलके पंडित । कुरूप ते स्वरूपवंत । देदीप्यमान तेजस्वी ॥५१॥ अवतरतांच श्रीराम । नि:शेष गेले क्रोध काम । अयोध्यावासियां सुकाळ परम । स्वानंदाचा जाहला ॥५२॥ गृहीं प्रकाशतां प्रभाकर[३] । मग कैंचा उरे अंधकार । गृहस्वामी येतां तस्कर । पळोनि जाती चहूंकडे ॥५३॥ कीं बोलतां ज्ञानी वेदांत । सकळ मतें होती कुंठित । कीं सद्विवेक होतां प्राप्त । संसारदु:खें वितुळती ॥५४॥ कीं प्रवेशतां वैराग्यशांती । दुष्ट काम क्रोध पळती । तैसा अवतरतां रघुपती । दोष दुष्काळ निमाले ॥५५॥असो दशरथाचे सुत । एकामागें एक रांगत । कौसल्या आणि दशरथ । संतोषती पाहतां ॥५६॥ पाचुबंद अंगणांत । हळुहळू चौघे चालत । एकासी एक पाहून हांसत । बाळभावेंकरोनियां ॥५७॥ कौसल्यां उभी राहोनियां । चौघांसी बोलवी जेवावया । तंव ते दूर जाती पळोनियां । धांवोनि माया धरी मागें ॥५८॥ चौघांचीं मुखें धुवोनी । भोजनासी बैसवी दटावुनी । संतोष वाटे दशरथाचे मनी । चारी मूर्ती पाहतां ॥५९॥ म्हणे कोण पुण्याचे पर्वत । मी पूर्वीं आचरलों बहुत । तरीच हे चौघे आदित्य । अवतरले माझे पोटीं ॥६०॥ चिमण्या मूर्ती चिमणे ठाण । चिमणीं धनुष्यें चिमणे बाण । चिमणीं नूपुरें रुणझुण । पायीं गर्जती चौघांचे ॥६१॥ जाहले अष्टवर्षांचे सुंदर । चौघांस समान वस्त्रालंकार । चिमणीं धनुष्यें परिकर । चिमणे शर सोडिती ॥६२॥ चिमणा पीतांबर कटिमेखळा । चिमणीं पदकें मुक्तमाळा । चिमण्या सेवकांचा पाळा[४] । रामाभोंवता शोभतसे ॥६३॥ उन्हांत खेळतां रघुपती । सेवक मित्रपत्रें[५] धरिती । एक चामरें वरी ढाळिती । राजनीतीकरोनियां[६] ॥६४॥ श्रीराम आधीं सोडी बाण । सवेंचि शर सोडी लक्ष्मण । त्यामागें भरत शत्रुघ्न । भेदीत संधान[७] तैसेंचि ॥६५॥ दुरून पाहे दशरथ वीर । चौघे एकदांच टाकिती शर । असुरप्रतिमा[८] करोनि थोर । शिर त्यांचे उडविती ॥६६॥ वेदांतींच्या दिव्य श्रुती[९] । सर्वांवरिष्ठ जेवीं गर्जती । तैसे बाण सोडी रघुपती । अचूक आणि चपळत्वें ॥६७॥ असो चौघांचें मौंजीबंधन । गुरु वसिष्ठातें पुसोन । मेळवूनि अपार ब्राह्मण । अजनंदन करिता जाहला ॥६८॥ श्रीरामाचा व्रतबंध होत । अष्टमहासिद्धि तेथें राबत । चारही दिवसपर्यंत । न्यून पदार्थ नसे कांही ॥६९॥ यज्ञभोक्ता[१०] रघुनाथ । त्यास ब्राह्मण घालिती यज्ञोपवीत । गायत्री मंत्र श्रीराम जपत । वेदवंद्य महाराज जो ॥७०॥ ऐसें जाहलिया व्रतबंधन । वसिष्ठापासीं अनुदिन । चहूं वेदांचें अध्ययन । केलें संपूर्ण चौघांही ॥७१॥ ज्यासी वर्णितां वेद वेडे । तो श्रीराम गुरूपाशीं वेद पढे । अध्ययन सांगतां सांकडें[११] । गुरूसी न पडे सर्वथा ॥७२॥ यापरी द्वादश वर्षें तत्त्वतां । संपूर्ण जाहलीं रघुनाथा । मग पुसोनि वसिष्ठ दशरथा । श्रीराम तीर्था निघाला ॥७३॥ ब्रह्मचर्य तीर्थाटण । करावें हें शास्त्रप्रमाण । हें जाणोनि रघुनंदन । तीर्थाटणासी निघाला ॥७४॥ तीर्थाटणा चौघे जण । निघाले सवें अपार सैन्य । सवें दिधला सुमंत प्रधान । असंख्य धन वांटावया ॥७५॥

१. कोरडी, बंजर २. वार्धक्यरहित ३. सूर्य ४. घोळका ५. छत्र्या ६. रीतिरिवाजाप्रमाणे ७. लक्ष्य ८. राक्षसांचे पुतळे ९. महावाक्ये-जसे तत्त्वमसि, अयमात्मा इ. १०. यज्ञांतील हवन ग्रहण करणारा ११. अडचण

सवत्स गायींचे भार । नानावस्त्रें अलंकार । तीर्थीं वांटी श्रीरघुवीर । याचकांसी सन्मानें ॥७६॥ ज्या तीर्थाचा महिमा जैसा पूर्ण । श्रीराम करी तैसेंच विधान । ज्याचेनि सकळ तीर्थें पावन । तो रघुनंदन तीर्थें हिंडे ॥७७॥ लोकसंग्रहाकारण[१] । तीर्थें हिंडे रघुनंदन । तीं तीर्थें करा श्रवण । संत श्रोते सर्वही ॥७८॥ काशीविश्वेश्वर निर्मळ । त्र्यंबक उज्जनी महाकाळ । ओंकार अमलेश्वर महाबळ । बदरीकेदार घृष्णेश्वर पैं ॥७९॥ नागनाथ वैजनाथ थोर । मल्लिकार्जुन भीमाशंकर । सोमनाथ रामेश्वर । ज्योतिर्लिंगें द्वादश हीं ॥८०॥ अयोध्या मथुरा हरिद्वार । काशी कांची अवंतिका नगर । द्वारावती गोमतीतीर । सप्त पुऱ्या अनुक्रमें ॥८१॥ तीर्थराज मुख्य त्रिवेणी । पंचप्रयाग पुण्यखाणी । ब्रह्मप्रयाग । कर्णप्रयाग अघहरणी । गुप्तप्रयाग समर्थ ॥८२॥ देवप्रयाग शिवप्रयाग पापहरण । नैमिषारण्य धर्मारण्य पंचकारण्य । ब्रह्मारण्य वेदारण्य । बदरिकाश्रम पावन तो ॥८३॥ यमुना सरस्वती भागीरथी । गौतमी गोमती कृष्णा भीमरथी । तापी नर्मदा भोगावती । प्रवरा पुण्यवती मंदाकिनी ॥८४॥ आनंदवर्धनी पयोष्णी । पिनाकी तुंगा कल्मषनाशिनी । कृतमाळा कावेरी पयस्विनी । सुवर्णमुखी सुमाळा ॥८५॥ कपिला ताम्रपर्णी शरावती । तुंगभद्रा सोमवती । सावित्री रेवा कुंकुमवती । वेण्या वेदवती मलप्रहरा ॥८६॥ घटप्रहरा नंदिनी नलिनी । गंडकी शरयू वैतरणी । सोमनद शिवनद तापहरणी । सोमभद्र नदेश्वर ॥८७॥ अरुणा वरुणा प्राची पुरंदरी । वेत्रवती सप्तउरगा कर्णकुमारी । स्वामिकार्तिकी पंचघृताची पृथ्वीवरी । विख्यात प्रवाह जयांचे ॥८८॥ वज्रकाळिका श्रमहारिणी । महेंद्रकाळी त्रिशूळी मंत्रवर्धिनी । नीरावती सुरनदी शंखोद्धारिणी । जयंती आणि अहिर्णवी ॥८९॥ नाटकी आणि अलकनंदा । फल्गु सर्वांतका त्रिपदा । शांता बाणनदी सुखदा । अनुक्रमें नद्या सर्वही ॥९०॥ शेषाद्रि आणि ब्रह्माद्रि । मूळपीठ पर्वत सिंहाद्रि । विंध्याद्रि आणि हेमाद्रि । मानससरोवरीं स्नान दान ॥९१॥ अरुणाचळ आनंदवन । कमलालया चिदंबरी पूर्ण । अगस्त्याश्रम पावन । श्रीरंगपट्टण शोभिवंत ॥९२॥ जनार्दन कन्याकुमारी । शिवकांची विष्णुकांची सुंदरी । मत्स्यतीर्थ पक्षितीर्थ पृथ्वीवरी । शंखोद्धार वेदोद्धार ॥९३॥ हिरण्यनदी संध्यावट । ब्रह्मावर्त धर्मस्तंभ सुभट । ब्रह्मयोनि पृथूदक वरिष्ठ । कुरुक्षेत्र बिंदुतीर्थ पैं ॥९४॥ धर्मालय कलापग्राम । गंगासागर सिंधुसंगम । कौंडिण्यपुर अंबिका परम । प्रेमपूर मार्तंड ॥९५॥ बाळकल्होळा कमलेश्वरी । विराट्स्वरूपिणी रक्तांबरी । भ्रमरांबिका ज्वाळामुखी सुंदरी । पीतांबरी महाशक्ति ॥९६॥ जोगलादेवी भैरवी । करवीरवासिनी शांभवी । सप्तशृंगी महारुद्रा देवी । हिंगुळजा आणि कमळजा ॥९७॥ चांगदेव मोरेश्वर । गुप्तकेदार वटेश्वर । अक्षयवट कुशतीर्थ पवित्र । त्रिकूटाचळ सुंदर पैं ॥९८॥ हरिहरेश्वर नृसिंहपूर । मूळमाधव ज्ञानेश्वर । चक्रपाणि कदंब भुलेश्वर । जुनाट नागेंद्र गौतमेश्वर तो ॥९९॥ सप्तयोजनें कोटेश्वर । सिद्धवट धूतपाप रामेश्वर । दक्षिणप्रयाग माधवेश्वर । पूर्वसागर तीर्थराज ॥१००॥ वैराट पुष्कर महाबळेश्वर । धूळखेटक शंकर नारायणपुर । मलयेश्वर पांचाळेश्वर । सत्यनाथ पूर्णालय ॥१॥ सिंधुपुर महामुंडेश्वर । भीमाशंकर योगेश्वर । सोरटीसोमनाथ लिंग थोर । भीमचंडी पुण्यालयें ॥२॥ शिवकांची विष्णुकांची । गोरक्षमठ आश्रम काळहस्ती । वेदपुर गया अरुणावती । उडूपी शेषशायी सर्वेश ॥३॥

१. लोकांना रीत घालून देण्यासाठी

त्रिपती अहोबळ स्वामीकार्तिक सत्य । सुब्रह्मण्य किष्किंधा मातंग पर्वत । हंपीविरूपाक्ष मूर्तिमंत । पंपासरोवर निर्मळ ॥४॥ चित्रकूट रुक्मकूट लोणार । अंभू अयोध्या महंकापुर । काळचंद्रिका अर्धोदय पवित्र । गोकर्ण कृष्णासागर पैं ॥५॥ हरिहरतीर्थ जंबुकेश्वर । अनंतशायी विमळेश्वर । मथुरा विकर्ण प्रभाकर । विश्रांतिवन तपोवन ॥६॥ कुंभकोण मंजरथ । मातुलिंग धूळखेट त्रिविक्रम तीर्थ । मुद्‌गल मांधाता अंवढ्या नागनाथ । पंढरीक्षेत्र चंद्रभागा ॥७॥ त्रिकोण आणि कर्णमूळ । नागर गौररंग जुगुळ । आशापुरी नेपाळ त्रिमल्ल । मंथनकाळेश्वर कुशतर्पण ॥८॥ मीनाक्षी कामाक्षी मातुलिंग थोर । सिता असिता चिदंबरेश्वर । ब्रह्मकटाह हरिद्वार । आदित्यवैश्वानर महातीर्थ ॥९॥ ब्रह्मानंद म्हणे श्रीकरधर । इतुकीं तीर्थें करूनि रघुवीर । अयोध्येसी दीनोद्धार । परतोनि आला गजरेंसी ॥११०॥ वसिष्ठासी साष्टांग नमन । दशरथाचे चरण वंदून । तिघी मातांसी रघुनंदन । करी नमन अभेदत्वें[१] ॥११॥ तीर्थें करोनि आलिया श्रीराम । सदा विरक्त आणि निष्काम । नावडे लौकिक संभ्रम । वैराग्य पूर्ण बाणलें ॥१२॥ षड्रस अन्न उत्तमासन । हास्य विनोद शृंगार गायन । नावडे मृगया गमनागमन । एकांत पूर्ण आवडे ॥१३॥ नावडे स्त्रियांशी संभाषण । नेणे कामिनींचे विलोकन[२] । नासाग्रीं दृष्टी ठेवून । आनंदघन डोलत ॥१४॥ याचि प्रकारें तिघे बंधू । महाविरक्त निष्काम साधू । श्रीरामसेवा करितां आनंदू । तिघांसही सर्वदा ॥१५॥ तंव तो प्रतिसृष्टि करणार । सिद्धाश्रमी गाधिपुत्र[३] । महातपस्वी विश्वामित्र । अयोध्येसी पातला ॥१६॥ आला ऐकोनि गाधिसुत । सामोरा धांवे दशरथ । साष्टांग करोनि प्रणिपात । क्षेमालिंगन[४] दीधलें ॥१७॥ दृष्टीं देखोनि ब्राह्मण । जो न उठे करी अपमान । त्याच्या आयुष्या होय खंडण । आलें मरण जवळी त्या ॥१८॥ जो ब्राह्मणासी नेदी अभ्युत्थान[५] । तो दुसरे जन्मीं होय श्वान । विघ्ने शोधीत येती त्यांचे सदन । कोठें नांदतो म्हणोनियां ॥१९॥ तैसा नव्हे राजा दशरथ । महाराज केवळ ब्राह्मणभक्त । कौशिकाचा[६] धरोनि हात । सिंहासनीं बैसविला ॥१२०॥ वस्त्रालंकारादि उपचार । देऊनि पूजिला विश्वामित्र । मानसीं भावी अजपुत्र[७] । धन्य दिवस आजिचा ॥२१॥ ऋषीस म्हणे दशरथ । आजि मज हर्ष वाटे बहुत । तुझे पुरवीन मनोरथ । कांही इच्छित मागावें ॥२२॥ म्हणोनि केला नमस्कार । मग आशीर्वाद देत विश्वामित्र । सूर्यवंशभूषण तूं उदार । अनंत कल्याण तुजला हो ॥२३॥ तुष्टि पुष्टि तुजलागीं बहुत । धर्म ऐश्वर्यवृद्धि अद्‌भुत । सार्थकायुष्य[८] सुख समस्त । तुजप्रति हो दशरथा ॥२४॥ विवेकज्ञानसमृद्धि[९] बहुत । विप्रविष्णुभक्ति[१०] घडो सतत । प्रताप प्रज्ञा यशवंत । सुभद्र[११] अत्यंत तुजलागी हो ॥२५॥ तव शत्रुक्षय हो कां बहुत । अक्षय कल्याणपद हो कां प्राप्त । भूतदया घडो सतत । कुळवृद्धि बहुत हो कां तूतें ॥२६॥ चिंतित हो पूर्ण मनोरथ । सर्व अरिष्ट हो कां शांत । सर्वाभीष्ट हो तुज प्राप्त । रविकुलअवतंसा[१२] ॥२७॥ निर्दोष यश वाढो बहुत । तव कीर्ति वर्णोत साधुसंत । याचकांचे मनोरथ । पुरोत सर्व तुझेनि ॥२८॥ अनाचारीं नसो आदर । संतभजनीं होई तूं सादर । माझे आशीर्वाद समग्र । सुफळ होवोत तुज राया ॥२९॥

---

१. समान आदराने २. पाहाणे ३. विश्वामित्र ४. प्रेमाने भेटला ५. उठून उभे राहणे ६. विश्वामित्राचा ७. दशरथ ८. आयुष्याचे सार्थक होवो ९. विवेक, ज्ञान यांची वृद्धी १०. ब्राह्मण आणि विष्णू यांची भक्ती ११. कल्याण १२. रविकुळाचे भूषण अशा

सुबुद्धि उपजो तुझे हृदयीं । ब्राह्मणांचे आशीर्वाद घेई । माझें चिंतित कार्य सर्वही । हो तुझेनि समस्त ॥१३०॥ मी मागत नाहीं संपत्ति धन । नलगे राज्य सिंहासन । माझा मख[1] मोडिती राक्षस येऊन । देईं रघुनंदन रक्षावया ॥३१॥ सिद्धि न पावे कदा यज्ञ । मारीच सुबाहु ताटिका येऊन । जाती होमद्रव्यें[2] भक्षून । देईं रघुनंदन रक्षावया ॥३२॥ कुंड वेदिका मोडून । यज्ञपात्रें टाकिती फोडून । मखमंडपासी[3] लाविती अग्न । देईं रघुनंदन रक्षावया ॥३३॥ मनुष्यांचे अस्थिमांस आणून । अकस्मात टाकिती वरून । गिळिले तिहीं असंख्य ब्राह्मण । देईं रघुनंदन रक्षावया ॥३४॥ ऐकोनि ऋषीचा वचनार्थ । भयभीत जाहला दशरथ । वाटे अंगावरी कोसळला पर्वत । कीं विद्युत्पात जाहला ॥३५॥ वाटे हृदयीं खोंचलें तप्त शस्त्र । कीं अकस्मात गेले नेत्र । कीं उभे ठाकले तस्कर । धन हरावया कृपणाचें ॥३६॥ पाहे राजा अधोवदन । कांही न बोले प्रतिवचन । विवेकचातुर्य[4] गेलें हरपोन । भयेंकरोनि तेधवां ॥३७॥ बोले हळूचि भिवोन । महाराक्षस मोडिती यज्ञ । केवळ बाल रघुनंदन । राजीवनयन सुकुमार ॥३८॥ लीलाकार्मुक[5] घेवोनि हातीं । मजपुढें खेळे रघुपती । नाहीं देखिली युद्धरीती । अद्यापवरी श्रीरामें ॥३९॥ धनुर्विद्येचा अभ्यास । अद्यापि नाहीं श्रीरामास । कोमळ तनु डोळस[6] । कैसा युद्धासी देऊं तूतें ॥१४०॥ राज्य संपत्ति गृह धन । सर्व देईन तुजलागून । परी नेदीं मी रघुनंदन । राजीवनयन सुकुमार जो ॥४१॥ राक्षस मारावया समस्त । मी सेनेसहित येतों तेथ । तुझिया कार्या वेंचीन जीवित्व । परी रघुनाथ न देववे ॥४२॥ कृपणासी न देववे धन । मीनासी[7] न सोडवे जीवन[8] । तैसा मज न देववे रघुनंदन । युद्धकंदन[9] करावया ॥४३॥ श्रीराम माझें तान्हें अत्यंत । कधी नेणे उष्ण वात । ऐसें बोलतां अश्रुपात । नेत्रीं रायाचे चालिले ॥४४॥ ऐसें बोलतां अजनंदन । ऋषि जाहला कोपायमान । म्हणे तूं बोलिलासी वचन । इच्छित पूर्ण देईन ऐसें ॥४५॥ म्यां न मागतां निश्चित । तूं बोलिलासी माग इच्छित । तू सूर्यवंशी जन्मोन व्यर्थ । डाग लाविला कुळासी ॥४६॥ येचि वंशी हरिश्चंद्र जाण । लटिकें साच करोनि स्वप्न । राज्य मज दिधलें दान । घेतलें विकून डोंबाघरीं ॥४७॥ तेचि वंशीं तूं जन्मोन । कैसें असत्य केलें वचन । सूर्यवंशासी दूषण । तुझेनि पूर्ण लागलें ॥४८॥ येचि वंशीं शिबिराव[10] आपण । कपोतपक्ष्याच्या समसमान । आपुलें मांस तुकिलें[11] पूर्ण । मिथ्यावचन न करीच ॥४९॥ येचि वंशीं रुक्मांगद । एकादशीव्रत साधी शुद्ध । केला पुत्राचा शिरच्छेद । मिथ्या शब्द न करीच ॥१५०॥ पैल शेजारी श्रियाळ । त्यासीं दान मागे जाश्वनीळ[12] । केला पुत्रवध तत्काळ । सत्त्वासी चळ होऊं नेदी ॥५१॥ तूं श्रीरामाचा महिमा नेणसी । हा अवतरला वैकुंठवासी । वृत्तांत पुसें वसिष्ठासी । साच कीं मिथ्या असे तो ॥५२॥ जो काळासी शासनकर्ता[13] । जो आदिमायेचा निजभर्ता । जो कमलोद्भवाचा पिता । त्यासी बाळक म्हणसी तूं ॥५३॥ जें नीलग्रीवाचें[14] ध्यान । जें सनकादिकांचें गुह्य[15] ज्ञान । ज्यासी शरण सहस्रनयन । त्यासी बाळक म्हणसी तूं ॥५४॥ वेदांतशास्त्रें सर्व निरसून । स्थापिती परब्रह्म निर्गुण । तो हा श्रीराम परिपूर्ण । त्यासी बाळक म्हणसी तूं ॥५५॥ मीमांसक[16] कर्ममार्ग । ज्याकारणें आचरती सांग । तो हा भक्तहृदयारविंदभृंग[17] । त्यासी बाळक म्हणसी तूं ॥५६॥

---

१. यज्ञ २. यज्ञीय हवन पदार्थ ३. यज्ञमंडपाला ४. विवेक आणि शहाणपणा ५. खेळातले धनुष्य ६. दिसण्यास सुंदर ७. माशाला ८. पाणी ९. भयंकर युद्ध १०. शिबि राजा ११. वजन केले १२. शंकर १३. शिक्षा करणारा १४. शंकराचे १५. गोपनीय १६. मीमांसा दर्शन जाणणारे १७. भक्त-हृदयकमलात राहाणारा भुंगा

नैयायिक[१] म्हणती जीव अनित्य । ईश्वर कर्ता एक सत्य । तो हा जगद्वंद्य रघुनाथ । त्यासी बाळक म्हणसी तूं ॥५७॥ व्याकरणकार[२] साधिती शब्दार्थ । ज्याच्या नामाचे करिती अनेक अर्थ । तो हा अवतरला वैकुंठनाथ । त्यासी बाळक म्हणसी तूं ॥५८॥ प्रकृतिपुरुष[३] विभाग । सांख्यशास्त्रीं[४] ज्ञानयोग । तो हा राम अक्षय अभंग । त्यासी बाळक म्हणसी तूं ॥५९॥ पातंजलशास्त्रीं[५] योगसाधन । तो अष्टांगयोग[६] आचरून । ज्याचें पद पावती निर्वाण । त्यासी बाळक म्हणसी तूं ॥१६०॥ आतां कल्याण असो श्रीरामा । मी जातों आपुल्या आश्रमा । उल्लंघोन महाद्वारसीमा[७] । बाहेर गेला गाधिसुत ॥६१॥ घाबरा जाहला नृपवर । गृहांत जावोनि सत्वर । वसिष्ठासी सांगे समाचार । नमस्कार करोनियां ॥६२॥ म्हणे कोपला कीं गाधिसुत । नेईन म्हणतो रघुनाथ । महाराज तूं गुरु समर्थ । सांग यथार्थ काय करूं ॥६३॥ तुझिया अनुग्रहाचें फळ । महाराज राम तमालनीळ । हा विश्वामित्र नव्हे काळ । नेऊं आला राघवातें ॥६४॥ जें मागेल तें यास देई । समाधान करीं ये समयीं । रामासी जीवदान लवलाहीं । देईं आतां महाराजा ॥६५॥ मग वसिष्ठ बोले गोष्टी । हा विश्वामित्र महाहठी । येणें केली प्रतिसृष्टी । परमेष्ठीस जिंकावया ॥६६॥ येणें लोहपिष्ट[८] भक्षून । साठ सहस्र वर्षे पुरश्चरण । केलें गायत्रीचें आराधन । त्रिभुवन भीतसे तयातें ॥६७॥ सदा जवळी धनुष्य बाण । महायोद्धा गाधिनंदन । तत्काळ उग्र शाप देऊन । भस्म करील कुळातें ॥६८॥ तुज सांगतों यथार्थ वचन । त्यास देई रामलक्ष्मण । भरत आणि शत्रुघ्न । तुजपाशीं असों दे ॥६९॥ ऐसें बोलतां गुरुनाथ । दीर्घस्वरें दशरथ रडत । मग हृदयीं धरी ब्रह्मसुत[९] । दशरथासी उठवोनी ॥१७०॥ रायाचे मस्तकीं हस्त ठेवून । म्हणे रामाकडे पाहें विलोकून । तों शंखचक्रगदामंडित पूर्ण । आदिनारायण देखिला ॥७१॥ सांगे कानीं मूळ काव्यार्थ । हा अवतरला वैकुंठनाथ । विश्वामित्र बोलिला जो जो अर्थ । तो तो यथार्थ दशरथा ॥७२॥ सौमित्रि तो भोगींद्रनाथ[१०] । ऐकोनि तोषला दशरथ । गुरु म्हणे हे मानव सत्य । सर्वथा नव्हेत राजेंद्रा ॥७३॥ यालागीं रामलक्ष्मण । देईं त्यास पाचारून । शिरीं वंदोनि गुरुचरण । गेला धांवोनि तयापाशीं ॥७४॥ करूनि साष्टांग नमन । म्हणे न्या जी रामलक्ष्मण । ऐकोनि आनंदला गाधिनंदन । काय वचन बोलत ॥७५॥ म्हणे मी मागत होतों रघुनंदन । त्वां सवें दिधला लक्ष्मण । माझें भाग्य परिपूर्ण । लाभ द्विगुणित जाहला ॥७६॥ माझे पुण्याचे गिरिवर । मेरूहून वाढले अपार । ते आजि फळा आले साचार । म्हणुनि रघुवीर प्राप्त जाहला ॥७७॥ विश्वामित्र आला परतोनी । बैसला आपुले स्थानीं । बाहेर आला वसिष्ठमुनी । सभास्थानीं बैसला ॥७८॥ सभेसी बैसले थोर महंत । आनंदमय जाहला दशरथ । विश्वामित्र म्हणे रघुनाथ । मज आतांचि दाविजे ॥७९॥ आजि धन्य माझे नयन । पाहीन श्रीरामाचें वदन । ज्यावरोनि मीनकेतन[११] । कोट्यवधि ओंवाळिजे ॥१८०॥ नृप सांगोनि पाठवी रामासी । विश्वामित्र आला न्यावयासी । आपण यावें सभेसी । सुख सर्वांसी द्यावया ॥८१॥ ऐसें ऐकतां त्रिभुवनसुंदर[१२] । सभेसी चालिला रघुवीर । विद्युत्प्राय[१३] प्रावरण[१४] चीर[१५] । रुळती पदर मुक्तलग[१६] ॥८२॥

१. न्यायदर्शन जाणणारे २. व्याकरण जाणणारे ३. माया व ईश्वर ४. सांख्य दर्शन ५. पतंजलीनी रचलेले योगशास्त्र ६. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधि ही आठ अंगे असलेला योग ७. महाद्वाराची मर्यादा ८. लोखंडाचे पीठ ९. वसिष्ठ १०. शेष ११. मदन १२. राम १३. चकचकीत १४. पांघरावयाचे वस्त्र १५. नेसावयाचे वस्त्र १६. मोती ओवलेली माळ

निशा संपतां तत्काळ । उदयाचळावरी ये रविमंडळ । तैसा राम तमालनीळ । सभेमाजी पातला ॥८३॥ कौसल्याहृदयारविंदभ्रमर[1] । दृष्टीं देखोनि विश्वामित्र । करोनियां जयजयकार । भेटावया पुढारला ॥८४॥ विश्वामित्राचे चरण । प्रेमें वंदितां रघुनंदन । तों ऋषीने हस्त धरून । आलिंगनासी मिसळला ॥८५॥ नीलजीमूतवर्ण[2] रघुवीर । प्रेमें हृदयीं धरी विश्वामित्र । म्हणे जन्माचें सार्थक समग्र । आजि जाहलें संपूर्ण ॥८६॥ विश्वामित्रासी आलिंगुनी । वसिष्ठा नमी चापपाणी[3] । मग श्रीराम बैसला निजासनीं । वेदपुराणीं वंद्य जो ॥८७॥ मग श्रीरामासी म्हणे विश्वामित्र । माझा क्रतु[4] विध्वंसिती असुर । तुजवीण कोण रक्षणार । दुजा न दिसे त्रिभुवनीं ॥८८॥ ऐकोनि विश्वामित्राचें वचन । कमळ विकासे मित्र देखोन । तैसा रघुवीर सुहास्यवदन । बोलता जाहला ते वेळीं ॥८९॥ ते कौतुककथा सुरस बहुत । ऐकोत आतां साधुसंत । जे कथा ऐकतां समस्त । महापातकें नासती ॥१९०॥ जैसें महावेदांत-शास्त्र । सर्वांसी मान्य करी पवित्र । तैसा सहावे अध्यायीं साचार । रस अपार ओतिला ॥९१॥ केवळ जें वेदांतज्ञान । रामासी उपदेशील ब्रह्मनंदन । तें ऐकोत संतसज्जन । आत्मज्ञान सुरस पैं ॥९२॥ पुसेल आतां रघुवीर । षष्ठाध्यायीं परम सुंदर । वसिष्ठ ज्ञानाचा सागर । वर्षेल उदार मेघ जैसा ॥९३॥ त्या वसिष्ठगोत्रीं उद्भवला पूर्ण । ब्रह्मानंद स्वामी ज्ञानसंपन्न । कीं वसिष्ठचि आपण । कुळीं आपल्या अवतरला ॥९४॥ ऐसा महाराज ब्रह्मानंद । तयाचें जें चरणारविंद । तेथें श्रीधर होऊनि मिलिंद । दिव्य आमोद सेवीतसे ॥९५॥ स्वस्ति श्रीरामविजय ग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत भक्त चतुर । पंचमाध्याय गोड हा ॥१९६॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ओव्या १९६ ॥

॥ अध्याय पाचवा समाप्त ॥

१. कौसल्येच्या हृदयरूपी कमळात असलेला रामरूपी भ्रमर २. नीलमेघाच्या वर्णाचा ३. राम ४. यज्ञ

## ॥ अध्याय सहावा ॥

# वसिष्ठांचा उपदेश

॥ श्रीगणेशाय नमः॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः ॥ जय जय जगद्वंद्या वेदसारा[१] । अनंगदहनहृदयविहारा[२] । कमलोद्भवजनका[३] परात्परा । अगोचरा[४] निरुपाधिका ॥१॥ इच्छामात्रें प्रचंड । मायेनें रचिलें ब्रह्मांड । चोऱ्यायशीं लक्ष योनि उदंड । जीव आंत भरियेले ॥२॥ ते जीव विसरूनि तूतें । भुलले देखोनि विषयांतें । म्हणोनि विसरले निजपदातें । अहंमतीनें भुलोनियां ॥३॥ शब्दविषय घेतां कानें । कुरंग[५] वेंचला समूळ प्राणें । स्पर्शविषय[६] सेवितां वारणें । अंकुशें आकर्षोनि[७] हिंडविती ॥४॥ रूपविषय[८] देखतां पतंग[९] । करी आपला देहत्याग । रसविषयें[१०] मीन सवेग । गळ गिळोनि मुके प्राणा ॥५॥ गंधविषयें मिलिंद[११] भुलोन । कमळकोशीं वेंची प्राण । ते पांचही विषय संपूर्ण । भोगिती जाण मानव हे ॥६॥ तुज विसरोनि श्रीरामा । जीव भुलले देहगेहधनकामा[१२] । त्यांसी तारावया पूर्णब्रह्मा । दशरथात्मज जाहलासी ॥७॥ पंचमाध्यायाचे अंतीं कथा । दशरथें राम दिधला गाधिसुता । यावरी वर्तलें तें तत्त्वतां । ऐका आतां सावधान ॥८॥ गुरूसी शरण रिघाला रघुनाथ । हे कथा वाल्मीकें कथिली अद्भुत । तो बृहद्वासिष्ठग्रंथ । बत्तीस सहस्र श्लोक पैं ॥९॥ समुद्राऐसा थोर ग्रंथ । त्यांतील सार सांगों मुख्यार्थ । जैसें भागीरथींतूनि तृषार्त । पाणी सेवी अंजुळीनें ॥१०॥ सागरामाजी बुडी देऊन । काढिती सतेज मुक्तें वेंचून । कीं याचकासी सांपडे अपार धन । परी यथाशक्ति मोट बांधी ॥११॥ देखिला अन्नाचा पर्वत । परी आपणापुरतेंच घे क्षुधार्त । तैसा बृहद्वासिष्ठग्रंथ । त्यांतील गुह्यार्थ ऐका हो ॥१२॥ वाल्मीकिचीं उच्छिष्ट उत्तरें । तींच परिसा तुम्ही सादरें । श्रोते म्हणती उच्छिष्ट खरें । तरी तेंच कां हो बोलता ॥१३॥ पराचें उच्छिष्ट अंगीकार । कदा न करिती श्रोते चतुर । संदेहधनुष्य घेऊनि थोर । प्रश्नाक्षरशर सोडिती ॥१४॥ तों वक्त्यानें स्फूर्तिधनुष्य घेऊन । शास्त्रसंमत टाकूनि बाण । प्रश्नाक्षरशर निवारून । संदेहधनुष्य छेदिलें ॥१५॥ वक्ता म्हणे ऐका सावधान । कोणतें उच्छिष्ट घेती सज्जन । तरी तें मधुमक्षिकांचें[१३] उच्छिष्ट पूर्ण । मधु आवडे देवांतें ॥१६॥ वत्स आधीं करी दुग्धपान । तें अवश्य घ्यावें न करितां अनमान । भ्रमर आधीं जाय पुष्प सेवून । परी तें शास्त्रज्ञ अंगीकारिती ॥१७॥ मेघमुखींचें जीवन । तें उच्छिष्ट नव्हे कदा जाण । यागींचा पुरोडाश पूर्ण । उच्छिष्ट कोण म्हणे त्यासी ॥१८॥ गौतमें गोदा आणिली प्रार्थून । तेणें आधीं केलें स्नानपान । व्यासाचें उच्छिष्ट पुराण प्राचीन । उच्छिष्ट पूर्ण नव्हे तें ॥१९॥ विष्णुनैवेद्य पावन । त्यास उच्छिष्ट म्हणेल कोण । वाल्मीककाव्य म्हणोन । उच्छिष्ट नव्हे सर्वथा ॥२०॥ व्याघ्रमृगचर्म[१४] गहन । सूकरकेश[१५] पट्टकूलें[१६] जाण । हस्तिदंत गवाशृंग[१७] पूर्ण । इतुकीं ब्राह्मण पवित्र म्हणती ॥२१॥ असो ऐका पूर्वानुसंधान । यागरक्षणार्थ जातां रघुनंदन । कौशिकाप्रति राजीवनयन । बोलता जाहला तेधवां ॥२२॥ श्रीराम म्हणे महाऋषी । मज तुम्ही नेतां युद्धासी । क्षणभंगुरता देहासी । आत्मप्राप्ति नाहीं मातें ॥२३॥

---

१. वेदांचा मुख्य विषय जो परमात्मा २. श्रीशंकराला प्रिय ३. विष्णू ४. इंद्रियांच्या जाणीवेपलीकडील ५. हरीण ६. स्पर्शाचा ७. हाकून ८. दीपज्योती ९. किडा १०. जिभेचा विषय ११. भ्रमर १२. देह, घर, द्रव्य व कामवासना यांस १३. मधमाशांचे १४. वाघ व हरिण यांचे चामडे १५. डुकराचे केस १६. रेशमी वस्त्र १७. गव्याचे शिंग

आत्मप्राप्तीविण साधन । जैसे अलंकार गळसरीविण[१] । कीं दीपाविण शून्य सदन । जीवनाविण[२] सरिता जैसी ॥२४॥ कीं प्राणाविण कलेवर[३] । कीं आवडीवीण आदर । कीं इंद्रियनिग्रहावीण[४] आचार । अनाचार तोचि पैं ॥२५॥ कीं भ्रताराविण कामिनी । कीं अत्रिसुतावीण[५] रजनी । तैसे आत्मप्राप्तीवांचूनी । व्यर्थ प्राणी नाडले ॥२६॥ आत्मप्राप्तीसी कारण । धरावे श्रीगुरूचे चरण । गुरुकृपेवीण ज्ञान । कल्पांतीही साधेना ॥२७॥ पदार्थ न दिसे नेत्रेंवीण । गोड न वाटे जीवनावीण । परिसावीण सुवर्ण । लोहाचें नोहे कल्पांती ॥२८॥ जो गुरुसेवेसी सादर । आत्मज्ञान जोडोनि कर । उभें त्यापुढें निरंतर । अहोरात्र तिष्ठतसे ॥२९॥ गुरुसेवा ज्यासी नावडे । त्याचे ज्ञानासी पडले किडे । जन्ममरणांचे सांकडें । न सरे त्याचें कल्पांती ॥३०॥ ज्यासी नावडे गुरुसेवन । तो जाहला चतु:षष्टिकळा-प्रवीण[६] । साही शास्त्रें मुखोद्गत पूर्ण । परी तें भाषण मद्यपियाचें ॥३१॥ तेणें केलें जरी कीर्तन । दावी वरपांगें डोलोन । परी गुरुदास्य नावडे पूर्ण । त्याचें बंधन चुकेना ॥३२॥ जळो जळो त्याचा प्रताप । काय चाटावें कोरडें तप । जैसे गतधवेचें स्वरूप । यौवन काय जाळावें ॥३३॥ गर्भांधाचे विशाळ नेत्र । अदातयाचें[७] उंच मंदिर । कीं धनलुब्धाचा[८] तत्त्वविचार[९] । कीं रम्य गृह अंत्यजाचें ॥३४॥ भ्रष्टासी कायसें कुळगोत्र । श्वान नेणे पवित्रापवित्र । जैसें मद्यपियाचें पात्र । श्रोत्रिय न शिवे सर्वथा ॥३५॥ तैसे गुरुकृपेवीण जे नर । व्यर्थ नरदेहा आले खर । सदा विषयव्यापारीं[१०] सादर । त्यांसी आपपर नाठवे ॥३६॥ उत्तम मनुष्यदेह पावोन । तेथें साधावें आत्मज्ञान । ज्ञानहीन ते मूढ पूर्ण । गूढ नरक भोगिती ॥३७॥ रघुपतीचे बोल ऐकुनी । सभासंत सुखावले मनीं । विश्वामित्र तेव्हां आनंदोनी । ब्रह्मनंदनाप्रति[११] बोले ॥३८॥ जगद्वंद्य रविकुलभूषण । त्यास उपदेशी दिव्यज्ञान । जो अनंतब्रह्मांडांची सांठवण । लीलावेशधारक जो ॥३९॥ ते वेळे उठोनि रघुनाथ । जो होय कमलोद्भवाचा तात । तो वसिष्ठासी साष्टांग नमित । शरणागत जाहला असे ॥४०॥ म्हणे तनमनधनेंसीं अनन्य । श्रीवसिष्ठा तुज मी शरण । ऐसें ऐकतां ब्रह्मनंदन । हृदयीं धरी राघवातें ॥४१॥ म्हणे जगद्वंद्या श्रीरामा । अवतारपुरुषा परब्रह्मा । तूं सच्चिदानंदघन परमात्मा । तुज मी काय उपदेशूं ॥४२॥ तूं आदिनारायण निष्कलंक[१२] । भोगींद्र जाहला तुझा तल्पक[१३] । वेदशास्त्रांसी पडले ठक । तुझे स्वरूप वर्णितां ॥४३॥ तुझें नाम जपतां सार । शीतळ जाहला अपर्णावर । गुरुमहिमा प्रगटवावया साचार । शरण मज आलासी ॥४४॥ देव भक्तांची पूजा करी यथार्थ । याचकांसी राजा दान मागत । सागर जैसा स्तवन करीत । सरोवराचें प्रीतीनें ॥४५॥ वाचस्पति[१४] मुक्यासी पुसे विचार । दीपप्रकाश इच्छी दिनकर । चकोरांसी म्हणे अत्रिकुमर[१५] । मज तृप्त करा तुम्ही ॥४६॥ कल्पतरु दुर्बळासी मागे दान । जलद[१६] चातकासी मागे जीवन । चक्रवाकाचें दर्शन । तरणि[१७] इच्छी नवल हें ॥४७॥ प्रीतीनें माता बाळकासी म्हणत । मी तुझें स्तनपान करीन सत्य । कीं तृषाक्रांतासी[१८] मागत । उदक जैसें जान्हवी[१९] ॥४८॥ वनस्पतीस म्हणे वसंत । मज तुम्ही निववा समस्त । तैसा तूं जगद्गुरु रघुनाथ । गुरूसी शरण आलासी ॥४९॥ संतोषोनि ब्रह्मनंदन । श्रीरामास सन्मुख बैसवून । गुरुसंप्रदाय शास्त्रप्रमाण । महावाक्य दीक्षाविधि ॥५०॥

---

१. मंगळसूत्राशिवाय २. पाण्याविना ३. शरीर ४. यमनियमांशिवाय ५. चंद्राशिवाय ६. चौसष्ट कलांत निपुण ७. कृपण माणसाचे ८. लोभी माणसाचे ९. तत्त्वज्ञान १०. विषय भोगांत ११. वसिष्ठ ऋषीस १२. निर्मळ १३. मंचक १४. बृहस्पती १५. चंद्र १६. मेघ १७. सूर्य १८. तहानलेल्यास १९. गंगा

जो मायानियंता[१] जगद्भूषण । तो वसिष्ठापुढें वोढवी[२] कर्ण । चहूं वेदांचें जीवन । तें महावाक्य[३] ऋषि सांगे ॥५१॥ वसिष्ठ म्हणे सप्रेम । सर्वद्रष्टा[४] तूं आत्माराम । सर्वव्यापक तूं पूर्णब्रह्म । अतींद्रिय वेगळा ॥५२॥ जगडंबराभास[५] सकळ । हा तुझे मायेचा खेळ । मिथ्याभूत जैसें मृगजळ । साच नव्हे सर्वथा ॥५३॥ तूं अलिप्त सर्वांसी तत्त्वतां । जैसा सर्वाघटीं बिंबला सविता । कीं काष्ठामाजी अग्नि पाहतां । अलिप्त जैसा असोनी ॥५४॥ कीं वाद्यांमाजी ध्वनि उमटती । कीं कंठीं राग उठती । परी तेथें असोनि नसती । तैसा सर्वाभूतीं राघवा तूं ॥५५॥ कीं दर्पणींची स्वरूपें । दिसती परी मिथ्यारूपें । तैसा रामा तूं विश्वरूपें । व्यापोनियां अलिप्त ॥५६॥ बीजामाजी तरुवर । कीं तंतूमाजी वस्त्र । कीं उदकीं तरंग अपार । विश्व समग्र तुजमाजी ॥५७॥ अनंत ब्रह्मांडांच्या कोडी । तुझी माया घडी मोडी । जीवांस भुरळ घालोनि पाडी । विषयावर्तीं[६] सर्वदा ॥५८॥ मायेचे अवघे विकार । ते मृगजळाचे दाटले पूर । कीं गंधर्वनगर सविस्तर । रचिलें दिसे परी मिथ्या ॥५९॥ हें वोडंबरीचें[७] लेणें पूर्ण । कीं स्वप्नीचें राज्यसिंहासन । कीं चित्रींचा हुताशन । ज्वाळा अद्भुत दीसती ॥६०॥ कीं दर्पणींचा[८] दिव्य हार । कीं मृगजळामाजी वंध्यापुत्र । शुक्तिकारजताचें करोनि पात्र । रात्रीस मीन धरीतसे ॥६१॥ नयनांतील पुतळी । गर्भांधें पदरी धरिली । कीं कल्पांतविजू गिळिली । मशकें केवीं घडे हें ॥६२॥ पांगुळ धावे अंतराळीं । तेणें आकाशाची साल काढिली । प्रभंजनाची[९] चिंधी फाडिली । साच बोली का हे ॥६३॥ कीं कुहूचे[१०] काळोखें भरिलें । तें दिवा दोहों प्रहरां वाळूं घातलें । कीं उरगाचे पाय बांधिले । सिकतातंतूकरूनियां[११] ॥६४॥ काढोनि दीपाचा रंग[१२] । वस्त्रें रंगवली सुरंग । कीं वडवानळामाजी[१३] काग । खेळती काय घडे हें ॥६५॥ हें सर्व जैसें असत्य । तैसी माया मिथ्याभूत । साच कीं लटकी इत्यर्थ । ब्रह्मादिका नव्हेची ॥६६॥ मायेचें परम विंदाण[१४] । थोरथोरांसी न कळे पूर्ण । तरी मायेची कथा सांगेन । ऐक सावधान श्रीरामा ॥६७॥ जेणें न्यायशास्त्र निर्मिलें पूर्ण । तो गौतम ऋषि परम प्रवीण । त्याचा शिष्य सुजाण । गाधि नाम तयाचें ॥६८॥ त्यास चोहों वेदांचें अध्ययन । षट्शास्त्रीं परम निपुण । तेणें केलें दिव्य अनुष्ठान । जाहला प्रसन्न श्रीविष्णु ॥६९॥ मग बोले इंदिरानाथ । प्रसन्न जाहलों माग इच्छित । यावरी तो ब्राह्मण बोलत । काय तें ऐक श्रीरामा ॥७०॥ गाधि म्हणे हृषीकेशी । मज दावीं तुझी माया कैशी । तिनें ठकविलें बहुतांसी । मज वेगेंसीं पाहूं दे ॥७१॥ ऐकोनि हांसला नारायण । मायापाश परम दारुण । तोडीं म्हणोनि येती शरण । तू तीस पाहीन कां म्हणसी ॥७२॥ दिसतें तें अवघें असत्य । हेंचि मायेचें रूप यथार्थ । जैसा दोरीवरी सर्प भासत । कीं शुक्तिकेवरी[१५] रजत जैसें ॥७३॥ कीं खुंट[१६] तोचि चोर । भ्रांतासी भासे साचार । जैसे स्वप्नींचें सैन्य अपार । जागृतींत मिथ्या[१७] तें ॥७४॥ गाधि म्हणे वैकुंठराया । तूं मिथ्यारूप सांगसी माया । तरी मार्कंडेयऋषिवर्या । ब्रह्मादिकां भुलविलें ॥७५॥ तरी ते मज क्षणभरी । सर्वोत्तमा दावीं नेत्रीं । हांसतसे वैकुंठविहारी । बोल ऐकोन तयाचे ॥७६॥ हरि म्हणे माया देखून । समूळ जासी तूं भुलोन । तुझे कासावीस होतील प्राण । मग कोण सोडवील ॥७७॥ तुझी भ्रंशेल सकळ मती । पडसील महा आवर्तीं[१८] । मग गाधि म्हणे जगत्पती । वर निश्चित देईं मातें ॥७८॥

१. ईश्वर २. कान देऊन ऐकत होता ३. 'तत्त्वमसि' हे महावाक्य ४. सर्व साक्षी ५. जगाच्या पसाऱ्याची प्रतीती ६. विषयांच्या भोवऱ्यात ७. जादूचे ८. आरशातील ९. वाऱ्याची १०. अमावस्येच्या रात्रीचे ११. वाळूचा दोरा करून १२. प्रकाश १३. समुद्रातील अग्नीत १४. कौशल्य १५. शिंपल्यावर १६. खांब १७. असत्य १८. संभ्रमात

मी कासावीस जेव्हां होईन । तेव्हां तूं मज आठव दे येऊन । तुझें करितांचि नामस्मरण । पुढती भेटें ऐसाचि ॥७९॥ अवश्य म्हणोनि जगन्निवास । जाता जाहला स्वस्थानास । कांही एक लोटले दिवस । ऐकें सर्वेशा राघवा ॥८०॥ जान्हवीतीरीं अरण्यांत । गाधि राहिला स्त्रियेसहित । एकदां माध्यान्हा आला आदित्य[१] । ऋषि जात स्नानातें ॥८१॥ प्रवेशतां गंगाजीवनीं । मनांत म्हणे माया अजुनी । मज कां न दावी चक्रपाणी । कैसी करणी तयाची ॥८२॥ अघमर्षण करी ब्राह्मण । तों मायेनें मांडिले विंदाण । गाधीस वाटे आले मरण । व्यथा दारुण जाहली ॥८३॥ तों पातले यमदूत । तिहीं प्राण काढिले त्वरित । यमापाशीं मारीत । गाधि नेला तेधवां ॥८४॥ तों तेथें यम जाचणी दारुण । कुंभीपाकीं घालिती नेऊन । असिपत्रवनीं[२] हिंडवून । तप्तस्तंभासी[३] बांधिती ॥८५॥ इतुकीं दुःखें विप्र भोगित । परी आपण उभा जान्हवींत । मग तो जन्मला चांडाळयोनींत । कंटज नाम तयाचें ॥८६॥ पंचवीस वर्षेपर्यंत । स्त्रीपुत्र जाहले बहुत । वाटा पाडोन असंख्यात । द्रव्य अपार जोडिलें ॥८७॥ नानापरींच्या हिंसा करी । गोब्राह्मण जिवें मारी । तों तेथें आली महामारी । सर्वही मेलीं कुटुंबींची ॥८८॥ बाप माय स्त्री सुत । एकदांचि पावली मृत्य । कंटज विचारी मनांत । होऊं विरक्त येथोनियां ॥८९॥ रडे कंटजनाम महार । आतां न मिळे म्हणे संसार । मग अतीत[४] होऊन दुराचार[५] । देशोदेशीं हिंडतसे ॥९०॥ आला केरळदेशाप्रति । तों तेथींचा मृत्यु पावला नृपति । त्यास नाहीं पुत्रसंतति । मग प्रधान करिती विचार ॥९१॥ मग शुंडादंडीं[६] माळ देऊन । शृंगारूनि हिंडविती हस्तीण । तंव कंटजाचे कंठीं आणोन । माळ घातली अकस्मात ॥९२॥ सहा वर्षे राज्य करून देख । भ्रष्टविले सकळ लोक । घरीं जेवूं घातले सकळिक । सोइरे केले बहुतचि ॥९३॥ एके दिवशीं तो निर्लज्ज । एकला जात बाहेर कंटज । प्रधानादि सेवक सहज । पाठीं धांवती रायाचे ॥९४॥ अवघियांस दटाविलें रागें । म्हणे येऊं नका मज मागें । प्रधान गुप्त पाहती वेगें । कोठें जातो म्हणोनियां ॥९५॥ तों ते गांवींचें अनामिक[७] । परम उन्मत्त मद्यप्राशक[८] । ते वाटेसी भेटले सकळिक । कंटजासी तेधवां ॥९६॥ तिहीं कंटज ओळखिला सत्वरा । म्हणती आमुचा हा सोयरा । येणें लोक भ्रष्टविले एकसरा । नाहीं कळलें कोणासी हे ॥९७॥ त्यांसी कंटज दटावी देखा । म्हणे ही गोष्ट बोलूं नका । नाहीं तरी तुम्हां सकळिकां । शिक्षा करीन साक्षेपें ॥९८॥ तें प्रधानवर्गीं ऐकिलें । म्हणती राज्य समस्त बुडविलें । कंटजासी मारून बाहेर घातले । मग विचारीं बैसले समस्त ॥९९॥ श्रेष्ठीं[९] काढिला शास्त्रार्थ । घ्यावें देहांत प्रायश्चित । मग अग्नि प्रवेश समस्त । लोक करिती नगरींचे ॥१००॥ प्रधानादि अष्टाधिकारी । स्त्रीपुरुष ते अवसरीं । भस्म जाहले अग्निभीतरीं[१०] । बाळें नगरीं उरलीं तैं ॥१॥ ऐसें कंटजें देखिलें । म्हणे थोर पाप मज घडलें । तेणेंही सरण रचिलें । वरी आपण निजेला ॥२॥ तों अग्निशिखा[११] ते वेळीं । वामांगीं[१२] येऊन झगटली । कंटजें हांक फोडिली । उडी घातली खालती ॥३॥ तों इकडे गाधिब्राह्मण । बाहेर निघाला हांक फोडून । फोड आला तरतरोन । वामांगासी देखिला ॥४॥ म्हणे मी गाधिब्राह्मण । जान्हवींत करितां स्नान । करीत असतां अघमर्षण । दुःखें दारुण भोगिलीं ॥५॥

१. सूर्य २. तलवारीच्या टोकांचे गवत असलेल्या अरण्यात ३. तापलेल्या खांबाला ४. कष्टी ५. दुष्ट आचार असणारा ६. सोंडेत ७. अनोळखी ८. दारू पिणारे ९. विद्वानांनी १०. अग्नीमध्ये ११. ज्वाळा १२. डाव्या अंगाला

सूर्यसुतें[1] मज गांजिलें । चांडाळयोनींत जन्मविलें । सहा वरुषें राज्य केलें । लोक भ्रष्टविले सर्वही ॥६॥ मृत्यु पावले असंख्य जन । जरी हें असत्य म्हणावें स्वप्न । तरी फोड आला तरतरोन । करी रुदन विप्र तो ॥७॥ विसरला तप अनुष्ठान । नाठवे संध्या वेदाध्ययन । आश्रमासी आला परतोन । चिंतार्णवीं[2] पडियेला ॥८॥ स्त्री विनवी भ्रतारालागून[3] । तुमचे वामांगी कां झोंबला अग्न । तंव तो विलापें ब्राह्मण । म्हणे माझेनि हें न सांगवे ॥९॥ तों गाधीचा गुरुबंधु अकस्मात । आला तीर्थें करीत करीत । गाधि तयासी क्षेम देत । म्हणे कृश कां बहुत जाहलासी ॥११०॥ तेणें सांगितलें वर्तमान । मज एक पाप घडलें दारुण । केरळदेशीं एक नगर संपूर्ण । बाळेंचि[4] तेथें नांदती ॥११॥ एकाचे घरीं म्यां घेतलें अन्न । मग त्यांसी पुशिलें वर्तमान । ते म्हणती कंटज महार येऊन । ग्राम आमुचा भ्रष्टविला ॥१२॥ समस्तांचे घेऊन प्राण । मग तो गेला येथून । ऐसें पापी नगर तें पूर्ण । तेथें भोजन घडलें मज ॥१३॥ तो दोष जावया संपूर्ण । द्वादश वर्षे करितों तीर्थाटन । ऐसें तो गुरुबंधु सांगोन । गेला पुढें वाराणसीं ॥१४॥ प्रचीत पहावया समस्त । गेला आपण गाधि तेथ । तों अवघ्या खुणा यथार्थ । प्रत्यया आल्या सर्वही ॥१५॥ आपण जेथें जन्मला होता महार । तेथेंही घेतला समाचार । तंव ते अनामिक सांगती समग्र । कंटज येथेंचि जन्मला ॥१६॥ तेणें सहा वरुषें राज्य करोनी । केरळ नगर भ्रष्टवूनी । मग काळें तोंड घेवोनी । गेला नेणों कोणीकडे ॥१७॥ गाधि आश्रमासी आला परतोन । घेतलें क्षितीवरी[5] घालून[5] । म्हणे आतां कैचें ब्राह्मणपण । गेलों बुडोन रौरवी ॥१८॥ शोकें कपाळ आदळी क्षितीं । म्हणे मी गौतमशिष्य विख्यात जगतीं । मज हे कैसी घडली गती । कोणासी स्थिति पुसों हे ॥१९॥ असत्य जरी म्हणावें वहिलें । तरी सर्वही प्रत्ययास आलें । जन्मकर्मदुष्कृतफळें[6] । पाहोनि आलों स्वनयनीं ॥१२०॥ सत्य कीं असत्य पूर्ण । मज कोण सांगेल उकलोन । कोणासी मी जाऊं शरण । कैंचें ब्राह्मण्य मज आतां ॥२१॥ म्हणे धांव धांव इंदिरावरा[7] । वैकुंठवासिया[8] करुणाकरा । पतितपावना सर्वेश्वरा । राजीवनेत्रा जगद्गुरो ॥२२॥ तात्काल प्रगटला जगज्जीवन[9] । म्हणे रे गाधि सावधान । माझी माया परम गहन । ब्रह्मादिकां अतर्क्य ॥२३॥ तूं म्हणविसी सर्वज्ञ जाणता । सत्य कीं असत्य माया सांग आतां । बहुत ऋषी तर्क करितां । निर्वाह सर्वथा नव्हेचि ॥२४॥ जे कथिती सदासर्वदा ज्ञान । सांगती माया लटकी म्हणोन । तेही मायेंत गेले गुंफोन । जाहले दीन सर्वही ॥२५॥ तुज माया दाविली किंचित । पुढें आणिक पाहें अद्भुत । गाधि धांवोन चरण धरीत । सोडवीं मज म्हणे येथोनी ॥२६॥ मग गाधि भगवंतें हृदयीं धरिला । वरदहस्त[10] मस्तकीं ठेविला । निजात्मबोध[11] प्रकट केला । सावध जाहला ब्राह्मण ॥२७॥ जैसा स्वप्न देखतां जागा होय । कीं यामिनीअंतीं[12] उगवे सूर्य । तैसा बोध प्रकटतां मोहभय । विरोन गेलें सर्वही ॥२८॥ असो गाधीचा उद्धार जाहला । आपुले स्वरूपीं मेळविला । हा इतिहास सांगितला । मायेनिमित्त श्रीरामा ॥२९॥

१. यमाने २. चिंतारूपी समुद्रात ३. नवऱ्याला ४. प्रौढ लोकांनी स्वत:ला जाळून घेतले होते, म्हणून फक्त मुलेच जिवंत होती ५,५. जमिनीवर आडवा पडून ६. पूर्वजन्मीच्या कुकर्माची फळे ७. हे विष्णो ८. वैकुंठात राहाणारा ९. जगाचे जीवन-विष्णू १०. कृपाहस्त ११. आत्मतत्त्वाचे ज्ञान १२. रात्रीनंतर

मग बोले रघुनंदन । माया व्हावया काय कारण । स्वरूप[1] निर्विकार[2] निर्गुण[3] । तेथें स्फुरण कां जाहलें ।।१३०।। पिंड ब्रह्मांड नानायोनी । नानावर्ण नानाखाणी । हे मुळींहून मायेची करणी । मिथ्याभूत सर्वही ।।३१।। कीं निर्गुणास सगुण लागलें । अव्यक्त तें व्यक्तास आलें । अनामास नाम ठेविलें । कां अंग लाविलें अनंगा[4] ।।३२।। ऐकोन श्रीरामाचा प्रश्न । आनंदला ब्रह्मनंदन । म्हणे बा रे तूं परिपूर्ण चैतन्यघन । जाणोन प्रश्न करितोसी ।।३३।। रामा तुझेंचि दिव्य ज्ञान । तुजचि सांगतों परतोन । जैसें सुरतरूचें[5] फळ घेऊन । त्यासचि नैवेद्य दाविजे ।।३४।। कीं कनकाद्रीचें[6] सुवर्ण घेऊन । त्यावरीच अलंकार घातले घडून । कीं क्षीरसिंधूचें दुग्ध घेऊन । पुन्हां त्यासीच समर्पिलें ।।३५।। कीं सागरींचें उदक मेघ नेती । मागुती सरिता आणूनि समर्पिती । तैसा श्रीरामा तुजप्रती । तुझेंच ज्ञान सांगतों ।।३६।। तरी तुवां केला प्रश्न । स्वरूपीं कां जाहलें स्फुरण । तरी येविषयीं दृष्टांत सांगेन । ऐक रामा निधारें ।।३७।। जैसा कोणी पुरुष निद्रिस्थ । पहुडला असे चिंतारहित । तो स्वइच्छें होऊन जागृत । कार्य कांही आठवी ।।३८।। कीं समुद्रीं उठे लहरी । तैसी ध्वनि उठे चिदंबरीं । मी[7] म्हणोन निर्धारीं । हांक थोर जाहली ।।३९।। एक असतां ब्रह्मानंद । निःशब्दीं उठिला शब्द । ते ध्वनि माया नाम प्रसिद्ध । वेदांतशास्त्र गर्जतसे ।।१४०।। जिचें नाम मूलप्रकृती । जी आदिपुरुषाची चिच्छक्तीं[8] । तिनें शेजे निजवोनि पति । सृष्टिकार्य आरंभिलें ।।४१।। येवढें ब्रह्मांड केलें निर्माण । परी पतीस कळों नेदी वर्तमान । ते परम कवटाळीण[9] । नसतींच दैवतें उभीं केलीं ।।४२।। विधि विष्णु उमाकांत । हीं तिन्ही बाळें जिचे आज्ञेंत । नेत्र उघडोन निश्चित । पाहों नेदी स्वरूपाकडे ।।४३।। बह्मसुखाचे समुद्रांत । बुडाले हे जीव समस्त । परी तेथींची गोडी किंचित । चाखों नेदी कोणातें ।।४४।। चैतन्य इनेंच झांकिलें । इनें अरूप रूपासि आणिलें । अनंत ब्रह्मांडींचे पुतळे । एक्याचि सूत्रें नाचवी ।।४५।। इनें निर्गुणास गुण लाविले जाण । अनामासी[10] ठेविलें नामकरण[11] । निराकारासी आकारून । जीवित्वासी[12] आणिलें ।।४६।। हे परम पतिव्रता साचार । पतीस न कळतां जाहली गरोदर[13] । ब्रह्मांड रचिलें समग्र । नानाविकारेंकरूनियां ।।४७।। नानायोनी विकार भाव । इनें फांसां पाडिले अवघे जीव । गाधीस कैसें दाविलें लाघव । मिथ्या कर्तृत्व नसतेंचि ।।४८।। कोणी मुरडे[14] स्वरूपाकडे । त्यासी नसतेंचि घाली सांकडें । अथवा स्वर्गसुख रोकडें । पुढें दावून भुलवी कीं ।।४९।। निजात्मसुखगोडी[15] निःसीम । ती जीवासी केली कडू परम । विषयविषरूप[16] मोहभ्रम[17] । तेथें गोडी आणिली ।।१५०।। असो ऐसी ते आदिशक्ती । तिनें इच्छा धरिली चित्तीं । तिसीच गुणक्षोभिणी म्हणती । त्रिगुण निश्चित केले इनें ।।५१।। सत्व रज तम जाण । तेचि विधि विष्णु ईशान । त्रिशक्तिरूपें धरून । तिहीं ठायीं आपण जाहली ।।५२।। ज्ञानशक्तीच्या आधारेंकरून । ज्ञानपंचक केलें निर्माण । तें अंतःकरणचतुष्टय पूर्ण । तत्त्वविद म्हणती ते ।।५३।। क्रियाशक्तीच्या आधारें रजोगुण । प्रसवला तो पंचकें तीन । एक ज्ञानेंद्रियपंचक[18] पूर्ण । कर्मेंद्रियपंचक[19] दुसरें ।।५४।। तिसरें जाणावें वायुपंचक[20] । आतां तमोद्रव्यशक्तिआधारें[21] देख । विषयपंचक[22] निर्मिलें सुरेख । पंचतन्मात्रा म्हणती ज्यातें ।।५५।। ऐसीं पंचवीस तत्त्वें निःशेष । मग केला परस्परानुप्रवेश । कर्दम करूनि विशेष । ब्रह्मांड हे रचियेलें ।।५६।।

१. आत्मरूप २. विकाररहित ३. गुणरहित ४. अंगरहितास ५. कल्पवृक्षाचे ६. मेरुपर्वताचे ७. 'अहम्' ८. चेतनतत्त्व ९. कुटिल स्त्री १०. नामापलीकडील ११. नाम दिले १२. जीवदशेस १३. ब्रह्मांडे पोटांत धारण करणारी १४. वळतो १५. आत्मानंद १६. विषय हेच विष १७. त्यात सुख आहे असा भ्रम १८. कर्णनेत्रादी १९. हस्तचरणादी २०. प्राणापानादी २१. तमोगुणाने २२. शब्दस्पर्शादी

ब्रह्मांड ही पेठ पूर्ण । नाना रीतीं रची कमलासन । चहूं खाणींचीं केणीं[१] आणून । चौऱ्यांशी लक्ष जीव केले ॥५७॥ ऐसा ब्रह्मा पेठा भरीत । विष्णु तयांचा प्रतिपाळ करीत । दहा अवतारांच्या घिरट्या घेत । संकटीं तारीत भक्तांतें ॥५८॥ सृष्टींत दोष होतां अपार । परम क्रोधी तो अपर्णावर । तत्काळ करी संहार । टाकी सर्व मोडोनियां ॥५९॥ विराट जें रचिलें ढिसाळ । हें शिवाचें देह स्थूळ । पायांचे तळवे ते पाताळ । प्रपदे रसातळ जाणिजे ॥१६०॥ याचा सांगतों निर्णय । ज्ञान जेणें प्राप्त होय । सकळ संतांचे समुदाय । ऐकोन बहुत आनंदती ॥६१॥ गुल्फद्वय तें महातळ । पोटरिया जानुयुगुळ[२] । तें तळातळ आणि वितळ । विराटाचें जाण पां ॥६२॥ कटिप्रदेश तें महीतळ जाण । नैर्ऋत्यलोक तें गुदस्थान । दक्षप्रजापति तो शिश्न । विराटाचें जाण पां ॥६३॥ जठरामाजी पोकळ । तें हें अवघे नभमंडळ । जठराग्नि तो वडवानळ । महा कल्लोळ धडकतसे ॥६४॥ सप्तसमुद्र उदरीं सकळ । ज्योतिर्लोक तें वक्षःस्थळ । महर्लोक तें कंठनाळ । वदनकमळ जनलोक ॥६५॥ वरुणलोक ते जिव्हा जाण । यमलोक त्या दंतदाढा तीक्ष्ण । अश्विनौदेव तें घ्राण । भ्रुकुटिस्थान भूर्लोक ॥६६॥ तपोलोक तें कपाळ । मस्तक ब्रह्मभुवन निर्मळ । वासरमणि तो नेत्र तेजाळ । प्रकाशकल्लोळें ब्रह्मांड भरी ॥६७॥ पातीं[५] उघडी त्या नांव दिवस । झांकिता रात्र म्हणती त्यास । उभयहस्तरूपें अमरेश । कर्तव्य करी सर्वही ॥६८॥ चंद्रमा तयाचें मन । वनस्पती रोमावळी पूर्ण । त्वचा ते जाण प्रभंजन । कर्दम पूर्ण मांस तें ॥६९॥ नाडीचक्र गंगा निश्चितीं । पृष्ठी[३] तिकडे अधर्मरीती । कनकाचळ[४] तो सुमती । शिरोभाग जाणिजे ॥१७०॥ अस्थि त्या जाण पाषाण । फेण ती लाळ ओळखे खूण । दहिंवर तें मूत्र पूर्ण । जळ तें रक्त जाणिजे ॥७१॥ पाषाणगर्भ मज्जा सत्य । पर्जन्य तें शिवाचें रेत । दुर्भिक्ष ती क्षुधा अद्भुत । जलशोष अत्यंत तृषा पूर्ण ॥७२॥ आळस तो शीतकाळ । पर्जन्यकाळ ती निद्रा सबळ । उष्णकाळ तें मैथुन केवळ । वृष्टि व्हावया तावीतसे ॥७३॥ झंझाट वायु तें धावणें । वाहाटुळी तयाचें वळणें । दशदिशा पसरल्या संपूर्णे । तें पसरण तयांचें ॥७४॥ स्तब्ध वायु तें आकुंचन । उकाडा तो निरोधन । जळवृष्टीची इच्छा काम पूर्ण । सृष्टिसंहारण[५] क्रोध तो ॥७५॥ शोक तो महा अनर्थ । मोह सृष्टिपालन यथार्थ । भय तो मृत्यु ओळख सत्य । विराटपुरुषाचें राघवा ॥७६॥ पीतवसन[६] तें अंतःकरण । रमाबंधु[७] तयाचें मन । विरिंचि[८] बुद्धि संपूर्ण । चित्त नारायण जाणिजे ॥७७॥ देवदत्त तो मुख्य प्राण । धनंजय पाताळीं आपण । दिशा तयाचे कर्ण । पवन संपूर्ण त्वचा त्याची ॥७८॥ अग्नि तयाचें वदन । चरण पाताळीं वामन । ऐसा विराटपुरुष संपूर्ण । सप्तावरणमय[९] असे ॥७९॥ भूगोल दशगुणें प्रबळ । बाह्य ओळखें पृथ्वीमंडळ । त्या दशगुणें समुद्रजळ । असंभाव्य पसरलें ॥८०॥ उदकाचे दशगुण । धडाडीत महाअग्न । त्या दशगुणें प्रभंजन । आवरण पैं जाणिजे ॥८१॥ समीरादशगुणें साचार । वाढ असे हें अंबर । नभा दशगुणें अहंकार । वेष्टिलासे सघन पैं ॥८२॥ अहंकारादशगुणें निश्चित । व्यापिलें असे महत्तत्त्व । त्या दशगुणें अद्‌भुत । मायाआवरण शेवटीं ॥८३॥ मायेपलीकडे जें उरलें जाण । तें केवळ स्वरूप निर्वाण । तें इतुकें तितुकें थोर लहान । व्यक्तिवर्ण नाहीं तेथें ॥८४॥

१. बीजे २. दोन्ही गुडघे ३. पापण्या ४. मेरुपर्वत ५. सृष्टिविलय ६. पीतांबर ७. चंद्र ८. ब्रह्मदेव ९. भूः भुवः स्वः महः जनः तपः सत्यम् हे सात लोक

ऐसा मायेचा खेळ अचाट । आतां ऐकें इचा शेवट । पंच प्रळय स्पष्ट । वेदांतशास्त्रीं निवडिले ॥८५॥ पिंडी नित्यप्रळय[१] संपूर्ण । निद्रा[१] म्हणती त्यालागून । तत्त्वांसमवेत स्थूळलिंगदेह जाण । बुडोन जाय निद्रार्णवीं ॥८६॥ हा नित्यप्रळय जाण । आतां महाप्रळय[२] तें मरण[२] । जाय स्थूळदेह संहारून । सर्व जन देखती ॥८७॥ आतां ब्रह्मांडींचा[३] प्रळय निश्चित । चारही युगें सहस्र वेळां जात । तोंवरी ब्रह्मा होय निद्रित । मग राहतो सृष्टिक्रम ॥८८॥ अवघी सृष्टि जाय संहारुनी । सर्व जळमय होय ते क्षणीं । बत्तीस लक्ष गांव चढे पाणी । जाय बुडोनी ब्रह्मांड ॥८९॥ सप्तचिरंजीव[४] बुडोन जात । सत्यलोकीं पाणी आदळत । तेव्हां वटपत्रशायी[५] भगवंत । ब्रह्मा निद्रित नाभिकमळीं ॥१९०॥ मग कमलोद्भव होय जागृत । जळ आटोनि समस्त । यथापूर्व कल्प येत । वेद निश्चित बोलतसे ॥९१॥ पूर्विल्यासारिखें होय सकळ । मागुती अवतार धरी घननीळ । अवतारचरित्र सकळ । पूर्विल्या ऐसें दावीत ॥९२॥ हा नित्यप्रळय संपूर्ण । आतां महाप्रळय ऐक दारुण । आधीं शतसंवत्सर घन । न वर्षेचि कदापि ॥९३॥ तेणें जीवसृष्टीचा संहार । सवेंच उगवती द्वादश मित्र[६] । वडवानळ तो महातीव्र । भूमंडळ जाळीत पैं ॥९४॥ तापतांचि उर्वीमंडळ । भोगीन्द्रमुखींचे निघती ज्वाळ । तेणें सप्तपाताळ सकळ । भस्म होती एकदांचि ॥९५॥ मग शतसंवत्सरपर्यंत । शुंडाधारी[७] मेघ वर्षत । जैसी जळगार जळीं विरत । जगती समस्त वितळे तेवीं ॥९६॥ उपरी महातेज अग्न । जळ शोषी न लागतां क्षण । तया तेजासी प्रभंजन । टाकील ग्रासून क्षणमात्रें ॥९७॥ मग तो अद्भुत अनिळ[८] । क्षणें गिळील निराळ । त्या गगनासी समूळ । तमोगुण ग्रासील पैं ॥९८॥ तमासी ग्रासील रजोगुण । रज सत्त्वीं होईल लीन । सत्त्वास महत्तत्त्व मिळोन । समरसेल[९] मायेंत ॥९९॥ माया होय स्वरूपीं लीन । स्वरूप स्वरूपीं समाधान । जें ब्रह्मानंदपरिपूर्ण । बोलतां मौन वेदशास्त्रां ॥२००॥ निर्गुण निर्विकार निरुपम । पूर्ण शांति योगक्षेम । असतां पूर्ण जाहले निःसीम । केला क्रम विस्मयें ॥१॥ तें तूं स्वरूप निर्वाण । राघवा नटलासी परिपूर्ण । सच्चिदानंद सत्य जाण । हेंही बोलणें न साहे ॥२॥ आटोनि सर्व अलंकार । एकरस जाहला निर्विकार । आटलें पिंडब्रह्मांड समग्र । तोचि तूं साचार श्रीरामा ॥३॥ कैंचें वैकुंठ कैंचें कैलास । लोपला अवघा मायाविलास । शेषशायी जगन्निवास । हाही भास मावळला ॥४॥ वटपत्रशायी सर्वेश्वर । हे नित्यकल्पींची गोष्ट साचार । ब्रह्मा विष्णु महेश्वर । स्वस्वरूपीं मिळाले ॥५॥ उरलें निर्विकार स्वरूप । तें तूं राघवा निर्विकल्प[१०] । अच्छेद्य अभेद्य अरूप । आत्माराम परिपूर्ण ॥६॥ स्वरूपनिर्धार[११] होतां पूर्ण । श्रीरामें झांकिले नयन । ब्रह्मानंदसागरीं लीन । रघुनंदन जाहला ॥७॥ वसिष्ठही आनंदें डुल्लत । खुंटला बोल राहिली मात[१२] । गुरुशिष्य देवभक्त । एकरूप जाहले ॥८॥ विराल्या रघुनाथाच्या शक्ती । स्वस्वरूपीं पावला विश्रांती । वसिष्ठही आत्मस्थिती । श्रीरघुनाथीं बिंबला ॥९॥ अठरा दिवसपर्यंत । श्रीराम जाहला समाधिस्थ । विसरला अवतारकारणहेत[१३] । राम समरसला आत्मरूपीं ॥२१०॥

१. झोप हा रोजचा प्रलय २. मरण हा देहाचा महाप्रलय ३. ब्रह्मांड पाण्यांत बुडते तो ब्रह्मांडप्रलय ४. अश्वत्थामा, बळी व्यास, मारुती, बिभीषण, कृप, परशुराम ५. वडाच्या पानावर निद्रित ६. सूर्य ७. सोंडेएवढ्या धारांचा पाऊस ८. वारा ९. मिसळून जाईल १०. विकल्प नसलेला ११. मी कोण याचा निश्चय १२. गोष्ट १३. अवताराचा हेतू

शरीर जाहलें अचेतन । हृदयीं आकर्षिले प्राण । गजबजिलें[१] दशरथाचें मन । म्हणे अनर्थ पूर्ण जाहला ॥११॥ गजबजिला विश्वामित्र । म्हणे काय संपला अवतार । बंदीं पडले सुरवर । सोडवील कोण तयांतें ॥१२॥ आतां कैंचें यागरक्षण । तत्काळ दशरथ देईल प्राण । आजि जाहले अष्टादश दिन । रघुनंदन सावध नोहे ॥१३॥ ऐकतां निर्वाणज्ञान थोर । राम जाहला निर्विकार । मग वसिष्ठासी विश्वामित्र । घाली नमस्कार तेधवां ॥१४॥ म्हणे महाराजा ब्रह्मसुता । सावध करीं रघुनाथा । पुढें अवतारकार्य तत्त्वतां । बहु असे तें जाणसी तूं ॥१५॥ मग वसिष्ठ म्हणे श्रीरामा । सावध होईं मेघश्यामा । चिदानंदा पूर्णब्रह्मा । यागरक्षणा आतां जाइंजे ॥१६॥ जाणोनियां स्वरूपातें । सुखें धर्मरीतीं वर्ते । पाळोनियां सज्जनातें । दुष्ट क्षयातें पाववीं ॥१७॥ जैसीं केश-नखें आंगीं वाढती । आपुलीं आपणातें रुपती । तीं छेदितां सुख निश्चितीं । तैसे दुष्टमती वधावे ॥१८॥ समाधि आणि व्युत्थान[२] । दोन्ही अंतरीं जिरवून । तुर्या उन्मनी ओलांडून । आनंदघन वर्तावें ॥१९॥ तटस्थता[३] टाकोनि वेगीं । रामा उघडी समाधि भोगीं । श्रीरामा तूं राजयोगी । सर्व संगीं निःसंग ॥२२०॥ जो आपुले ठायीं भ्रमें वर्तत । तया जगही भ्रममय भासत । भ्रमरूप ब्रह्मांड दिसत । भ्रमेंचि मृत्यु जवळी ये ॥२१॥ ईश्वराचें स्वरूप निर्वाण । भ्रमें नाकळे जाहला दीन । आपण आहें कोणाचा कोण । भ्रमें पूर्ण नोळखे ॥२२॥ भ्रमेंकरूनि जन्ममरण । भ्रमेंकरून अधःपतन । तो भ्रम गेलिया संपूर्ण । आपणाविण दुजें नसे ॥२३॥ आपण ब्रह्मस्वरूप होतां पूर्ण । ब्रह्मरूप दिसे त्रिभुवन । शत्रु मित्र थोर लहान । ब्रह्मरूप सर्व दिसे ॥२४॥ घागरी मडकीं रांजण । आंत बिंबला चंडकिरण । परी सूर्यासी स्त्रीपुरुषनपुंसकपण । कल्पांतींही घडेना ॥२५॥ सोनें साच लटिके अलंकार । तरंग मिथ्या एक सागर । पट मिथ्या तंतू निर्धार । तैसें चराचर ब्रह्मरूप ॥२६॥ नाना घट एक अंबर[४] । नाना मणि एक सूत्र[५] । नाना मातृका एक ओंकार[६] । ब्रह्म सर्वत्र तैसेंचि ॥२७॥ म्हणोनि सुटतां हृदयग्रंथि[७] । सर्व संशयां होय निवृत्ति । कर्मींच[८] होय ब्रह्मप्राप्ति । त्रिजगतीं ब्रह्मरूप ॥२८॥ उभय पक्षांचे बळेंकरूनी । विहंगम संचरती गगनीं । तैसें कर्मब्रह्म[९] ऐक्य करूनी । स्वानंदवनीं विचरावें ॥२९॥ जेथें निमाल्या सकळ आधि । श्रीरामा पूर्ण तेचि समाधि । तटस्थता हे उपाधि । एकदेशी जाण पां ॥२३०॥ अंतरी जाणोनि निर्वाणज्ञान । बाहेर दाविजे भिन्नाभिन्न । अंतरीं बोध परिपूर्ण । बाहेर जडपण दाविजे ॥३१॥ अंतरीं करून पूर्ण त्याग । बाहेर दाविजे लौकिक भाग । अंतरीं होऊनि निःसंग । विषयीं विराग[१०] धरावा ॥३२॥ बाहेर लटिकेंच कृपणपण । परी अंतरीं समसमान । रामा तोचि साधक पूर्ण । लोकसंगविवर्जित[११] ॥३३॥ जैसा बीजामधूनि वट थोर । निघे अद्भुत पर्वताकार । तैसें आत्मरूपी चराचर । जाहलें जाणोनि वर्तावें ॥३४॥ तंतू आणि पट पूर्ण । दोघांसी नव्हे वेगळेपण । घट मृत्तिकेसी टाकून । वेगळा नोहे सर्वथा ॥३५॥ तैसें जगत् आणि जगदीश्वर । भिन्न नोहे साचार । हे ज्ञान जाणोनि निर्विकार । वर्ते सदा तूं राघवा ॥३६॥ अविद्या ही विवशी वाड । निजात्मधनासी[१२] येई आड । तिचें गुरुकृपें छेदोनि बंड । वर्ते अखंड राघवा ॥३७॥

१. घाबरले २. समाधीच्या अवस्थेतून जागृतीत येणे ३. समाधी स्थिती स्तब्धता ४. आकाश ५. दोरा ६. प्रणव ७. अज्ञानरूपी गांठ ८. कर्म करतानाच ९. कर्म ब्रह्मरूप करून १०. विरक्ती, वैराग्य ११. लोकांपासून अलिप्त १२. स्वतःचे मूळ रूप

प्रपंचसमुद्र नसतांचि दिसे । गुरुकृपेचे नावेंत बैसे । निवृत्तितटीं समरसें । आत्मप्रकाशेंकरूनियां[1] ॥३८॥ अभ्यासावीण विद्या सकळा । तत्काळ होती राघवा विकळा । तैसी नोहे ज्ञानकळा । तारी अबळा निजस्पर्शे ॥३९॥ लोहीं झगटतां परिस पूर्ण । मग तें जन्मवरी जाहलें सुवर्ण । तैसें होतां आत्मज्ञान । जन्ममरण त्यासी कैंचे ॥२४०॥ म्हणोन साधक जे सज्ञान । तिहीं प्रतिपाळावें गुरुवचन । सकळ अकार्या[2] टाकून । सन्मार्गेंच वर्तावें ॥४१॥ रामा तूं गुरु म्हणसील कोण । जो तत्त्ववेत्ता अनुभवी पूर्ण । शिष्य व्हावा ज्ञाननिपुण । ऐसी मति जयासी ॥४२॥ साधकीं करावें हेंचि त्वरित । बोधवज्र घेऊन निश्चित । जन्ममरण-दुःखपर्वत । चूर्ण करूनि टाकावे ॥४३॥ मोक्षतरूचें बीज हें सत्य । अद्वैतज्ञान क्रियासहित । सदा चालिजे धर्मपंथ । सर्व कुमतें टाकोनियां ॥४४॥ ज्याचें शुद्ध मन तोचि शुचिष्मंत । सद्विवेक[3] वसे तोचि पंडित । जो गुरुभक्तीसी नव्हे रत । तरी विष यथार्थ तोचि प्याला ॥४५॥ कायसा ग्रंथ शतसहस्र[4] । मुख्य धर्म तो परोपकार । अधर्म नाम त्या साचार । परपीडा करणें जे ॥४६॥ याकारणें वत्सा रघुनाथा । तूं समाधि ग्रासोनियां आतां । धनुष्य घेऊनिया तत्त्वतां । मखरक्षणा जाइंजे ॥४७॥ ऐकतां सद्गुरूंचें वचन । श्रीराम तो सुहास्यवदन । उघडी अमल[5] राजीवनयन । जे कां आकर्ण विकासले ॥४८॥ करूनि सद्गुरूसी नमस्कार । करी प्रदक्षिणा त्रिवार । सद्गद जाहले अंतर । अष्टभावेंकरोनियां[6] ॥४९॥ मग म्हणे ब्रह्मपुत्र । बा रे दावीं आतां लीलाचरित्र । ते गुरुआज्ञा राजीवनेत्र । मस्तकीं वंदोनि निघाला ॥२५०॥ दिव्य रथीं बैसला रघुनाथ । सवें कौशिक आणि सुमित्रासुत । लक्षोनि सिद्धाश्रमाचा पंथ । सुमुहूर्तेसीं चालिला ॥५१॥ दशरथ आणि ब्रह्मसुत । भागीरथीपर्यंत बोळवीत[7] । जातां उत्तम शकुन बहुत । श्रीरामासी जाहले ॥५२॥ त्या शकुनांचा करूनि अर्थ । रायासी सांगे विरिंचिसुत । विजयश्रियेसीं[8] रघुनाथ । अयोध्येसी येईल सुखें ॥५३॥ बोळवूनि तेव्हां रघुनाथ । माघारे आले वसिष्ठ दशरथ । पुढें कथा गोड बहुत । अमृताहूनि विशेषें ॥५४॥ रामविजय वैरागर देख । षष्ठाध्याय हिरा अलोलिक । हृदयपदकीं जडोत सुरेख । संत श्रोते अनुभविती ॥५५॥ ब्रह्मानंदा रामचंद्रा । श्रीधरवरदा गुणसमुद्रा । हा षष्ठाध्याय रघुवीरा । सदा हृदयीं वसो माझ्या ॥५६॥ स्वस्ति श्रीरामविजय ग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत पंडित चतुर । षष्ठाध्याय गोड हा ॥२५७॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ ओव्या २५७ ॥

**॥ अध्याय सहावा समाप्त॥**

१. आत्मप्रकाशात २. अधर्मरूप अनिष्ट कार्य ३. सत्य काय आहे हे शोधण्याची बुद्धी ४. एक लक्ष ५. स्वच्छ ६. अष्टसात्त्विक भावांनी ७. निरोप दिला ८. यश संपादन करून

## ॥ अध्याय सातवा ॥

# ताटिकावध, अहल्या-उद्धार, सीतेचा पूर्ववृत्तांत

॥ श्रीगणेशाय नमः॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः। चंडकिरणकुलमंडना[१] । अमलकमलाक्षा[२] रघुनंदना । जलजोद्भवजनका[३] जगज्जीवना । पतितपावना श्रीरामा ॥१॥ विद्वज्जनमानसमराळा[४] । कामांतकध्येया[५] भक्तवत्सला । अनंतवेषा त्रिभुवनपाळा । दीनदयाळा रघुपते ॥२॥ जय जय अविद्याविपिनदहना[६] । निजभक्तमानसहृदयरत्ना[७] । जगदुद्धारा मुनिजनरंजना । दुर्जनभंजना राघवेशा ॥३॥ मागें षष्ठाध्यायीं कथन । वसिष्ठें रामास उपदेशून । मग विश्वामित्र गेला घेऊन । यागरक्षणाचेनि काजें ॥४॥ भागीरथींत करोनि स्नान । कौशिक राम लक्ष्मण । सारोनियां नित्य अनुष्ठान । सत्कर्माचरण वेदोक्त ॥५॥ मग धनुर्वेदयुक्ति नानामंत्र । कोणे समयीं कैसें प्रेरावें अस्त्र । तें रामासी अवघें मंत्रशास्त्र । विश्वामित्र उपदेशी ॥६॥ युद्धाच्या नाना युक्ति कळा । विश्वामित्रें सांगतांचि सकळा । राघवें आकळिल्या त्या वेळा । जैसा आंवळा करतळींचा ॥७॥ मूर्तिमंत अस्त्रदेवता । रामचरणीं ठेविती माथा । मग हृदयीं प्रवेशती तत्त्वतां । जळीं जळगार जयापरी ॥८॥ पहावया श्रीरामाचें धैर्यमानस[८] । विश्वामित्र म्हणे तया समयास । येणें मार्गे जे गेले सिद्धाश्रमास । ताटिकेनें तयांस भक्षिलें ॥९॥ येणें मार्गें रघुपती । जाऊं नये भय वाटे चित्तीं । हा मार्ग चुकवून त्वरितगती । जावें सिद्धाश्रमातें ॥१०॥ ऐकतां कौशिकाचें वचन । श्रीराम बोले सुहास्य-वदन । जेणें विश्वमित्राचे कर्ण । तृप्त होऊन सुखावती ॥११॥ स्वामी तुमचे कृपेंकरूनी । महाकाळ उभाच फोडीन बाणीं । तेथें ताटिकेसी कोण गणी । येच क्षणीं मारीन तीतें ॥१२॥ कौशिकाचे मनीं संशय होता । कीं हीं बाळकें केवीं झुंजतील आतां । त्या संशयाची समूळ वार्ता । रामवचनें निरसली ॥१३॥ मग त्या रथावरी बैसोन । ताटिकेचें पहात कानन । त्याचि मार्गें तिघेजण । जाते जाहले तेधवां ॥१४॥ वातवेगें जात स्यंदन । की अपार भूमि टाकिली क्रमोन । जैसें ऐकतां हरिकीर्तन । पापें खंडोनि भस्म होती ॥१५॥ पुढें देखिलें घोर अरण्य । वृक्ष लागले परम सघन । चालावयासी स्यंदन[९] । मार्ग पुढें फुटेना ॥१६॥ रामासी म्हणे गाधिनंदन । राघवा हेंचि ताटिकारण्य । आतां येईल ती धांवोन । वास काढून मनुष्यांचा ॥१७॥ तों हांक फोडिली अकस्मात । जे ऐकतां दचके कृतांत । विश्वामित्र जाहला भयभीत । रक्षीं म्हणत राघवा ॥१८॥ उन्मत्त दशसहस्र गजांचे बळ । ऐसी ताटिका परम सबळ । पर्वत सांठवती विशाळ । ऐसे उदर तियेचें ॥१९॥ ती कुंभकर्णाची भगिनी । बहुत विशाळ राक्षसिणी । शतांचीं शतें गोद्विज[१०] धरोनी । दाढेखालीं रगडीतसे ॥२०॥ ताटिका मार्गीं जातां सहज । मुखांत घालोनि रगडी द्विज । वनोपवनीं शोधोनि द्विज । नित्य भक्षी साक्षेपें ॥२१॥ प्रेतरक्तें वस्त्रें भरलीं । तींचि आपणाभोंवती वेष्टिलीं । मनुष्यशिरें कर्णी बांधिलीं । बहु दाट वळीनें ॥२२॥ नरशिरांच्या अपार माळा । शोणितें चर्चित रुळती गळां । कपाळीं सिंदूर चर्चिला । बाबरझोटी[११] मोकळिया ॥२३॥ द्वादश गांव पसरलें वदन । पांच गांव लंब एकेक स्तन । अगणित राक्षसी संगें घेऊन । रामावरी लोटली ॥२४॥

---

१. सूर्यवंशाचे भूषण २. निर्मळ कमळासारखे डोळे असलेला ३. ब्रह्मदेवाचा पिता ४. विद्वानांच्या मानसांतील राजहंसा ५. शंकराचा ध्यानविषय ६. अविद्यारूपी अरण्य जाळणारा ७. भक्तांच्या हृदयातील रत्न असलेला ८. मनोधैर्य ९. रथ १०. गायी आणि ब्राह्मण ११. केसांच्या बटा

सखियांसी ताटिका म्हणे तेचि क्षणीं । या पंथें येत मनुष्यघाणी । नरमांसाची आजि वांटणी । तुम्हांस देईन निधरि ॥२५॥ विश्वामित्र म्हणे चापपाणी । हे वृक्ष विशाळ गेले गगनीं । आंत गर्जतात राक्षसिणी । ताटिकेसहित पाहें पां ॥२६॥ राम काढी कोदंडाची गवसणी । जैसा याज्ञिकें फुंकिला अग्नी । कीं अकस्मात उगवला वासरमणी । यामिनीअंतीं पूर्वेसी ॥२७॥ तंव सित ओढितां आकर्ण । कडकडाट घोष उठे दारुण । सवेंच योजिला बाण । प्रळयचपळेसारिखा[1] ॥२८॥ बाणाचें अर्धचंद्राकार वदन । करी धांवत्या वायूचें खंडण । रामें ओढूनि आकर्ण । बाण सोडिला ते समयीं ॥२९॥ वृक्षांसहित राक्षसिणी । मुख्य ताटिका हृदयापासोनी । छेदोन पाडिली ते क्षणीं । घोष गगनीं न समाये ॥३०॥ प्राण जातां राक्षसिणी । ताटिका गर्जली ते क्षणीं । तो घोष विमानीं ऐकोनी । देव सर्व गजबजिले ॥३१॥ म्हणती विजयी श्रीरघुवीर । देव वर्षती सुमन संभार । ब्रह्मानंदें विश्वामित्र । रामालागीं आलिंगी ॥३२॥ म्हणे रविकुळभूषणा रघुवीरा । राजीवनेत्रा परम सुकुमारा । तुझी धनुर्विद्या रामचंद्रा । आजि म्यां दृष्टीं विलोकिली ॥३३॥ जैशीं एकाचि नामेंकरून । कोट्यवधि पापें जाती जळून । तैसें ताटिकासहित हें वन । एकाचि बाणें खंडिलें ॥३४॥ ताटिकेच्या रक्तेंकरूनी । असंभाव्य तेव्हां रंगली मेदिनी । देव दुंदुभी वाजविती गगनीं । आला चापपाणी[2] सिद्धाश्रमा ॥३५॥ जैसे वर्षाकाळीं गंगेचे पूर । तैसे चहूंकडून धांवती ऋषीश्वर । समस्तांसी वंदोनि रघुवीर । भेटता जाहला ते काळीं ॥३६॥ यज्ञमंडप शास्त्रप्रमाण । कुंड वेदिका भूमि साधोन । चारही द्वारें अष्टकोन । करिती साधन विप्र तेव्हां ॥३७॥ सकळ सामग्री सिद्ध करून । आरंभिला महायज्ञ । श्रीरामासी म्हणे गाधिनंदन । मखरक्षण करीं आतां ॥३८॥ तुवां ताटिका वधिली हा समाचार । ऐकोन धांवतील रजनीचर । मारीच सुबाहु भयंकर । प्रळय थोर करितील ॥३९॥ यालागीं नरवीरपंचानना[3] । सांभाळीं चहूंकडे रघुनंदना । परम कपटी राक्षस जाणा । पर्वतशिळा टाकितील ॥४०॥ श्रीराम म्हणे महाऋषी । तुम्हीं चिंता न करावी मानसीं । शिक्षा लावीन कृतांतासी । विघ्नें करूं आलिया ॥४१॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन । उल्हासलें ऋषीचें मन । मग दीक्षाग्रहणें गाधिनंदन । आरंभ करी यज्ञासी ॥४२॥ जैसे चंद्र वेष्टित तारागण । कीं मित्राभोंवती जैसे किरण । तैसा ऋषिवेष्टित गाधिनंदन । कुंडासमीप विराजे ॥४३॥ ओंकारासहित स्वाहाकार । अवदानें[4] टाकिती सत्वर । उठला मंत्रांचा गजर । वषट्कारघोष पैं ॥४४॥ तों अस्ता गेला वासरमणी । दोन प्रहर जाहली रजनी । पिशिताशन[5] आले धांवोनी । ताटिकेच्या कैवारें ॥४५॥ वीस कोटी रजनीचर । मुख्य मारीच सुबाहु असुर । सिद्धाश्रमासमीप सत्वर । हांक फोडीत पातले ॥४६॥ हांक ऐकोनि दारुण । भयभीत जाहले ब्राह्मण । गळती हातींचीं अवदानें । वदनीं बोबडी वळतसे ॥४७॥ म्हणती रक्षीं रक्षीं रघुनंदना । नरवीरश्रेष्ठा गोविप्रपाळणा[6] । श्रीराम म्हणे वो ब्राह्मणा । चिंता कांहीं न करावी ॥४८॥ तंव एक म्हणे ब्राह्मण । रक्षणार राम आणि लक्ष्मण । पर्वताकार राक्षस संपूर्ण । वीस कोटी पातले ॥४९॥ एक द्वार हे दोघे रक्षिती । दुज्या द्वारें राक्षस संचरती[7] । आतां कैसीं होईल गती । पळावया निश्चितीं ठाव नाहीं ॥५०॥ विश्वामित्र म्हणे स्वस्थ करा मन । मानव नव्हे रघुनंदन । पुराणपुरुष आदिनारायण । राक्षस वधावया अवतरला ॥५१॥

१. प्रलयकाळाच्या विजेसारखा २. राम ३. मनुष्यातील महावीरा ४. आहुती ५. राक्षस ६. गायी व ब्राह्मण यांचा पालक ७. प्रवेश करतात

तों पर्वत आणि पाषाण । यज्ञमंडपावरी पडती येऊन । हांक फोडिती दारुण । मग रघुनंदन काय करी ॥५२॥ कोदंड ओढून आकर्ण । सोडी बाणांपाठीं बाण । राक्षसांचीं शिरें कर चरण । तटतटां तुटताती ॥५३॥ राक्षस परम अतुर्बळी[1] । ज्यांहीं सुरांचे मुकुट पाडिले तळीं । हांक देती अंतराळीं । यज्ञमंडप वेढिला ॥५४॥ एक उडती अंबरीं[2] । प्रेतें टाकिती यज्ञकुंडावरी । मग रघूत्तम अयोध्याविहारी । सर्वद्वारीं व्यापला ॥५५॥ जिकडे तिकडे रघुनंदन । चारही द्वारें अष्ट कोन । अष्टदिशा व्यापोन । सोडी बाण श्रीराम ॥५६॥ मंडपाचिया कळसावरी । उभा राम कोदंडधारी । बाणांचा पर्जन्य तये अवसरीं । चहूंकडोनी पाडीतसे ॥५७॥ रामरूपें असंख्यात । यागमंडपाभोंवते वेष्टित । बाणांचे पूर वर्षत । संहार होत असुरांचा ॥५८॥ मंडपावर आणि खालतें । सर्व व्यापिलें रघुनाथें । तीळ ठेवावयापुरतें । रामाविण रितें स्थळ नसे ॥५९॥ तूणीरांतूनि[3] किती निघती शर । शेषासी त्याचा न कळे पार । कीं लेखकापासूनि अक्षर । किती निघती कळेना ॥६०॥ कीं मुखांतूनि शब्द निघती । त्यांची जैसी न होय गणती । कीं मेघधारा वर्षती । नाहीं गणती तयांची ॥६१॥ कीं महाकवींची पद्यरचना । किती जाहली हें कळेना । कीं कुबेरभांडारींची गणना । कदा न कळे कोणातें ॥६२॥ मेरुपाठारीं रत्नखाणी निश्चितीं । त्यांतून रत्नें किती निघती । कीं पृथ्वीवरी तृणांकुर फुटती । नाहीं गणती तयांची ॥६३॥ कीं शास्त्रसंमतें अनेकार्थ । असंख्य करिती निपुण पंडित । तैसा रामबाणांसी नाहीं अंत । तूणीर निश्चित रिता नोहे ॥६४॥ मेघ समुद्रजळ प्राशितां । परी तो रिता नोहे तत्त्वतां । कीं विष्णुमहिमा वर्णितां । न सरे सर्वथा कल्पांती ॥६५॥ तैसा उणा नोहेचि तूणीर । कोट्यनुकोटी निघती शर । करीत राक्षसांचा संहार । समरधीर[4] श्रीराम ॥६६॥ जैसी जाहलिया प्रभात । वृक्षींहूनि पक्षी उडती बहुत । तैसीं राक्षसशिरें अकस्मात । आकाशपंथें उसळती ॥६७॥ वीस कोटी राक्षस देख । एकला राम अयोध्यानायक । परी ते मृगेंद्रावरी जंबुक । अपार जैसे उठावले ॥६८॥ दंदशूक मिळोनी अपार । धरूं आले खगेश्वर[5] । कीं प्रळयाग्नीवरी पतंगभार । विझवावया झेंपावती ॥६९॥ कीं बहुत मिळून खद्योत[6] । धरून आणूं म्हणती आदित्य । कीं शलभ[7] मिळोनि समस्त । महामेरु उचलू म्हणती ॥७०॥ एकलाचि परशुधर[8] । परी अवनी केली निर्वीर । एकले नृसिंहें संभार । आटिले पूर्वी दैत्यांचे ॥७१॥ असो राक्षसशिरांच्या लाखोल्या । रामें भूलिंगासी[9] समर्पिल्या । मारीच सुबाहु ते वेळां । गदा घेऊन धांविन्नले ॥७२॥ रामें काढिला निर्वाणबाण । ज्या शरमुखीं दैवत सूर्यनारायण । सुबाहुचा कंठ लक्षून । केलें संधान राघवें ॥७३॥ जैसा विहंगम वेगेंकरून । धांवे वृक्षाग्रीचें फळ लक्षून । तैसा सवेग गेला बाण । शिर उडविलें सुबाहूचें ॥७४॥ त्या बाणाचा पिसारा किंचित । मारीचास लागला अकस्मात । त्या शरवातें अद्भुत । मारीच उडोनि गेला पैं ॥७५॥ कीं खगेश्वराच्या पक्षफडत्कारीं[10] । अचळ उडोनि जाय दिगंतरीं । तैसा मारीच समुद्राभीतरी । जाऊनियां पडियेला ॥७६॥ परम होऊनियां भ्रमित । लंकेसी गेला धाकें पळत । वाटे पाठीसी लागला रघुनाथ । परतोनि पहात घडीघडी ॥७७॥ लंकेंत राक्षस प्रवेशोन । राक्षसेंद्रातें[11] सांगे वर्तमान । म्हणे मानव नव्हे रघुनंदन । आदिपुरुष अवतरला ॥७८॥

१. महाबलिष्ठ २. आकाशात ३. भात्यातून ४. रणांगणात धैर्यवान ५. गरुड ६. काजवे ७. टोळ ८. परशुराम ९. भूमिरूपी शिवपिंडीला १०. पंखांच्या फडफडण्याने ११. रावणाला

अवघा ऐकोन वृत्तांत । रावण दचकला मनांत । जैसा सुपर्णाचा[१] ऐकतां पुरुषार्थ । सर्प बहुत संतापती ॥७९॥ कीं ऐकोन संतांचें स्तवन । मनांत कष्टी होय दुर्जन । कीं पतिव्रतेचा धर्म परिसोन । व्यभिचारिणी विटती पैं ॥८०॥ असो समस्त आटोनि रचनीचर[२] । सिद्धाश्रमीं रणरंगधीर । रणमंडळीं रघुवीर । एकला कैसा शोभला ॥८१॥ जैसे महाकल्पीं सर्व संहारे । मग एकलें परब्रह्म उरे । कीं समस्त लोपोनि नक्षत्रें । एकला दिनकर उगवे जैसा ॥८२॥ कीं शुक्तिवेगळें[३] मुक्ताफळ । दिसे जैसे परम तेजाळ । कीं प्रपंच त्यागोनि निर्मळ । योगीश्वर विलसे जेवीं ॥८३॥ जैसी रात्र निरसतां उठती जन । तैसे यज्ञमंडपांतूनि उठती ब्राह्मण । भेटती रामास जाऊन । ब्रह्मानंदेंकरोनियां ॥८४॥ जठरीं अन्नपाक[४] होय वेगें । परी गर्भास ढका न लागे । कीं ज्ञानी वेष्टित तापत्रयभोगें[५] । परी अंतर न भंगे सर्वथा ॥८५॥ तैसे यज्ञमंडपासहित विप्र । रघूत्तमें रक्षिले साचार । पूर्ण जाहला मख समग्र । श्रीरघुवीरप्रतापें ॥८६॥ विश्वामित्रासी नावरे प्रेमा । म्हणे वत्सा माझिया श्रीरामा । सहस्रवदनास[६] तुझा महिमा । न वर्णवेचि सर्वथा ॥८७॥ कौशिकासी म्हणती ऋषिजन । श्रीराममूर्ती धाकुटी सगुण । पर्वताकार राक्षस संहारून । कैसे क्षणमात्रें टाकिले ॥८८॥ विश्वामित्र हास्यवदन । ऋषींप्रति बोले वचन । म्हणे आदित्यमंडळ[७] दिसे लहान । परी पृथ्वीभरी प्रकाश ॥८९॥ धाकुटा दिसे कलशोद्भव । उदरीं सांठविला जलार्णव । कीं वामनरूप धरी केशव । परी दोन पाऊलें ब्रह्मांड केलें ॥९०॥ दिसे इंद्राचें वज्र लहान । परी पर्वताचें केलें चूर्ण । पंडितबुद्धी दिसे सान । परी आब्रह्मभुवन[८] व्यापिलें ॥९१॥ तैसा श्रीराम धाकुटा दिसे तुम्हां । परी ब्रह्मादिकां नेणवे महिमा । पुराणपुरुष हा परमात्मा । भक्तरक्षणा अवतरला ॥९२॥ असो भूतावळी पातल्या तेथें । त्यांहीं भक्षिलीं राक्षसप्रेतें । यज्ञमंडपाभोंवतें । शुद्ध केलें भूमंडळ ॥९३॥ तों आलें मिथिलेश्वराचें पत्र । तें स्वयें वाची विश्वामित्र । सवें घेऊन समस्त विप्र । स्वयंवरालागीं येइंजे ॥९४॥ ते दिवशीं बहुत सोहळा । सिद्धाश्रमीं कौशिकें केला । ब्राह्मणभोजन जाहलिया सकळां । वस्त्रें अलंकार दिधले ॥९५॥ जेथें साह्य श्रीराम आपण । तेथें कांहीं न दिसे अपूर्ण । बहुत दक्षिणा देऊनि ब्राह्मण । विश्वामित्रें संतोषविले ॥९६॥ असो जाहलिया रजनी । कौशिक निजला स्वशयनीं । पुढें रामलक्ष्मण घेउनी । सुखेंकरून पहुडला ॥९७॥ साक्षात् शेषनारायण । कौशिक निजला पुढें घेऊन । निद्रा नव्हे ते समाधि पूर्ण । उन्मनी ओंवाळून टाकावी ॥९८॥ हृदयीं न धरितां रघुनाथा । शेजे निजती जे तत्त्वतां । मज गमे ऐसें पाहतां । कीं पशूच केवळ पडियेले ॥९९॥ रामस्मरणेंविण भोजन । जैसें भस्मीं घातलें अवदान । तें यज्ञपुरुषासी न अर्पण । वृथा भोजन तैसें तें ॥१००॥ रामप्राप्तीविण कर्म देख । नाशिती कुश मृत्तिका उदक । तरी ते पिशाच नर ओळख । भुलले मूर्ख जाणिजे ॥१॥ श्रीरामप्राप्तीविण ज्ञान । त्याचें नांव म्हणिजे अज्ञान । विद्या तेचि अविद्या पूर्ण । धर्म तो अधर्म जाणिजे ॥२॥ असो धन्य भाग्य कौशिकाचें । पुढें निधान[९] श्रीवैकुंठींचें । घेऊन पहुडला साचें । नाहीं चिंतेचें वास्तव्य ॥३॥ निद्रा लागली जों ऋषीस निश्चितीं । तों जागे जाहले दोघे दाशरथी । श्रीराम म्हणे सौमित्राप्रती । परियेसीं एक जिवलगा ॥४॥ आम्ही कधीं जाऊं अयोध्येसी । पाहूं दशरथाचा वदनशशी[१०]। बोलतां श्रीरामाचे नेत्रांसी । अश्रु आले तेधवां ॥५॥ तों शयनीं[११] जागा जाहला गाधिसुत । दोघांच्या ऐशा गोष्टी ऐकत । स्फुंदस्फुंदोनि बोले रघुनाथ । श्रीदशरथ देखों कधी ॥६॥

---

१. गरुडाचा २.राक्षस ३. शिंपीपेक्षा वेगळे ४. अन्न-पचन ५. त्रिविध तापाने त्रस्त ६. शेषाला ७. सूर्यबिंब ८. संपूर्ण ब्रह्मांड ९. बहुमोल ठेवा १०. मुखरूपी चन्द्र ११. झोपेतून

सकळ रायांचे मुगुट एकसरीं । नमस्कारिती ते अवसरीं । पडती दशरथाचे प्रपदावरी । किणीं[१] पडलीं चरणीं तेणें ।।७।। ते चरण मी कधीं देखेन । दशरथाच्या पादुका घेऊन । दिव्यरत्नीं मंडित पूर्ण । मी उभा ठाकेन कधीं पुढें ।।८।। जे अयोध्याप्रभूची[२] पट्टराणी । कौसल्या आमुची जननी । ते अत्यंत कृश होउनी । वाट पाहत असेल कीं ।।९।। ऐसें विश्वामित्रें ऐकिलें । उठोनि रामासी हृदयीं धरिलें । म्हणे बा रे जनकाचें पत्र आलें । उदयिक जाऊं मिथिलेसी ।।११०।। तेथें केवळ विजयश्री सीता । ते तुज माळ घालील रघुनाथा । कौसल्येसहित दशरथा । तेथेंचि तुज भेटवीन ।।११।। तूं जगद्गुरु श्रीरामचंद्र । दाविसी लौकिक लीलाचरित्र । असो उदयाचळीं प्रकटलें रविचक्र । विप्र सारिती नित्यनेम ।।१२।। घेऊन ऋषीश्वरांचे संभार । श्रीराम आणि सौमित्र । निघता जाहला विश्वामित्र । मिथिलापंथें ते काळीं ।।१३।। चरणचालीं ऋषी चालती । म्हणोनि रथ टाकोनि रघुपती । चरणीं चालतां जगती । धन्य जाहलें म्हणतसे ।।१४।। दोन्ही बाहीं विश्वामित्र आणि सौमित्र । मध्यें जगद्वंद्य राजीवनेत्र । तो घनश्याम चारुगात्र[३] । कैसा शोभला ते काळीं ।।१५।। पूर्वीं मंथावया क्षीरसागर । निघाला जेव्हां क्षीराब्धिजावर[४] । तेव्हां ब्रह्मा आणि उमावर । जेवीं दोन्ही भागीं शोभले ।।१६।। कीं शशिमंडळ दोहींकडे लखलखित । शोभती भृगुतनय[५] अंगिरासुत[६] । कीं शंख चक्र विराजत । श्रीविष्णूच्या दोन्ही भागीं ।।१७।। असो ऐसा चालतां रघुनाथ । ऋषी आपुलाले आश्रम दावित । ठायीं ठायीं बैसवूनि रघुनाथ । पूजा करिती आदरें ।।१८।। समस्तांचा करीत उद्धार । पुढें चालत जगदुद्धार । तों पुढें प्रचंड शिळा दुर्धर । दृष्टीं देखिली राघवें ।।१९।। तों श्रीरामचरणरज ते वेळे । वायुसंगें पुढें धांविन्नले । शिळेवरी जाऊन पडले । नवल वर्तलें अद्‌भुत ।।१२०।। अहल्येसी लाविला चरण । ऐसी कथा वर्णिती कविजन । तरी अहल्या ब्रह्मकन्या पूर्ण । गौतमाची निजपत्नी ।।२१।। ब्राह्मणपत्नी[७] ते महासती । तियेतें पाय लावील रघुपती । हें न घडे कल्पांतीं । बरवें संतीं विचारिजे ।।२२।। असो चरणरजेंचि ते वेळां । कांपों लागली प्रचंड शिळा । विश्वामित्राप्रति घनसांवळा[८] । पुसता जाहला वृत्तांत ।।२३।। म्हणे ऋषि हें नवल वर्तत । थरथरां शिळा कांपत । जैसा चंद्रोदय हळुहळू होत । तैसी शिळा दिव्यरूप होय ।।२४।। परम शोभती विद्रुमाधर[९] । जे चंपकवर्ण सुकुमार । उर्वशी रंभा म्हणती सुंदर । परी इजवरोनि ओंवाळिजे ।।२५।। मस्तकींचे रुळती कबरीभार[१०] । वल्कलें वेष्टित सुंदर । मज वाटतें इंद्रादि सुरवर । इचे पोटीं जन्मले ।।२६।। कीं हे आदिभवानी साचार । आम्हांस आली हो समोर । कीं हे कोणी ऋषिपत्नी सुंदर । निद्रा घेऊन उठली पैं ।।२७।। कीं पडली होती मूर्च्छा येउनी । कीं निघाली पाताळाहुनी। कोणीं टाकिली वधोनी । प्राण येऊन उठली आतां ।।२८।। कीं कोणी केलें शासन । बैसली होती रुसोन । कीं तुमची तपश्चर्या संपूर्ण । येणें रूपें आकारली ।।२९।। मग विश्वामित्र म्हणे राजीवनेत्रा । हे ब्रह्मकन्या[११] परम पवित्रा । पतीनें शापितां मदनारिमित्रा[१२] । शिळारूप जाहली हे ।।१३०।। श्रीराम म्हणे महाऋषी । अहल्या शिळा जाहली कैसी । तो वृत्तांत मजपाशीं । कृपा करोनि सांगिजे ।।३१।। ऋषि म्हणे विरिंचीनें[१३] ब्रह्मांड रचिलें । चित्र विचित्ररूप विस्तारिलें । सकळांमाजी विशेष केलें । अहल्येचें स्वरूप पैं ।।३२।। देखोन परम सुंदर । तीस मागों येती बहुत वर । कमलोद्भवासी[१३] पडला विचार । स्वयंवर थोर मांडिलें ।।३३।।

१. वण २. दशरथाची ३. सुंदर अवयव असलेला ४. विष्णू ५. शुक्र ६. बृहस्पती ७. गौतम ऋषीची पत्नी ८. श्रीराम ९. लाल ओठ १०. केशपाश ११. ब्रह्मदेवाची मुलगी १२. हे रामा १३. ब्रह्मदेव

ब्रह्मा बोले मानसींचा पण । दों प्रहरांत पृथ्वीची प्रदक्षिण । करून येईल पुढें पूर्ण । त्यासी देईन हे अहल्या ॥३४॥ ऐकोनि ऐसिया पणासी । धांवों लागले देव ऋषी । यक्ष गंधर्व तापसी । पृथ्वीप्रदक्षिणेसी चालिले ॥३५॥ यांत अवघ्यांपुढें अमरपती[१] । ऐरावतारूढ धांवे शीघ्रगती । इतर लोकपाळही धांवती । वाहनीं बैसोनि आपुलाल्या ॥३६॥ एक ऊर्ध्वपंथें वेगें जाती । एक समीरगती[२] धावती । एक मार्गीं अडखळून पडती । सर्वेचि पळती उठोनियां ॥३७॥ तंव इकडे गौतम मुनी । जान्हवीजीवनीं[३] स्नान करूनी । बाहेर येतां नयनीं । द्विमुखी[४] कपिला देखिली ॥३८॥ तंव गायत्रीमंत्र जपोन । विधियुक्त केल्या प्रदक्षिणा तीन । नित्यकर्म अनुष्ठान । गौतमें केलें सावकाश ॥३९॥सत्यलोकास आला परतोन । ज्ञानीं पाहे कमलासन[५] । तों पृथ्वीप्रदक्षिणा तीन । करोनी आला गौतमी मुनी ॥१४०॥ विधि म्हणे धन्य जाहलें । अहल्येचें भाग्य फळासि आलें । तत्काळ दोघांसी लग्न लाविलें । यथाविधि पाणिग्रहण ॥४१॥ तों अवघियांपुढें अमरपती । धांवत आला शीघ्रगती । वधूवरें देखोनि चित्ती । परम क्रोध संचरला ॥४२॥ विरिंचीस[५] म्हणे सहस्रनयन । वृद्धास केलें कन्यादान । तूं असत्यनाथ[६] पूर्ण । कळों आलें येथोनि आम्हां ॥४३॥ स्रष्टा[७] म्हणे वज्रधरासी[८] । मज असत्य तूं किमर्थ म्हणसी । येणें तीन प्रदक्षिणा केल्या पृथ्वीसी । पाहें मानसीं विचारूनी ॥४४॥ विचार न करितां बोले वचन । सज्जनासी ठेवी नसतें दूषण । वेदवाणी मानी अप्रमाण । शतमूर्खांहूनि मूर्ख तो ॥४५॥ असो इंद्रें द्वेष धरूनि मानसीं । म्हणे एक वेळ भोगीन अहल्येसी । परतोन गेला स्वस्थानासी । खेद अत्यंत पावोनियां ॥४६॥ घेऊनियां अहल्येसी । गौतम आला निजाश्रमासी । बहुत क्रमिलें कालासी । परी इंद्र अहर्निशी जपतसे ॥४७॥ तंव आलें सूर्यग्रहण । गौतम अहल्या स्नान करून । ऋषि ध्यानीं बसला तल्लीन । अहल्या परतोन घरा आली ॥४८॥ ब्रह्मकन्या एकली गृहांत । जाणोनि शक्र आला धांवत । गौतमाचा वेष धरीत । सतीलागीं भोगावया ॥४९॥ कपाट[९] देवोन गृहांतरीं । आंत बैसली ब्रह्मकुमारी[१०] । तों हा कपटवेषधारी । येऊन द्वारीं उभा ठाके ॥१५०॥ म्हणे अहल्ये धांव धांव झडकरी । म्हणोन आंग टाकिलें धरणीवरी । येरी धांवोन आली द्वारीं । हृदयीं धरी तयातें ॥५१॥ कापट्य नेणे महासती । हृदयीं निर्मळ जैसी भागीरथी । परम खेद करी चित्तीं । नयनीं वाहत अश्रुपात ॥५२॥ अहल्येनें वेगें उचलिला । नेऊन मंचकावरी पहुडविला । म्हणे प्रिये प्राण चालला । अंगसंग देईं वेगें ॥५३॥ येरी म्हणे स्वामी आजि ग्रहण । माध्यान्हास आला चंडकिरण[११] । महाराज तुम्ही शास्त्रज्ञ पूर्ण । विचारून पाहावें ॥५४॥ येरू म्हणे तुज शास्त्रासीं काय कारण । माझें वचन तुज प्रमाण । तंव ते सतीशिरोरत्न[१२] । अवश्य म्हणे ते काळीं ॥५५॥ अहल्या इंद्र दोघांजणीं । शयन केलें एके शयनीं । तंव गौतम नित्यनेम सारूनी । आश्रमासी पातला ॥५६॥ म्हणे अहल्ये उघडीं वो द्वार । येरी घाबरी सांवरी वस्त्र । म्हणे तूं कोण रे दुराचार । तो म्हणे अमरेंद्र[१३] जाण मी ॥५७॥ म्हणे रे अपवित्रा काय केलें । श्रोतियाचें[१४] पात्र कां स्पर्शिलें । तुझें थोरपण दग्ध झालें । कर्म केलें विपरीत ॥५८॥ रति जाहली कीं परिपूर्ण । वेगीं जाय तूं येथून । मग अहल्या कपाट[१५] उघडी धांवोन । तंव गौतम दृष्टीं देखिला ॥५९॥

१. इन्द्र २. वायुवेगाने ३. गंगेच्या पाण्यात ४. प्रसूत होत असणारी ५. ब्रह्मदेव ६ सत्यलोकाचा अधिपती नसून असत्य बोलणारा ७. ब्रह्मदेव ८. इन्द्राला ९. कडी लावून १०. ब्रह्मदेवाची मुलगी अहल्या ११. सूर्य १२. सतींमध्ये श्रेष्ठ १३. इंद्र १४. याज्ञिकाचे १५. द्वार

अहल्येस ऋषि कैसा भासला । कीं कल्पांतींचा सूर्य प्रगटला । की अपर्णावर[१] कोपला । तृतीय नेत्र उघडोनियां ॥१६०॥ तों इंद्र पळतां शापिलें वेगें । तुझें अंगीं होतील सहस्र भगें[२] । नपुंसक होऊन वागें । परद्वारिया[३] पतिता तूं ॥६१॥ तंव ते अहल्या कामिनी । थरथरां कांपे ऋषीस देखोनी । जैसी महावातें कमळिणी । उलथोन पडों पाहे कीं ॥६२॥ ग्रहणीं काळवंडे वासरमणी । तैसी मुखींची कळा गेली उतरोनी । परम कोपायमान मुनी । अहल्येसि शापीत ॥६३॥ हो तुझें शरीर शिळावत । जड होऊन पडो अरण्यांत । साठ सहस्रवर्षेंपर्यंत । राहें मूर्च्छित होऊनियां ॥६४॥ शाप ऐकतांच लवलाहें । धांवोनि धरी ऋषीचे पाये । म्हणे महाराजा विचारूनि पाहें । कापट्ये केलें चांडाळें ॥६५॥ जाणोनियां पाकशासन[४] । जरी म्यां दिधलें असेल भोगदान । तरी माझें शरीर हो शतचूर्ण । ठकविलें पूर्ण पतितानें ॥६६॥ ऋषी म्हणे तुवां जाणोन । शापिला नाही पाकशासन । रति झाली कीं परिपूर्ण । जाय म्हणोन बोललीस ॥६७॥ येरी म्हणे नेणोनि घडलें पाप । मज उपजला पश्चात्ताप । तपोनिधि पुण्यरूप । देईं उश्शाप सर्वथा ॥६८॥ अहल्या परम दीनवदन । नेत्रीं वाहे अश्रुजीवन । द्रवलें गौतमाचें मन । काय वचन बोलिला ॥६९॥ म्हणे रविकुळीं अवतरेल नारायण । कौसल्यात्मज रघुनंदन । त्याच्या पदरजप्रतापेंकरून[५] । उद्धरोन मज पावसी ॥१७०॥ आतां होईं तूं चंडशिळा । जड पाषाण परम सबळा । वचन ऐकतांचि तत्काळा । अहल्या मूर्च्छित पडियेली ॥७१॥ शरीर पडलें अचेतन । अंग सर्व जाहलें पाषाण । केश नेत्र नासिका स्तन । जाहलें कठिनरूप तेव्हां ॥७२॥ प्राण गोळा होऊनि समस्त । आकर्षोनि राहिली गुप्त । गौतम आपुले दृष्टीं पाहत । पाषाणवत अहल्या ॥७३॥ मग आठवूनि अहल्येचे गुण । गौतमासी आलें रुदन । म्हणे अहल्येऐसें गुणनिधान[६] । कैसें टाकून जाऊं मी ॥७४॥ तीस नेणोन घडलें पाप । म्यां तर दिधला दीर्घ शाप । आतां करावया जाईन तप । इजसमीप कोणी नाहीं ॥७५॥ येथें सर्प व्याघ्रादि जीवजाती । ईस शिळा देखोनि पीडा करिती । चंपककळिका अहल्या सती । परम खेद पावेल ॥७६॥ मग ऋषी शाप देत वनासी । जे जीवमात्र येतील अहल्येपाशीं । ते गतप्राण होतील निश्चयेसीं । कोणीं शिळेसी न पाहावें ॥७७॥ ऐसें ऐकतां शापवचन । एक वृक्ष वेगळे करून । पिपीलिकादि गज व्याघ्र संपूर्ण । गेले पळून ते काळीं ॥७८॥ मग महाऋषि गौतम । सतीचा खेद करी परम । पावला तो बद्रिकाश्रम । अनुष्ठान करीत बैसला ॥७९॥ म्हणे कामें नाडिला पाकशासन । मज क्रोधे नागविलें पूर्ण । इंद्र अहल्येसी शापितां जाण । तपक्षय जाहला ॥१८०॥ इकडे इंद्र मयूर होऊन अरण्यांत । अनुतापें हिंडे रुदन करीत । मग समस्त देवीं अमरनाथ[७] । गौतमापाशीं आणला ॥८१॥ सुरवरीं[८] बहुत प्रार्थून । केलें गौतमाचें समाधान । गौतम बोले प्रसन्नवदन । सहस्रनयन[९] तूं होशील ॥८२॥ शक्र सहस्रनेत्र जाहला । निजपदा तत्काळ पावला । तैंपासोन हे अहल्या शिळा । आजवरी जाहली होती ॥८३॥ रामा तुझे पडतां चरणरज । अहल्या दिव्यरूप[१०] जाहली सहज । श्रीरामा पहावया तुज । सजीव सतेज जाहली ॥८४॥ कौशिकें सांगतां हें पूर्वकथन । आश्चर्य करी रघुनंदन । कौशिकासी प्रतिवचन । काय बोलता जाहला ॥८५॥ म्यां काय केलें असे आचरण । माझ्या पदरजें उद्धरे पाषाण । कौशिक म्हणे तुझे पदरज:कण । त्यांचें वैभव रामा हें ॥८६॥

---

१. भगवान शंकर २. योनिचिन्हे ३. व्यभिचारी ४. इंद्र ५. पायाच्या धुळीच्या प्रभावाने ६. सद्गुणांचे आश्रयस्थान ७. इंद्र ८. सर्व देवांनी ९. इंद्र १०. मूळ स्वरूपाला

असो रघुवीर ते काळीं । ऋषिसहित आला तियेजवळी । पदर सांवरूनि उठली । अहल्यादेवी तेधवां ॥८७॥ मस्तकींचे मोकळे कबरीभार । सांवरोनि वीरगुंठी[१] बांधी[१] सत्वर । नेत्रीं न्याहाळित रघुवीर । विधिसुता[२] समोर पातली ॥८८॥ जो दशरथाचा महत्पुण्यमेरु[३] । जो कां लावण्यामृतसागरु[४] । जो जगद्वंद्य जगद्गुरु । अहल्येनें देखिला ॥८९॥ जो मृडानीपति-हृदयरत्न[५] । जो इंद्रादिदेवांचें देवतार्चन । जो जलजोद्भवाचें ध्येय पूर्ण । नारदादिक वंदिती जया ॥९०॥ जे सनकादिकांची आराध्यमूर्ती । चारी[६] साही[७] वर्णिती ज्याची कीर्ती । तो नेत्रीं देखिला रघुपति । प्रेम चित्तीं न समाये ॥९१॥ अष्टभावें दाटोन ब्रह्मकन्या । साष्टांग नमी राजीवनयना । तों श्रीराम बोले सुवचना । माते ऊठ झडकरी ॥९२॥ ऐसें ऐकतां तें वेळीं । कमलोद्भवकन्या ऊठली । जैसी कोकिळा गर्जे वसंतकाळीं । तैसी स्तवन करीतसे ॥९३॥ म्हणे जय जय रामा करुणा-समुद्रा । हे दशरथे प्रतापरुद्रा । हे जगद्गुरो श्रीरामचंद्रा । मज चकोरालागीं उदय तुझा ॥९४॥ हे राघवा पुराणपुरुषा । हे जगत्पालका अनंतवेषा । हे कौसल्यात्मजा चंडांशा[८] । निरसली निशा तव उदयीं ॥९५॥ हे विद्वज्जनमानसरंजना । हे ताटिकांतका नरवीरपंचानना । तुझ्या नामप्रतापाची ऐकतां गर्जना । पापवारणा[९] संहार ॥९६॥ श्रीरामा तूं भवरोगवैद्य सुजाण । मात्रा[१०] देऊन निजचरणरेण[११] । दोषक्षयरोग दवडोन । अक्षय केलें मजलागीं ॥९७॥ साठ सहस्रवर्षेंपर्यंत । अहंदेहभूतें[१२] झडपिलें यथार्थ । तूं पंचाक्षरी येतां रघुनाथ । भूतें समस्त पळालीं ॥९८॥ साठ सहस्र वर्षेंवरी । जळतां चिंतेच्या वणव्याभीतरी । तूं मेघ वर्षतां झडकरी । आजि पूर्ण निवाल्यें ॥९९॥ माझ्या कुरळकेशेंकरून । राघवा झाडीन तुझे चरण । तुजवरून ओंवाळून । काया टाकीन माझी हे ॥२००॥ असो गौतम पाहे ज्ञानीं । तों उद्धरली आपुली कामिनी । तत्काळ उभा ठाकला येऊनी । वंदी चापपाणी तयातें ॥१॥ श्रीराम उगवतां दिनमणी । हीं चक्रवाकें मिळालीं दोन्ही । असो सकळ ऋषि मिळोनी । शेंस भरिती उभयतांची ॥२॥ अहल्या म्हणे हो श्रीरामा । तुज अनंत कल्याण हो सर्वोत्तमा । हिमनगजामातृमनविश्रामा[१३] । पूर्णब्रह्मा परात्परा ॥३॥ श्रीरामा सीता स्वयंवरीं । तुजचि प्राप्त होईल ते नोवरी । तुजवांचोनि आणिकास न वरी । तुजचि वरी निर्धारें ॥४॥ अहल्या गौतम दोघांजणीं । निजाश्रमीं पूजिला चापपाणी । पुढें श्रीराम आज्ञा घेउनी । मिथिलेजवळी पातले ॥५॥ शतानंद पुत्र अहल्येचा । तो होय पुरोहित जनकाचा । संग धरोनि श्रीरामाचा। तो निघाला ते वेळीं ॥६॥ मिथिलेबाहेर उपवनांत । ऋषीसहित राहिला रघुनाथ । तों नगरांतून आली मात । स्वयंवरपणाची[१४] तेधवां ॥७॥ उमाकांताचें[१५] चाप दारुण । त्यास जो बळिया वाहील[१६] गुण[१६] । त्यास जानकीपाणिग्रहण । हाचि पण स्वयंवरीं ॥८॥ श्रीराम म्हणे विश्वामित्रासी । जानकी जन्म पावली कैसी । पण केला धनुष्यासी । तरी तें चाप कोणाचें ॥९॥ कौशिक सांगे पूर्वकथन । पूर्वी राजा पद्माक्ष जाण । तेणें कमला करून प्रसन्न । हेंचि वरदान मागितलें ॥२१०॥ कन्या होऊन घरीं । खेळें माझिये अंकावरी । मग ते वैकुंठपतीची[१७] अंतुरी[१८] । काय बोले तेधवां ॥११॥ मी येतां तुझिया मंदिरा । बरें तुज नव्हे नृपवरा । नसतीं विघ्नें येतील घरा । विचार बरवा नव्हे हा ॥१२॥ नृप म्हणे निश्चयें माझे अंतरीं । माते तूं होय माझी कुमरी । इंदिरा म्हणे स्वामी मुरारी । तया आधीन मी असें ॥१३॥ मग प्रसन्न करून श्रीधर । राजा पद्माक्ष मागे वर । मज कन्या रमा देईं साचार । ऐकतां मुरहर हांसिन्नला ॥१४॥

---

१. अंबाडा २. ब्रह्मदेवाची मुलगी ३. महान पुण्याचा पर्वत ४. लावण्यरूपी अमृताचा सागर ५. शंकराच्या हृदयात नामरूपाने वसणारा ६. वेद ७. सहा दर्शने ८. सूर्यासमान असणाऱ्या रामा ९. पापरूपी हत्ती १०. तुझ्या पायाची धूळ हीच मात्रा ११. पापरूपी क्षयरोग १२. मी देह आहे या भूताने १३. हिमालयाचा जावई शंकर, याच्या मनाला आराम देणारा राम १४. स्वयंवरासाठी जो पण नेमला होता त्याची १५. श्रीशंकराचे १६. दोरी लावील १७. श्रीविष्णूची १८. पत्नी

मग मातुलिंग[१] फळ दिधलें । तें रायें घरीं नवमास ठेविलें । त्यांतून कन्यारत्न निघालें । तेज प्रकटलें असंभाव्य ॥१५॥ वाढतां वाढतां जाहली उपवर । तीस मागों येती बहुत वर । पद्माक्षासी सुख अपार । कन्या सुंदर देखोनि ॥१६॥ ऋषिगण गंधर्व नृपवर । यक्ष चारण विद्याधर । एकवटले समग्र । पद्माक्षाचे मंदिरीं ॥१७॥ म्हणे पण करीं एक लागवेगीं । कोप चढला पद्माक्षालागीं । म्हणे नभसुनीळता[२] जयाचे अंगीं । त्यास कन्या देईन हे ॥१८॥ ऐकोनि सर्वही कोपले । म्हणती काय रे मिथ्या बोले । एकसरिसे वीर खवळले । युद्ध मांडलें असंभाव्य ॥१९॥ अवघ्यां राजयांसी एकला । पद्माक्ष सप्तदिन भांडला । शेवटीं सर्वीं मिळोनि मारिला । पद्माक्षराव रणामाजी ॥२२०॥ तो पद्माक्षी ते वेळीं । अग्निकुंडीं गुप्त जाहली । पद्माक्षाची संपदा लुटिली । ग्राम विध्वंसूनि सर्व गेले ॥२१॥ तया ब्रह्मारण्यामाझारी । पद्माक्षी निघाली कुंडाबाहेरी । रावण विमानारूढ ते अवसरी । लावण्यसुंदरी देखिली ॥२२॥ देखोन सौंदर्यरूपडें । रावणाची उडी पडे । येरी यज्ञकुंडामाजी दडे । रावणें कुंड विझविलें ॥२३॥ तेथें खणितां बहुत यत्नें । त्यासि सांपडलीं पांच रत्नें । घरा आणिलीं दशाननें[३] । संदुकेमाजी ठेविलीं ॥२४॥ मग एकांतींचें अवसरीं । रावण सांगे मंदोदरी । अमोल रत्नें पृथ्वीवरी । तुजलागीं सुंदरी आणिलीं ॥२५॥ धांवोनि मंदोदरी उचली पेटी । तंव न ढळेचि तये गोरटी । हांसोन दशवक्त्र शेवटीं । आपण उठे उचलावया ॥२६॥ तंव ती न ढळेचि विसां[४] करीं[४] । आश्चर्य झालें ते अवसरीं । प्रधान आणि मंदोदरी । पेटी उघडिती तेधवां ॥२७॥ तंव षण्मासांचें कन्यारत्न । देखता होय दशानन । मंदोदरी म्हणे हें विघ्न । राया घरासी आणिलें ॥२८॥ जो मायावरणावेगळा[५] । चैतन्यदेही[६] घनसांवळा । त्यासीच हे घालील माळा । इतरां ज्वाळा अग्नीची हे ॥२९॥ इनें निर्दाळिला पद्माक्ष नृपवर । बहुत रायांचा केला संहार । ही येथें असतां साचार । लंकापुर नुरेचि ॥२३०॥ दशानना हें परम विघ्न । इजसी आधीं बाहेर घालीं नेऊन । मग बोलाविले सेवकजन । संदूक मस्तकीं दीधली ॥३१॥ पेटी उचलिली ते अवसरीं । हळूच आंतून शब्द करी । मी आणिक येईन लंकापुरीं । रावण सहपरिवारीं[७] वधावया ॥३२॥ ऐकोनियां ऐसें वचन । रावणाचें दचकलें मन । म्हणे इचा आतां वध करीन । मयजा चरण धरी मग ॥३३॥ चरणीं दृढ ठेवोनि माथा । म्हणे पुढील विघ्नें आतांचि कां आणितां । मग शांत केलें पौलस्तिसुता । सकळीं मिळूनि तेधवां ॥३४॥ रावण सांगे सेवकांसी । जनकराजा आहे मिथिलेसी । त्याचिया गांवावरी हे विवसी[८] । धाडी नेऊन घाला रे ॥३५॥ मग रातोरातीं तत्काळीं । पेटी पुरिली मिथिलेजवळी । तें शेत कोणे एकेकाळीं । जनकें ब्राह्मणासी दीधलें ॥३६॥ पद्माक्ष नृप पूर्वीचा पूर्ण । पुन्हां अवतरला तो ब्राह्मण । रायें वेदवक्ता[९] म्हणोन । क्षेत्रदान दीधलें ॥३७॥ सुमुहूर्त पाहोनि सुंदर । ब्राह्मणें जुंपिला नांगर । नांगरदांतीं[१०] परिकर । पेटी अकस्मात लागली ॥३८॥ ब्राह्मण सत्य सन्मार्गी । पेटी उचलिली लागवेगीं । मग दाखविली जनकालागीं । म्हणे राया ठेवणें[११] घेईं आपुलें ॥३९॥ राव म्हणे काय आहे भीतरी[१२] । विप्र म्हणे मी नेणे निर्धारीं । जनकराजा आश्चर्य करी । पेटी उघडिली तेधवां ॥२४०॥ भोंवते प्रधान पाहती सकळी । तों पांच वर्षांची कन्या देखिली । असंभाव्य[१३] प्रभा पडली । आश्चर्य वाटलें सकळिकां ॥४१॥ जनकास उपजला स्नेहो[१४] । म्हणे स्वामी हें कन्यारत्न मज द्या हो । ब्राह्मण म्हणे महाबाहो । तुझीच कन्या हे निर्धारें ॥४२॥

---

१. महाळुंग फळ २. आकाशाप्रमाणे निळा रंग ३. रावणाने ४. वीस हातांनी ५. मायेच्या आवरणापलीकडचा ६. चैतन्यरूप विष्णू ७. परिवारासह ८. जखीण ९. वेद जाणणारा १०. नांगराच्या फाळाला ११. निधान १२. आत १३. कल्पनातीत तेजस्वी १४. प्रेम

ऐसी ते जनकात्मजा सुंदर । सकळ सौदर्याचें माहेर । जनकरायासी सुख अपार । म्हणे इंदिरा साचार आली हे ॥४३॥ एकवीस वेळां निःक्षत्री । परशुरामें केली धरित्री । सहस्त्रार्जुन वधोनि क्षणमात्रीं । सूड घेतला रेणुकेचा ॥४४॥ त्र्यंबकधनुष्य[१] घेऊन हातीं । आला जनकाचे गृहाप्रती । षोडशोपचारें जनक नृपती । भार्गवरामासी[२] पूजीत ॥४५॥ भोजनासी बैसले गृहांतरीं । शिवधनुष्य ठेवूनि बाहेरी । तों जानकीनें ते अवसरीं । घोडें केले धनुष्याचें ॥४६॥ परशुराम भोजन करूनी । सभेंत बैसला येवोनी । तो कोदंड न दिसे नयनीं । भार्गव मनीं क्षोभला ॥४७॥ म्हणे गजभारीं[३] न लोटे धनुष्य । त्याचा कोणीं केला अभिलाष । परशुराम आणि मिथिलेश । द्वाराबाहेर जों आले ॥४८॥ तों कोदंडाचें घोडें करूनी । झ्यां झ्यां म्हणोनि ओढी मेदिनी । परशुरामें तें देखोनी । अंगुळी वदनीं घातली ॥४९॥ पिता देखोनि जनकबाळी । कोदंड सांडोनियां पळाली । धनुष्य पडलें ते स्थळीं । तें न ढळेचि कवणातें ॥२५०॥ वीर लाविले प्रचंड । परी नुचलेचि कोदंड । भार्गव म्हणे हें वितंड[४] । सीतेवेगळे उचलेना ॥५१॥ मग जनक म्हणे कुमारी । मागुती चापाचें घोडें करीं । सीतेनें बैसोनि झडकरी । पूर्वस्थळासी आणिलें ॥५२॥ मग बोले फरशधर[५] । आमचें अवतारकृत्य जाहलें समग्र । मग तेथें धनुष्य ठेवून साचार । जनकाप्रति बोलतसे ॥५३॥ आतां राया हाचि पण । जो या धनुष्या वाहील गुण । त्यासी सीतेसीं पाणिग्रहण[६] । हें तू जाण मिथिलेशा ॥५४॥ ऐसें सांगोन जनकासी । भार्गव[५] गेला बदरिकाश्रमासी । विश्वामित्र सांगे श्रीरामासी । पूर्वकथा ऐसी हे ॥५५॥ कौशिक[७] म्हणे श्रीरामा ऐकें । तुझें चरित्र तुज ठाउकें । परी बोलविसी आमुच्या मुखें । जाणोनियां सर्वही ॥५६॥ श्रीरामविजय ग्रंथ सुंदर । पुढें अष्टमाध्यायीं सीतास्वयंवर । रामाची विजयश्री साचार । त्याविण आणिका न वरीच ॥५७॥ ब्रह्मानंदा रघुवीरा । कमलोद्भवजनका श्रीधरवरा । पुराणपुरुषा परात्परा । अक्षय कीर्तन[८] दे तुझें ॥५८॥ स्वस्ति श्रीरामविजय ग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत श्रोते चतुर । सप्तमाध्याय गोड हा ॥२५९॥ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ ओव्या २५९ ॥

**॥ अध्याय सातवा समाप्त॥**

१. शिवधनुष्य २. परशुरामाला ३. हत्तींच्या समुदायाला ४. प्रचंड ५. श्री परशुराम ६. विवाह ७. विश्वामित्र ऋषी ८. भक्ती

## ॥ अध्याय आठवा ॥

# राम - सीता - विवाह

॥ श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः । धन्य धन्य तुम्ही संतसज्जन । राममहिमार्णवींचे[१] मीन । त्यांतील अनुभवमुक्तें[२] पूर्ण । दृश्यमान सर्व तुम्ही ॥१॥ राजभांडारींचीं रत्नें बहुत । तीं भांडारियासी ठाउकीं समस्त । कीं मित्रप्रभेचा[३] अंत अद्भुत । अरुण एक जाणे पैं ॥२॥ कीं पृथ्वीचे किती वजन । हें भोगींद्र जाणे संपूर्ण । कीं आकाशाचे थोरपण । एक प्रभंजन जाणतसे ॥३॥ कवीची पद्यरचना किती । हें एक जाणे सरस्वती । चंद्रामृत[४] वानिजे बहुतीं । परी महिमा जाणती चकोर ॥४॥ कीं प्रेमळ कळा गोड बहुत । हें एक जाणती भोळे भक्त । कीं श्रीरामकथेचा प्रांत[५] । वाल्मीक मुनि जाणतसे ॥५॥ रामनामाचा महिमा अद्भुत । एक जाणे कैलासनाथ । कीं चरणरजाचा प्रताप बहुत । विरिंचितनया[६] जाणे पैं ॥६॥ म्हणोन कथा हे गोड बहुत । येथींचा सुरस सेविती संत । असो सप्तमाध्यायीं गतकथार्थ । राम मिथिलेसमीप राहिला ॥७॥ देशोदेशींचे जे कां नृप । त्यांसी मूळ धाडी मिथिलाधिप । पृतनेसहित[७] अमूप । राजे लवलाहीं पातले ॥८॥ मूळ धाडिलें दशरथा । परी तो न येचि सर्वथा । कौशिक घेऊन गेला रघुनाथा । वियोगव्यथा थोर त्यासी ॥९॥ माझे कुमार दोघे जण । कौशिक गेला असे घेऊन । माझिया श्रीरामाचें वदन । कैं मी देखेन पूढती ॥१०॥ या वियोगानळेंकरून[८] । श्रावणारि[९] आहाळे रात्रंदिन । मिथिलेसी न यावया पूर्ण । हेंचि कारण जाणिजे ॥११॥ इकडे ऋषींसहित कौशिक । आला ऐकोन राव जनक । नगराबाहेर तात्काळिक । सामोरा आला समारंभें ॥१२॥ मूर्तिमंत सूर्यनारायण । ऐसा एक एक दिव्य ब्राह्मण । देखतां जनकें लोटांगण । समस्तांसी घातलें ॥१३॥ जनक म्हणे भाग्य अद्भुत । जैं घरा आले साधुसंत । आजि मी जाहालों पुनीत । पूर्वपुण्य फळासी आलें ॥१४॥ नृप सादर पाहे विलोकून । म्हणे श्यामसुंदर दोघे जण । कौशिका हे कोणाचे कोण । सुकुमार सगुण[१०] आणिले ॥१५॥ कीं शशी आणि चंडकिरण । कीं वाचस्पति आणि सहस्र-नयन । कीं रमापति उमापति दोघे जण । सुवेष धरोनि पातले ॥१६॥ वाटे यांचिया स्वरूपावरून । कोट्यानुकोटी मीनकेतन[११] । टाकावे कुरवंडी करून । पाहतां मन उन्मन होय ॥१७॥ जनकासी म्हणे विश्वामित्र । हे राया दशरथाचे पुत्र । यांचें वर्णावया चरित्र । सहस्रवक्त्रा शक्ति नोहे ॥१८॥ येणें मार्गीं ताटिका वधून । सिद्धीस पावविला माझा यज्ञ । वीस कोटी पिशिताशन । सुबाहुसहित मारिले ॥१९॥ मार्गीं चरणरजेंकरूनी । उद्धरिली सरसिजोद्भवनंदिनी[१२] । हरकोदंड[१३] पहावें नयनीं । म्हणोनि येथे पातले ॥२०॥ साक्षात् शेषनारायण । राया तुवां न करितां प्रयत्न । घरा आले मूळेंविण । सभाग्य पूर्ण तूं एक ॥२१॥ अवचित जैसा निधि भेटला । चिंतामणि येऊन पुढें पडला । कीं कल्पद्रुम[१४] स्वयें आला । गृह शोधित दुर्बळाचें ॥२२॥ कीं निद्रिताचे मुखांत । अकस्मात पडलें अमृत । कीं क्षुधितापुढें धांवत । क्षीरसिंधु पातला ॥२३॥

---

१. रामाचा महिमा हाच समुद्र, त्यातील मत्स्यरूपी संत २. अनुभवरूपी मोती ३. सूर्याच्या तेजाचा ४. चांदणेरूपी अमृत ५. विस्तार ६. अहल्या ७. सैन्यासह ८. वियोगरूपी अग्नीने ९. दशरथ १०. सद्गुणी ११. मदन १२. ब्रह्मकन्या अहिल्या १३. शिवधनुष्य १४. कल्पतरू

कीं शास्त्राभ्यासावांचून । भाग्यें जाहले अपरोक्षज्ञान[1] । कीं मृत्तिका खणितां निधान । अकस्मात लागलें ॥२४॥ जे भाग्योदयें होय नृपती । तरी घरींच्या दासी सिद्धि होती । कल्पिलें फळ तत्काळ देती । आंगणींचे वृक्ष जे कां ॥२५॥ हातीं कांचमणि धरितां । तो चिंतामणि होय तत्त्वतां । तृणगृहें[2] क्षण न लागतां । सुवर्णमंदिरें पैं होती ॥२६॥ खडाणा[3] गाई दुभती । वैरी तेचि मित्र होती । विशेष प्रकाशे निजमती । राजे पूजिती येऊनि घरा ॥२७॥ समयोचित होय स्फूर्ती । दिगंतरा जाय कीर्ति । पदोपदीं निश्चितीं । यश जोडे तयातें ॥२८॥ असो जनकासी म्हणे विश्वामित्र। तुझा आजि उदय पावला भाग्यमित्र। घरासी आला स्मरारिमित्र। सकळ अमित्रां[4] त्रासक जो॥२९॥ जनकें करूनि बहुत आदर। विश्वामित्र श्रीराम सौमित्र । निजसभेसी आणोनि सत्वर । मान देऊन बैसविले ॥३०॥ देशोदेशींचे नृपती । राम पाहोनि आश्चर्य करिती । सीता द्यावी हो याप्रती । नोवरा रघुपति साजिरा ॥३१॥ एक म्हणती स्वयंवरीं केला पण । भार्गवचापासी[5] चढवावा गुण । हें कार्य परम कठिण । रामास केवीं आकळे ॥३२॥ मनांत म्हणे जनक नृपवर । जरी जांवयी होईल रघुवीर । तरी माझ्या भाग्यास नाहीं पार । परी पण दुर्धर पुढें असे ॥३३॥ तंव तया मंडपांगणीं । परम चपळ तरुण वारणी[6] । वरी दिव्य चंवरडोल[7] जडितरत्नीं । झळकतसे अत्यंत ॥३४॥ त्यामाजी बैसली जनकबाळा । हातीं घेऊनियां दिव्य माळा । विलोकीत सकळ भूपाळां । ऋषिवृंदासहित पैं ॥३५॥ जवळी सख्या सकळ असती । श्वेत चामरें वरी ढाळिती । एक क्षणाक्षणां श्रृंगार सांवरिती । विडे देती एक तेथें ॥३६॥ जे त्रिभुवनपतीची मुख्य राणी । आदिमाया प्रणवरूपिणी । जे इच्छामात्रेंकरूनी । ब्रह्मांड हें घडीमोडी ॥३७॥ ब्रह्मादिक बाळें आज्ञेंत । आपुले निजगर्भी पाळित । तिचें स्वरूपलावण्य अद्भुत । कवणालागीं न वर्णवे ॥३८॥ अनंत शक्ति कर जोडून । जिच्यापुढें ठाकती येऊन । जिनें आदिपुरुषासि जागें करून । सगुणत्वासी आणिला ॥३९॥ या ब्रह्मांडमंडपामाझारीं[8] । जनकात्मजेऐसी सुंदरी । उपमा द्यावया दुसरी । कोणे अवतारीं नसेचि ॥४०॥ जैसें जांबूनदसुवर्ण[9] तप्त । तैसें सर्वांग दिव्य विराजित । आकर्ण नेत्र विकसित । मुखमृगांक[10] न वर्णवेचि ॥४१॥ मुखीं झळकती दंतपंक्ती । बोलतां जिकडे पडे दीप्ती । पाषाण ते पद्मराग[11] होती । वाटे रत्नें विखुरती बोलतां ॥४२॥ जानकीचे अंगींचा सुवास । भेदोन जाय महदाकाश । जिनें भुलविला आदिपुरुष । आपुल्या स्वरूपें करूनिया ॥४३॥ पाय ठेवितां धरणीं । पदमुद्रा[12] उमटती जे स्थानीं । तेथें वसंत आपण येऊनी । लोळत भुलोनि सुवासा ॥४४॥ चंद्रसूर्यांच्या गाळिल्या ज्योती । तैसीं कर्णपुष्पें[13] अत्यंत झळकती । कर्णीं मुक्तघोंस[14] ढाळ देती । कृत्तिकापुंज जैसे कां ॥४५॥ आकर्णपर्यंत विशाळ नयन । माजी विलसे सोगियाचें अंजन । कपाळीं मृगमद[15] रेखिला पूर्ण । वरी बिजवरा झळकतसे ॥४६॥ शीत दाहकत्व सांडोनी । शशांक आणि वासरमणी । सदा विलसती दोन्ही । मुक्तजाळी गगनीं भगणे जैसीं ॥४७॥ विद्युत्प्राय दिव्यांबर । मुक्तलग चोळी शोभे विचित्र । वरी एकावळी मुक्ताहार । पदकीं अपार तेज फांके ॥४८॥ दशांगुळीं मुद्रिका यंत्राकार । वज्रचुडेमंडित[16] कर । कंठी पदक वरी हिरे थोर । जैसे दिनकर जडियेले ॥४९॥ वांकी नूपुरें दिव्य चरणीं । रुणझुणती चालतां धरणी । जिचिया स्वरूपावरूनी । कोटि अनंग[17] ओंवाळिजे ॥५०॥

---

१. आत्मानुभूती २. गवताची घरे ३. भाकड ४. शत्रूंना ५. परशुरामाच्या धनुष्याला ६. हत्तीण ७. अंबारी ८. त्रैलोक्यात ९. तप्त सुवर्ण १०. मुखरूपी चन्द्र ११. रत्न १२. पायाच्या खुणा १३. कर्णफुले १४. मोत्यांच्या लडी १५. कस्तुरी १६. अभंग बांगड्यांनी सुशोभित १७. मदन

असो ऐसी ते चित्कळा । सकळ सभा विलोकी डोळां । तों ऋषिपंक्तीमाजी घनसांवळा[१] । परब्रह्मपुतळा[२] देखिला ॥५१॥ विजयानामें सखीप्रती । सीता म्हणे पाहे ऋषिपंक्ती । त्यांमाजी विलसे जी मूर्ती । माजी प्रीती जडली तेथें ॥५२॥ घनश्याम सुंदर रूपडें । देखतां कामाची मुरकुंडी[३] पडे[३] । सखे मज वर जरी ऐसा जोडे । तरीच धन्य मी संसारीं ॥५३॥ बहुत जन्मपर्यंत । तप केलें असेल जरी अत्यंत । तरीच हा मज होईल कांत । विजये निश्चित जाण पां ॥५४॥ नवस करूं कवणाप्रती । कोणती पावेल मज शक्ती । रघुवीर जरी जोडेल पती । तरी त्रिजगतीं धन्य मी ॥५५॥ राजीवनेत्र घनसांवळा । स्वरूपठसा[४] सर्वांत आगळा । आपुले हातीं यासी घालीन माळा । मग तो सोहळा न वर्णवे ॥५६॥ तों विश्वामित्र म्हणे जनकाप्रती । आतां कोदंड आणावें शीघ्रगती । मिळाले येथें सर्व नृपती । जे कां पुरुषार्थी थोर थोर ॥५७॥ अष्टचक्रशकट[५] प्रचंड । त्यावरी ठेविलें प्रचंडकोदंड[६] । सहस्र वीरांचे दोर्दंड[७] । ओढितां भागले न ढळेचि ॥५८॥ मग गजभार लाविले । रंगमंडपीं ओढून आणिलें । देखतां सर्व राजे दचकले । म्हणती हें नुचले कोणासी ॥५९॥ एक म्हणती हें शिवचाप । उचलील ऐसा न दिसे भूप । एकांस सुटला चळकंप । गेला बळदर्प[८] गळोनियां ॥६०॥ एक महावीर बोलत । आम्ही कौतुक पाहावया आलों येथ । एक म्हणती जनकाचा स्नेह बहुत । म्हणोनि भेटीस पातलों ॥६१॥ जनक सांगे सकळांतें । हे विरूपाक्षचाप[९] घेऊन स्वहस्तें । शिक्षा लाविली दक्षातें । सहस्राक्षातें[१०] नुचले हें ॥६२॥ ऐसिया चापासी उचलोन । जो राजेंद्र लावील गुण । त्यासी हे जानकी सद्गुणनिधान । माळ घालील स्वहस्तें ॥६३॥ तटस्थ पाहती सकळ वीर । कोणी न देती प्रत्युत्तर । कोणी सांवरोनियां धीर । चाप उचलूं भाविती ॥६४॥ तों मूळ न पाठवितां रावण । प्रधानासहित आला धांवोन । सभा गजबजली संपूर्ण । म्हणती विघ्न आलें हें ॥६५॥ आतां गति येथें नव्हे बरी । बळेंचि उचलोन नेईल नोवरी । कोणी म्हणती क्षणाभीतरीं । चंडीशचाप[११] चढवील हा ॥६६॥ जनकासी म्हणे रावण । तुवां धनुष्याचा केला पण । तरी क्षणमात्रें तें मोडून । कुटके करीन येथेंचि ॥६७॥ म्या हालविला कैलास । बंदीं घातले त्रिदश । ऐरावतीसमवेत देवेश । समरभूमीस उलथिला ॥६८॥ तो मी रावण प्रतापशूर । चाप लावाया काय उशीर । उपटोनियां मेरुमांदार । कंदुकाऐसे उडवीन ॥६९॥ पृथ्वी उचलोनि अकस्मात । घालूं शकें मी समुद्रांत । कीं घटोद्भवासारिखा[१२] सरितानाथ[१३] । क्षणमात्रें शोषीन मी ॥७०॥ तरी आतां हेचि प्रतिज्ञा पाहीं । हे चाप मोडूनि लवलाहीं । होईन जनकाचा जांवई । सकळ रायांदेखतां ॥७१॥ वसनें भूषणें सांवरून । चापाकडे चालिला रावण । गजबजलें जानकीचें मन । अति उद्विग्न जाहली ॥७२॥ म्हणे अपर्णापते[१४] त्रिनयना[१४] । त्रिपुरांतका[१४] मदनदहना[१४] । तुझें चाप नुचले रावणा । गजास्यजनका[१४] ऐसें करीं ॥७३॥ या दुर्जनाचें तोंड काळें । सदाशिवा करीं शीघ्र वहिलें । महादैवतें प्रचंड सबळें । या धनुष्यावरी बैसवीं ॥७४॥ अहो अंबे मूळपीठनिवासिनी । मंगळकारके आदिजननी । या रावणाच्या शक्ती हिरोनी । नेई मृडानी[१५] सत्वर ॥७५॥ ऐसें जानकीनें प्रार्थिलें । तों दैवतें धांविन्नली सकळें । गुप्तरूपें शीघ्रकाळें । येऊन बैसलीं चापावरी ॥७६॥ नवकोटी कात्यायनी । चौसष्ट कोटी योगिनी । यांसहित कालिका येउनी । धनुष्यावरी बैसत ॥७७॥ धनुष्य उचलूं गेला दशवक्त्र । तंव तें न ढळेचि अणुमात्र । बळे लाविले वीसही कर । जाहलें शरीर निस्तेज पैं ॥७८॥

१. राम २. राम ३. लाजतो ४. सौंदर्याचा प्रभाव ५. आठ चाकांचा गाडा ६. मोठे धनुष्य ७. दण्ड ८. बळाचा अभिमान ९. शिवचाप १०. इंद्राला ११. शंकराचे धनुष्य १२. अगस्तीसारखा १३. समुद्र १४. श्रीशंकरा १५. पार्वती

द्विजपंक्तीनें[१] अधरप्रांत[२] । शक्रारिजनक[३] बळें रगडित । चाप उभें करितां त्वरित । जाहलें विपरीत तेधवां ॥७९॥ जैसा महाद्रुम[४] उन्मळे । तैसें शिवचाप उलथलें । रावण उताणा पडे ते वेळे । हलकल्लोळ मांडला ॥८०॥ जैसा पूर्वीं गयासुर दैत्य । त्यावरी ठेविला पर्वत । तैसाचि पडला लंकानाथ । धनुष्य अद्‌भुत उरावरी ॥८१॥ रावण पडतां भूतळीं । सभेवरी उसळली धुळी । दाहीं मुखीं मृत्तिका पडली । आनंदली जानकी ॥८२॥ दाहीं मुखीं रुधिर वाहत । कासावीस जाहला बहुत । म्हणे धांवा धांवा समस्त । धनुष्य त्वरित काढा हें ॥८३॥ रावण म्हणे जनकाप्रती । माझे प्राण चालिले निश्चितीं । परी इंद्रजित कुंभकर्ण असती । तुज निर्दाळिती सहमूळीं[५] ॥८४॥ गजबजली सभा समस्त । म्हणती कोण आहे बळिवंत । हें चाप उचलील अद्‌भुत । महा अनर्थ ओढवला ॥८५॥ घाबरा जाहला मिथिलेश्वर । म्हणे पृथ्वी जाहली निर्वीर । क्षत्रियां भार्गवें आटिले समग्र । त्रिसप्तवेळां[६] हिंडोनि ॥८६॥ या सभेमाजी बळिवंत । कोणी क्षत्रिय नाहीं रणपंडित । कौशिकें ऐसी ऐकतां मात । खुणाविलें श्रीरामचंद्रा ॥८७॥ जैसा निद्रिस्त सिंह जागा केला । कीं याज्ञिकें जातवेद[७] फुंकिला । तैसा विश्वामित्रें ते वेळां । खुणाविला रघुवीर ॥८८॥ म्हणे नरवीरपंचानना[८] । त्रिभुवनवंद्या राजीवनयना । पुराणपुरुषा रघुनंदना । अरिमर्दना ऊठ वेगीं ॥८९॥ कमलोद्भवजनका उदारा । ताटिकांतका अहल्योद्धारा । मखपाळका समरधीरा । असुरसंहारका[९] ऊठ वेगीं ॥९०॥ जैसी निशा संपतां तत्काळ । उदयाद्रीवरी ये रविमंडळ । तैसा राम तमाळनीळ । उठोनि उभा ठाकला ॥९१॥ कीं महायागीं होतां पूर्णाहुती । तत्काळ प्रगटे आराध्यमूर्ती । तैसा उभा ठाकला रघुपती । राजे पाहती टकमकां ॥९२॥ कीं प्रल्हादाकारणें झडकरी । स्तंभांतूनि प्रगटे नरहरी । कीं वेदांतज्ञान होतां अंतरीं । निजबोध जेवीं प्रगटे पैं ॥९३॥ वंदोनियां गुरुचरणां । सर्वेंचि नमिलें सर्व ब्राह्मणां । पूर्णब्रह्मानंद रामराणा । वेदपुराणां वंद्य जो ॥९४॥ श्रीराम विरक्त ब्रह्मचारी । हे रमा आपणाविण कोणा न वरी । यालागीं शरयूतीरविहारी । उठता जाहला तेधवां ॥९५॥ सभेस बैसले नृपवर । केले नानापरींचे शृंगार । परी सर्वांत श्रेष्ठ श्रीरामचंद्र । रोहिणीवर भगणांत जैसा ॥९६॥ कीं शास्त्रांमाजी वेदांत । कीं निर्जरांमाजी शचीनाथ । तैसा श्रीराम समर्थ । सभेंत मुख्य विराजे ॥९७॥ उठिला देखोनि श्रीरामचंद्र । उचंबळला सीतेचा सुखसमुद्र । नवमेघरंग[१०] रघुवीर । रंगमंडपाप्रति आला ॥९८॥ कोटि अनंग ओंवाळून । टाकावे ज्याच्या नखावरून । जो अरिचक्रवारणपंचानन[११] । जात लक्षून धनुष्यातें ॥९९॥ देखतां राम सुकुमार । घाबरलें सीतेचें अंतर । म्हणे कोमळगात्र रघुवीर । प्रचंड थोर धनुष्य हें ॥१००॥ कूर्मपृष्ठी[१२] जैसी कठोर । तैसें हें कोदंड प्रचंड थोर । दशरथकुमर सुकुमार । कैसें उचलेल तयातें ॥१॥ मदनदहनाचें धनुष्य थोर । रघुनाथमूर्ति मदनमनोहर । अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥२॥ घनश्याम कोमळगात्र । राम सुकुमार राजीवनेत्र । अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥३॥ बळहत[१३] केला दशकंधर । परम कोमळ रघुपतीचे कर । अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥४॥ मज वाटे खुपती चंद्रकर[१४] । ऐसी रामतनु सुकुमार । अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥५॥ मज न गमेचि दुसरा वर[१५] । तुज सत्य करणें पण साचार । अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥६॥

---

१. दातांनी २. ओठ ३. रावण ४. मोठे झाड ५. मुळासकट ६. एकवीस वेळा ७. अग्नी ८. मनुष्यांमध्ये सिंहासारखा वीर ९. राक्षसांतका १०. घनसावळा ११. शत्रूरूपी हत्तींना सिंहासारखा घातक १२. कासवाची पाठ १३. शक्तिहीन १४. चंद्राचे किरण १५. पती

चंडीशकोदंड प्रचंड थोर । लघुआकृति[१] राम निर्विकार । अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥७॥ श्रीरामावांचून इतर । पुरुष तुजसमान साचार । अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥८॥ दुजा वरावया येतां वर । देह त्यागीन हा निर्धार । अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥९॥ सीता विजयेसी म्हणे अवधारीं । बाप नव्हे हा वाटतो वैरी । हा पण त्यजोनि निर्धारीं । रामासी मज अर्पी ना ॥११०॥ ऐसें सीतेचें अंतर । जाणोनियां जगदुद्धार । दंड पिटोनि प्रचंड वीर । कोदंडासमीप पातला ॥११॥ दशरथमहाराज दिग्गज । त्याचा छावा हा रघुराज । धनुष्यइक्षु देखोनि सहज । परम चपळ धांविन्नला ॥१२॥ श्रीरामसव्यबाहु प्रचंड । हाचि वरी केला शुंडादंड । भवधनुष्यइक्षु[२] द्विखंड । करील आतां निर्धारें ॥१३॥ दशकंधर हें पद्मकानन । वीस हस्त द्विपंचवदन । तीस कमळें हींच पूर्ण । कोदंड जाण इक्षु तेथें ॥१४॥ पद्मवनीं गज निघे लवलाहीं । मग त्यासी कमळांची गणना काई । तैसीं दशमुखाचीं हस्तकमळें पाहीं । तुडवीत आला रघुवीर ॥१५॥ तटस्थ पाहती सकळ जन । म्हणती विजयी हो कां रघुनंदन । सीता नवरी हे सगुण । यासीच घालो निजमाळा ॥१६॥ आनंदमय सकळ ब्राह्मण । चिंतिती रामासी जयकल्याण । म्हणती हें भवचाप मोडून । टाको रघुवीर सत्वर ॥१७॥ एक म्हणती राम सुकुमार । नीलपंकजतनु[३] वय किशोर । भवकोदंड प्रचंड थोर । उचलेल कैसें रामातें ॥१८॥ एक म्हणती चिमणें रामाचें ठाण । एक म्हणती सिंह दिसतो लहान । परी पर्वताकार गज विदारून । न लागतां क्षण टाकितो ॥१९॥ घटोद्भव लहान दिसत । परी क्षणें प्राशिला सरितानाथ । गगनीं सविता[४] लघु भासत । परी प्रभा अद्भुत न वर्णवे ॥१२०॥ असो ते वेळे रघुवीर । विद्युत्प्राय उत्तरीय चीर । तें सरसावोनि सत्वर । कटिप्रदेशीं वेष्टिलें ॥२१॥ माथा जडित मुकुट झळकत । आकर्णनेत्र आरक्त रेखांकित । मस्तकींचे केश नाभीपर्यंत । दोहींकडोनि उतरले ॥२२॥ किशोर सुकुमारभूषण । अलकसुवासें[५] भरलें गगन । त्या सुवासासी वेधून । मिलिंदचक्र[६] भ्रमतसे ॥२३॥ श्रीरामतनूचा सुवास पूर्ण । जात सप्तावरण भेदून । असो तें शिवधनुष्य रघुनंदन । करेंकरोनि स्पर्शीत ॥२४॥ नीलवर्ण कुंतल ते अवसरीं । पडले दशकंठाचे हृदयावरी । विषकंठवंद्य[७] ते अवसरीं । सांवरोनि मागें टाकित ॥२५॥ शिवधनुष्यासी घंटा सतेज । वरी विद्युत्प्राय झळके ध्वज । त्यासमवेत रघुराज । उचलिता जाहला ते काळीं ॥२६॥ गज शुंडेनें आक्रमी इक्षुदंड । तैसें रामें आकर्षिलें कोदंड । पराक्रम परम प्रचंड । दशमुंड[८] विलोकीतसे ॥२७॥ परम म्लान द्विपंचवदन । दृष्टी देखोनि गाधिनंदन । म्हणे नरवीरश्रेष्ठा वेगेंकरून । संशय हरणें सर्वांचा ॥२८॥ जनक म्हणे कौशिकमुनी । ज्या चापें दशकंठ घोळिला धरणीं । तें धनुष्य रामाचेनी । कैसें उचलेल नेणवे ॥२९॥ जनकासी म्हणे ऋषि कौशिक । श्रीराम हा वैकुंठनायक । अद्भुत करील कौतुक । पाहें नावेक उगाचि ॥१३०॥ इकडे रामें धनुष्य उचलून । क्षण न लागतां वाहिला गुण[९] । ओढी ओढिली आकर्ण । सुहास्यवदनें तेधवां ॥३१॥ श्रीरामाचें बळ प्रचंड । ओढीस न पुरेचि भवकोदंड । तडाडिलें तेणें ब्रह्मांड । चाप करकरलें तेधवां ॥३२॥ मुष्टीमाजी तडाडत । जैशा सहस्र चपळा कडकडत । विधि आणि वृत्रारि[१०] हडबडत । वाटे कल्पांत जाहला ॥३३॥

---

१. लहान शरीराचा २. शिव-धनुष्य हाच ऊस ३. नीलकमलाप्रमाणे शरीर असलेला ४. सूर्य ५. केसांच्या सुगंधाने ६. भ्रमरांचा समुदाय ७. शंकराला वंद्य ८. रावण ९. दोरी १०. शंकर

उर्वीमंडळ[१] डळमळत । भोगींद्र मान सरसावित । दंतबळें उचलोनि देत । आदिवराह पाताळीं ॥३४॥ सभा सकळ मूर्च्छित जाहली । महावीरांची शस्त्रें गळालीं । राजे भाविती उर्वी चालिली । रसातळा आजि कीं॥३५॥ रामें चाप केलें द्विखंड। प्रतापें भरलें ब्रह्मांड। पुष्पसंभार उदंड। वृंदारक[२] वर्षती॥३६॥ सभा अवघी जाहली मूर्च्छित । परी एक चौघें सावध पाहत । जनक आणि गाधिसुत । सीता सौमित्र चौघें हीं ॥३७॥ असो भवकोदंड मोडोनी । द्विखंडें रामें टाकिलीं धरणीं । रावण उठोन ते क्षणीं । अधोवदनें चालिला ॥३८॥ सभेस मारावया आणिती तस्कर । तैसा म्लान दिसे दशवक्त्र । कीं रणीं अपयश आलिया महावीर । त्याचा मुखचंद्र उतरे जेवीं ॥३९॥ कीं दिव्य देतां खोटा होत । मग तो मुख न दाखवी लोकांत । तैसा प्रधानेंसीं लंकानाथ । गेला त्वरित स्वस्थाना ॥१४०॥ पुण्य सरतां स्वर्गींहूनि खचला । कीं याज्ञिकें अंत्यज बाहेर घातला । कीं द्विजयाती भ्रष्ट जाहला । तो जेवीं दवडिला पंडितीं ॥४१॥ याचि प्रकारें सभेंतूनी । रावण गेला उठोनी । जैसा केसरीच्या कवेंतूनी । जंबूक सुटला पूर्वभाग्यें ॥४२॥ असो इकडे विजयी रघुनंदन । जैसा निरभ्र नभीं चंडकिरण । सुकुमार नवघनतनु[३] सगुण । भक्तजन पाहती ॥४३॥सर्वांचे नयनीं अश्रुपात । ऋषिचक्र[४] सद्गदित । हा कोमलगात्र रघुनाथ । कठिण चाप केवीं भंगिलें ॥४४॥ श्रीराम सुकुमार गुणराशी । विश्वामित्रें धांवोनि वेगेंसीं । रघुवीर आलिंगिला मानसीं । प्रेमपूर न आवरे ॥४५॥ म्हणे आदिपुरुषा पूर्णब्रह्मा । स्मरारिमित्रा आत्मयारामा । भक्तकामकल्पद्रुमा । अद्‌भुत लीला दाविली ॥४६॥ तुझ्या करणीवरूनि[५] लावण्यखाणी । ओंवाळावी वाटे समग्र धरणी । आणि या जिवाची कुरवंडी करोनी । तुजवरोनि सांडावी ॥४७॥ इतुक्यांत करिणीवरोन[६] लावण्यखाणी । खालीं उतरोनि तेच क्षणीं । माळ घेऊन जनकनंदिनी । हंसगमनी चमकत ॥४८॥ मेदिनी म्हणे मी धन्य । माझी कन्या वरील रघुनंदन । श्रीराम जामात सगुण । मनमोहन जगद्वंद्य ॥४९॥ श्रीराम जगाचा जनिता । जानकी सहजचि जगन्माता । तारावयासी निजभक्तां । आलीं उभयतां रूपासी ॥१५०॥ श्रीराम सच्चिदानंदघनतनु[७] । जो पुराणपुरुष पुरातनु । जो पूर्णावतारी पूर्णब्रह्मघनु । सकळ तनूंचा साक्षी पैं ॥५१॥ आदि मध्य जो अंतीं । परी हाचि एक सीतेचा पती । तुच्छ करून सकळ नृपती । वरी रघुपति प्रियकर ॥५२॥ हंसगति जानकी चालत । पदभूषणें मधुर गर्जत । रामगळां माळ घालूनि त्वरित । मस्तक चरणीं ठेविले ॥५३॥ गळां घालितांचि माळ । जाहला स्वानंदाचा सुकाळ । वाद्यें वाजों लागली तुंबळ । नादें निराळ[८] दुमदुमलें ॥५४॥ संतोषला मिथिलेश्वर । म्हणे माझे भाग्यास नाहीं पार । जांवई जाहला रघुवीर । भुवनसुंदर[९] मेघश्याम ॥५५॥ जनके आणि विश्वामित्रें । लिहिलीं अयोध्येसी दिव्य पत्रें । तीं घेऊनि दूत त्वरें । अयोध्येसी पातले ॥५६॥ कुंकुममंडित पत्रें । लिहिलीं होतीं विश्वामित्रें । तीं उचलोनि अजराजपुत्रें[१०] । वसिष्ठकरीं दीधलीं ॥५७॥ दोहींतील एकचि अभिप्राय । गूढ परम लिहिलें चातुर्य । त्याचा अर्थ करोनि ऋषिवर्य । ब्रह्मकुमर[११] सांगतसे ॥५८॥ हिमनगजामातसायकासन[१२] । भंगूनि विजयी झाला बाण । तेव्हां थरथरिला पूर्ण । आनंदघन रथस्वामी ॥५९॥ गुणें केली बहुत स्तुती । आनंदें यश वर्णी सारथी । जोंवरी रथचक्रें असती । वोहोरें[१३] नांदोत तोंवरी ॥१६०॥ रथगर्भीं होतें जें निधान । तेणें बाणप्रताप देखोन । ऐक्य झालें चरणीं येऊन । तुम्हीं त्वरेकरून येइंजे ॥६१॥

---

१. पृथ्वी २. देवगण ३. नवीन मेघाप्रमाणे सावळा ४. ऋषींचा मेळा ५. महत्कृत्यावरून ६. हत्तिणीवरून ७. पूर्ण देहच ब्रह्मरूप ८. आकाश ९. सर्व जगात सुंदर १०. दशरथराजाने ११. वसिष्ठ ऋषी १२. शिवधनुष्य १३. दंपती

अर्थ सांगे वसिष्ठमुनी । साक्ष श्लोक असे महिम्नीं[१] । त्रिपुरवधीं[२] जेव्हां शूलपाणी[३] । बाण चक्रपाणी[४] जाहला ॥६२॥ पृथ्वीचा केला तेव्हां रथ । चंद्रमित्र[५] चाकें अद्‌भुत । कनकाद्रि धनुष्य होत । गुण तेथें फणींद्र[६] पैं ॥६३॥ सारथि झाला कमलासन[७] । जानकी रथगर्भींचें[८] रत्न । बाण तोचि हा रघुनंदन । शिवधनुष्य जेणें भंगिलें ॥६४॥ ऐसा अर्थ सांगे ब्रह्मसुत । आनंदला राजा दशरथ । दळभारें सिद्ध होत । घाव देत निशाणीं ॥६५॥ सोळा पद्में दळभार । चतुरंगदळ निघे सत्वर । सुमंतादि प्रधान राजकुमर । भरतशत्रुघ्न निघाले ॥६६॥ कौसल्या सुमित्रा कैकयी राणी । निघाल्या आरूढोनि सुखासनीं । दूत वेत्रकनकपाणी[९] । सहस्रावधि धांवती पुढें ॥६७॥ सप्तशतें दशरथाच्या युवती । त्याही रामलग्ना पाहों येती । सुखासनी बैसोनि जाती । अनुक्रमेंकरूनियां ॥६८॥ प्रजालोक निघाले समस्त । निजरथीं बैसे दशरथ । लक्षोनियां मिथिलापंथ । परम वेगें चालिले ॥६९॥ पृथ्वीपति राजा दशरथ । मस्तकीं आतपत्रें विराजत । मित्रपत्रें परम शोभत । दोन्ही भागीं समसमान ॥१७०॥ मृगांकवर्ण चामरें । एकावरी विराजती तुंगारपत्रें । एक उडविती लघु चीरें[१०] । दोहींकडे श्वेतवर्ण ॥७१॥ मकरबिरुदें[११] पुढें चालती । नभचुंबित ध्वज विराजती । वाद्यगजरेंकरूनि क्षिती[१२] । दुमदुमली तेधवां ॥७२॥ पुढें शमदमांचें पायभार[१३] । मागें सद्विवेकाचे तुरंग अपार । त्यापाठीं निजबोधाचे कुंजर । किंकाटती रामनामें ॥७३॥ निजानुभवाचे दिव्यरथ । त्यांवरी आरूढले वऱ्हाडी समस्त । वारू तेचि चाऱ्ही पुरुषार्थ । समानगती धांवती ॥७४॥ जागृती प्रथम पेणें सत्य । स्थूळ परग्राम अद्‌भुत । तेथें न राहे दशरथ । चित्तीं रघुनाथ भरला असे ॥७५॥ पुढें स्वप्नावस्था सूक्ष्मनगर । तेथें न राहे अजराजकुमर । म्हणे जवळी करावा श्रीरघुवीर । आड वस्ती करूं नका ॥७६॥ पुढें सुषुप्ति अवस्था कारणपुर । सदा ओस आणि अंधकार । रामउपासक वऱ्हाडी थोर । जाती सत्वर पुढेंचि ॥७७॥ मिथिलेबाहेर उपवन । तुर्या अवस्था दिव्यज्ञान । पुढें रघुनाथप्राप्तीचें चिन्ह । राहिले लक्षोन तेथेंचि ॥७८॥ पुढें विराजे विदेहनगर । ऐकों येत अनुहत वाद्यगजर । निजभारेंसीं विदेहनृपवर । आला सामोरा दशरथा ॥७९॥ असो दृष्टीं देखतां विदेहनृप । आनंदें उठिला अयोध्याधिप । क्षेम दिधलें सुखरूप । अनुक्रमें सकळिकांसी ॥१८०॥ भरत शत्रुघ्न देखोन । म्हणे आमुचे सदनींहून । राम सौमित्र आले रुसोन । जनक संदेहीं पडिलासे ॥८१॥ दशरथ म्हणे ते शत्रुघ्न भरत । आश्चर्य करी मिथिलानाथ । असो समस्त गजरेंसीं मिरवत । निजमंडपांत आणिले ॥८२॥ चापखंडें[१४] देखतां ते वेळे । वीरांसि रोमांच उभे ठाकले । एकाचे नेत्रीं अश्रु आले । कोंदंडखंडें देखतां ॥८३॥ तंव तो भक्तकामकल्पद्रुम[१५] । कौसल्येनें जवळी देखिला राम । धांवोनि आलिंगिला परम । हृदयीं प्रेम न समाये ॥८४॥ मांडीवरी घेऊनि रघुवीर । म्हणे रामा तूं कोमलांग सुकुमार । चंडीशकोदंड[१६] परम कठोर । कैसें चढवोनि मोडिलें ॥८५॥ दशरथें आलिंगिला राम । जो सच्चिदानंद मेघश्याम । भरत शत्रुघ्न परम सप्रेम । श्रीरामचरण वंदिती ॥८६॥ असो जनकें दिव्य मंदिरें । जानवशासी[१७] दीधली अपारें । दोहींकडे मंडप उभविले त्वरें । मंगळतूर्यें वाजती ॥८७॥ लक्ष्मण भरत शत्रुघ्न । परम प्रतापी राजनंदन । जनकरायें देखोन । दशरथासी विनविलें ॥८८॥

---

१. शिवमहिम्न स्तोत्रात २. त्रिपुरासुराच्या वधाच्या वेळी ३. श्रीशंकर ४. श्रीविष्णू ५. चंद्र व सूर्य ६. शेष ७. ब्रह्मा ८. पृथ्वीची कन्या ९. हाती छड्या घेतलेले भालदार, चोपदार १०. लहान वस्त्रे ११. मकराची चित्रे असलेले ध्वज (अबदागीर) १२. पृथ्वी १३. पायदळ १४. धनुष्याचे तुकडे १५. भक्तांच्या कामना पूर्ण करणारा १६. शिवधनुष्य १७. वऱ्हाडी मंडळींना

म्हणे जानकी दिधली रघुनंदना । ऊर्मिला देईन लक्ष्मणा । मांडवी आणि श्रुतकीर्ति बंधुकन्या । भरतशत्रुघ्नां देईन मी ॥८९॥ दशरथासी मानला विचार । देवकप्रतिष्ठा केली सत्वर । चौघीं कन्यांसी परिकर । हरिद्रा लाविली तेधवां ॥१९०॥ सीतेची शेषहरिद्रा । ते पाठविली रामचंद्रा । भरत शत्रुघ्न सौमित्रा । शेष आलें तैसेंचि ॥९१॥ असो यथाविधि जाहलें नाहाण[1] । नोवरे बैसले चौघे जण । तों जनक वऱ्हाडी वऱ्हाडिणी घेऊन । मूळ[2] आला वरांसी ॥९२॥ शांति[3] क्षमा दया उन्मनी । सद्‌बुद्धि सद्विद्या कामिनी । तितिक्षा[4] मुमुक्षा[5] विलासिनी । तुर्या[6] आणि उपरती ॥९३॥ सुलीनता समाधि सद्‌गती । रामसदनीं ह्या मिरवती । तों वऱ्हाडी पातले निश्चितीं । श्रीरामासी न्यावया आले ते ॥९४॥ बोध आनंद सद्‌विवेक । ज्ञान वैराग्य परमार्थ देख । निष्काम अक्रोध अनुताप चोख । रघुनायक विलोकिती ॥९५॥ जनकें पूजोनि चौघे वर । तुरंगीं बैसविले सत्वर । पुढें होत वाद्यांचा गजर । गगनीं सुरवर पाहती ॥९६॥ मिरवत आणिले चौघे जण । मणिमय चौरंग समसमान । मधुपर्कविधि वरपूजन । यथासांग करी नृपनाथ ॥९७॥ रघुपतीचें पद सुंदर । स्वयें प्रक्षाळी[7] मिथिलेश्वर । सुमेधा घाली वरी नीर । कनकझारी घेऊनियां ॥९८॥ वेदांचा निर्मिता रघुनाथ । त्यासी घालिती यज्ञोपवीत । रायें षोडशोपचारयुक्त । पूजा केली तेधवां ॥९९॥ घटिका प्रतिष्ठिली अंतरीं । देशिक सर्वांसी सावध करी । म्हणे वादविवादशब्दकुसरी[8] । टाकोन झडकरीं सावध व्हावें ॥२००॥ चौघी कन्या आणिल्या बाहेरी । गौरविल्या दिव्यवस्त्रालंकारीं । स्नुषा देखोनि ते अवसरीं । आश्चर्य करी दशरथ ॥१॥ अंतरपट मध्यें धरून । तो फेडावयासी विद्वज्जन । सुरस मंगळाष्टकें म्हणोन । सावधान म्हणताती ॥२॥ जनकाची जे पट्टराणी । सुमेधा नामें पुण्यखाणी । चौघे जामात देखोनी । आनंद मनीं न समाये ॥३॥ म्हणे श्रीरामाच्या मुखावरून । कोटी काम सांडावे ओंवाळून । जानकीचें भाग्य धन्य । ऐसें निधान जोडलें ॥४॥ असो मंगळाष्टकें म्हणती पंडित । लग्नघटिका संपूर्ण भरत । ॐपुण्याह आचार्य म्हणत । तों अंतरपट फिटलासे ॥५॥ मंगळाकार[9] चापपाणी[10] । त्याचे मस्तकीं मंगळभगिनी[11] । मंगळाक्षता घालोनी । मस्तक चरणीं ठेविलें ॥६॥ सीतेचे मस्तकीं रघुनाथ । लग्नाक्षता घाली त्वरित । तोंचि मस्तकीं ठेविला हस्त । अक्षय कल्याणदायक जो ॥७॥ सीतेनें वरितां रघुनंदन । ऊर्मिलेनें परिणिला लक्ष्मण । मांडवीनें भरत सगुण । श्रुतकीर्ति शत्रुघ्ना वरीतसे ॥८॥ तों मंगळतूर्यांचा घोष आगळा । परम जाहला ते वेळां । तेथींचा वर्णावया सोहळा । सहस्रवदना अशक्य ॥९॥ अक्षय भांडारें बहुत । जनक वरदक्षिणा देत । याचकजन समस्त । तृप्त केले निजधनें[12] ॥२१०॥ विवाहहोमालागीं निर्धारीं । वेगीं चला बहुल्यावरी । नोवऱ्या कडिये[13] झडकरीं । घेवोनियां चलावें ॥११॥ ऐकोनि हांसे रघुपती । म्हणे प्रपंचाची विपरीत गती । तो वसिष्ठ म्हणे रघुपती । कडे घेईं सीतेतें ॥१२॥ सीता उचलितां श्रीरामें । तैसेंच तिघे करिती अनुक्रमें । बहुल्यावरी आनंदप्रेमें । चौघे जण बैसले ॥१३॥ लाजाहोमादि सर्व विधि सिद्ध । करी अहल्यासुत शतानंद । जनकासी जाहला परम आनंद । तो आल्हाद न वर्णवे ॥१४॥ तों अंतर्गृहीं[14] रघुवीर । पूजावया चालिला गौरीहर । सीतेसी कडिये घेऊनि सत्वर । रामचंद्र चालिला ॥१५॥ गौरीहर पूजोनि त्वरें । आंबा शिंपिती चौघें वोहरें । निंबलोण निजकरें । सुमेधा उतरी तेधवां ॥१६॥

१. स्नान २. बोलावणे ३. मनोरहित स्थिती ४. सहनशक्ती ५. मोक्षाची इच्छा ६. सुषुप्तीपलीकडील अवस्था ७. धुतले ८. गुरू, कुलपुरोहित ९. सुंदर शुभलक्षणी १०. श्रीराम ११. श्रीसीता १२. स्वत:च्या धनाने १३. कडेवर १४. प्रासादाच्या आतील भागात

सुमेधेनें जाऊनि ते क्षणीं । प्रार्थोनि आणिल्या तिघी विहिणी[१] । दिव्य वस्त्रालंकारें गौरवूनी । मंडपांत बैसविल्या ॥१७॥ देखोनियां चौघी सुना । आनंद जाहला तिघींचिया मना । इकडे जनक विनवी रघुनंदना । विज्ञापना परिसावी ॥१८॥ चार दिवसपर्यंत । येथेंच क्रमावे माझा हेत । साडे जाहलिया त्वरित । मग अयोध्येसी जाइंजे ॥१९॥ पुढील जाणोनि वर्तमान । तें न मानीच रघुनंदन । म्हणे आम्ही आतां येथून । करूं गमन अयोध्येसी ॥२२०॥ कां त्वरा करितो रघुवीर । आतां युद्धासी येईल परशुधर[२] । तरी तो प्रचंड वीर अनिवार । मिथिलानगर जाळील पैं ॥२१॥ यालागीं स्वभारेंसीं[३] बाहेर । जावें इच्छी रघुवीर । पुढें संहारावया दशकंधर[४] । जाणें सत्वर लंकेसी ॥२२॥ धेंडा नाचवूं लंकेपुढें । राक्षसांचीं अपार मुंडें । ओंवाळणी पडतील कोडें[५] । करील साडे बिभीषण ॥२३॥ ऐसें श्रीरामाचें मनोगत । वसिष्ठें जाणोनि त्वरित । जनकासी सांगे गुह्यार्थ । वोहरें आतांचि बोळवीं ॥२४॥ मग जे अयोध्यावासी जन । समस्तांसीं दिधलें भोजन । चौघें वोहरें आणि अजनंदन । राण्या समस्त जेविल्या ॥२५॥ तत्काळ साडे करून । वस्त्रालंकार सर्वांस अर्पून । चौघांजणांसि आंदण । अपार दिधलें तेधवां ॥२६॥ अश्व गज दास दासी । तन मन धन अर्पिलें श्रीरामासी । जनक निघाला स्वभारेंसीं । दशरथासी बोळवित ॥२७॥ ऐसें देखोनि नारद ऋषी । वेगें धांविन्नला बद्रिकाश्रमासी । देखोनियां भृगुकुळटिळकासी[६] । म्हणे बैसलासी काय आतां ॥२८॥ तूं द्विजकुळीं[७] महाराज वीरेश । आणि त्या रामें तुझें भंगिलें धनुष्य । तुज थोर आलें अपयश । रामें यश वाढविलें ॥२९॥ मग बोले भृगुकुलदिवाकर[८] । आमुचें अवतारकृत्य जाहलें समग्र । मग म्हणे कमलोद्भव-पुत्र । तुज अणुमात्र क्रोध न ये ॥२३०॥ जमदग्नीनें क्रोध टाकिला । तो तत्काळचि मृत्यु पावला । तुजही तैसीच आली वेळा । दाशरथी तुजला न सोडी ॥३१॥ शिवें तुज दिधलें पिनाक[९] जाण । तेणें घेतले क्षत्रियांचे प्राण । ऐसें बोलतां ब्रह्मनंदन[१०]। जमदग्निसुत[११] क्षोभला ॥३२॥ किंवा मृगेंद्र निजेला । तो पदघातें हाणोन जागा केला । कीं नरसिंहचि प्रकटला । स्तंभाबाहेर दुसऱ्यानें ॥३३॥ घृतें शिंपिला वैश्वानर । कीं नासिकेवरी ताडिला व्याघ्र । कीं बळेंचि खवळिला फणिवर[१२] । कीं महारुद्र कोपविला ॥३४॥ मग विष्णुचाप चढविलें । नारद भार्गव दोघे निघाले । श्रीरामासी आडवे आले । मनोवेगेंकरूनियां ॥३५॥ सांवळा पुरुष देदीप्यमान । विशाळनेत्र सुहास्यवदन । जटामुकुट मस्तकीं पूर्ण । यज्ञोपवीत झळकतसे ॥३६॥ कांसेसी विराजे पीतांबर । तडित्प्राय[१३] उत्तरीयवस्त्र । परम आरक्त दिसती नेत्र । कीं सहस्रकर उतरला ॥३७॥ धनुष्यास बाण लावून । मार्गीं उभा ठाकला येऊन । सोळा पद्में दळ संपूर्ण । कंपायमान जाहलें ॥३८॥ तीन सप्तकें जेणें फिरोनी । निर्वीर केली अवनी । अवघे राजे टाकिले आटोनी । कीं प्रळयाग्नि दूसरा ॥३९॥ ऐसा तो महाराज जामदग्न्य । क्षत्रियजलदजालप्रभंजन[१४] । कीं हा कुठारपाणि[१५] भृगुनंदन । वीरकानन निर्मूळ केलें ॥२४०॥ मार्गीं देखतां महाव्याघ्र । भयभीत होती अजांचे भार । तैसा देखतां रेणुकापुत्र । शस्त्रें गळालीं बहुतांची ॥४१॥ गजबजला दळभार समस्त । मिथिलेश्वर[१६] होय भयभीत । स्त्रियांमाजी दडाला दशरथ । म्हणे अनर्थ थोर मांडला ॥४२॥ तों वैराग्यगजारूढ[१७] रघुनाथ । वरी निर्धार चवरडोल शोभत । पुढें अनुभव बैसला महावत । विवेकांकुश घेऊनियां ॥४३॥

१. वरांच्या माता कौसल्या, कैकयी व सुमित्रा २. परशुराम ३. आपल्या परिवारासह ४. रावण ५. असंख्यात ६. परशुरामाला ७. ब्राह्मणकुळात ८. परशुराम (भृगुकुळाचा जणू सूर्य) ९. धनुष्य १०. नारद ११. परशुराम १२. साप १३. विजेसारखे १४. क्षत्रियरूपी मेघसमूहाला उडवून लावणारा वायू १५. परशुराम १६. जनक राजा १७. वैराग्यरूपी हत्तीवर बसलेला

ज्ञानाचे ध्वज फडकती । चपळेऐसे सतेज तळपती । विज्ञानमकरबिरुदें निश्चिती । पुढें चालती स्वानंदें ॥४४॥ निवृत्तीच्या पताका । पालविती[१] मुमुक्षुसाधका । रामनाम-चिन्हांकित देखा । दयावातें[२] फडकती ॥४५॥ मनपवनाचे अश्वभार चालिले । अनुसंधानवाग्दोरे[३] लाविले । विरक्तिपाखरेनें[४] झांकिले । अनुभवाचे सोडिले मुक्तघोंस ॥४६॥ चिद्रत्नजडित दिव्य रथ । चाऱ्ही वाचा चक्रें घडघडित । घोडे जुंपिले चाऱ्ही पुरुषार्थ । सारथि तेथें आनंद पैं ॥४७॥ नामशस्त्रें घेऊन हातीं । सोहंशब्दें वीर गर्जती । क्षणें प्रपंचदळ विध्वंसिती । नाटोपती कळिकाळा ॥४८॥ रामावरी अद्वयछत्र । स्वानंदाचें मित्रपत्र । तन्मय चामरें परिकर । प्रेमकुंचे वरी ढाळिती ॥४९॥ हडपेकरी शुद्धसत्त्व । निजभक्तीचे विडे देत । अष्टभाव सेवक तेथ । राघवापुढें धांवती ॥२५०॥ अनुतापलघुचीर[५] घेउनी । मायिक धुरोळा वारी ते क्षणीं । तर्क पिकपात्र धरूनी । मुख विलोकिती रामाचें ॥५१॥ सौमित्र भरत शत्रुघ्न बंधू । हेचि सच्चिदानंद आनंदू । स्वरूपप्राप्तीचे[६] कुंजर अभेदू । तयांवरी आरूढले ॥५२॥ हिरे जडले दांतोदांतीं । वरी मुक्तजाळिया मिरवती । कामक्रोधांचे तरु मोडिती । सहज जातां निजपंथें ॥५३॥ आशा तृष्णा कल्पना भ्रांती । वाटे जातां गुल्में छेदिती । शुंडा हाणोनियां दांतीं । कडे फोडिती विषयांचे ॥५४॥ मदमत्सरदंभपर्वत । रथचक्रातळीं पिष्ट होत । कुमतें पाषाण पिष्ट करीत । रगडोन जाती घडघडां ॥५५॥ धैर्यतुरंग अलोट चपळ । मायारणांगणीं तळपती सबळ । वरी रामउपासक निर्मळ । कळिकाळासी न गणिती ॥५६॥ शमदमांचे पायभार । निष्कामखड्गें झेलिती समग्र । भवदळभंजन प्रतापशूर । आत्मस्थितीं चालती ॥५७॥ अनुहतवाद्यें वाजती । ऐकतां कुतर्कपक्षी पळती । कर्मजाळवनचरें निश्चितीं । टाकोन जाती स्वस्थाना ॥५८॥ चाऱ्ही[७] साही[८] अठरा[९] जण । रामासी वानिती बंदीजन । चारी मुक्ति आनंदेंकरून । नृत्य करिती राघवापुढें ॥५९॥ वाटेसी अविद्या वहाते सरिता । ते कोरडी जाहली दळ चालतां । भाव निश्चय तत्त्वतां । वेत्रधारी पुढें धांवती ॥२६०॥ सोहंभाव गर्जत । वाटेसी द्वैतजनांतें निवारित । पुढें भक्त स्वानंदें नाचत । गुण वर्णित राघवाचे ॥६१॥ एक जाहले निःशब्द मुके । ऐकती रामचरित्र कौतुकें । एक अत्यंत बोलके । एक समाधिसुखें डोलती ॥६२॥ ऐसा निजभारेंसी रघुनंदन । जो कौसल्याहृदयमांदुसरत्न[१०] । निजभार थोकला देखोन । गजारूढ पुढें झाला ॥६३॥ तंव तो क्षत्रियांतक[११] महावीर । वडील अवतार ऋषिपुत्र । कर जोडोनि नमस्कार । करी तयातें राघव ॥६४॥ किंचित निवाला परशुधर । मग बोले पंकजोद्भवपुत्र[१२] । तुज देखोनि राघवेंद्र । गजाखालीं उतरेना ॥६५॥ तूं वीर आणि विशेषें ब्राह्मण । हा तुज कांहींच नेदी मान । यथार्थ म्हणे भृगुनंदन । लाविला बाण चापासी ॥६६॥ रघुपतीस म्हणे भृगुनंदन । तू क्षत्रिय म्हणवितोसी दारुण । अधमा ताटिका स्त्री वधून । अधर्म केला साच पैं ॥६७॥ स्त्री रोगी मूर्ख बाळ । योगी याचक अशक्त केवळ । पंकगर्तेंत अंध पांगुळ । वृद्ध ब्राह्मण गाय गुरु ॥६८॥ ज्येष्ठबंधु माता पिता । जो कां शस्त्र टाकोनि होय पळता । इतुक्यांवरी शस्त्र उचलितां । महादोष बोलिला असे ॥६९॥ म्हणोनि तूं अधम वीर । स्त्रीहत्या केली साचार । त्यावरी जानकीहृत्पद्मभ्रमर[१३] । काय बोलता जाहला ॥२७०॥

---

१. फडकावितात २. दयाभावना हाच वायू ३. आत्मानुसंधान हाच लगाम ४. विरक्ती हीच झूल ५. पश्चात्ताप हाच रुमाल ६. आत्मप्राप्ती हेच हत्ती ७. चार वेद ८. सहा दर्शने ९. अठरा पुराणे १०. कौसल्येच्या हृदयरूपी पेटीतील रत्न ११. क्षत्रियांचा संहार करणारा (परशुराम) १२. नारद १३. श्रीराम

म्हणे ताटिका नव्हे माझी माता । तुवां मातृवध केला जाणतां । यापरीस काय अधमता । उरली असे सांग पां ।।७१।। उंचवर्ण तूं ब्राह्मण । सांडून अनुष्ठान तपाचरण । तुज शस्त्र धरावया काय कारण । राजहिंसा केलिया ।।७२।। तूं ब्राह्मण परम पवित्र । तुजवरी आम्हीं धरावें शस्त्र । हें कर्म आम्हां अपवित्र । ऋषिपुत्रा जाण पां ।।७३।। ऐसें ऐकतां परशुधर । सोडी तत्काळ निर्वाणशर[१] । इकडे कोदंडासी बाण रघुवीर । लावित परी सोडीना ।।७४।। कल्पांतचपळेसारिखे जाण । येती भार्गवाचे तीक्ष्ण बाण । ते दृष्टीनें पाहतां सीताजीवन[२] । जाती वितळोनि क्षणार्धें ।।७५।। जैसा झगडतां चंडपवन[३] । दीप सर्व जाती विझोन । कीं शिवदृष्टीपुढें[४] मदन । न लागतां क्षण भस्म होय ।।७६।। कीं प्रकटतां निर्वाणज्ञान । मद मत्सर जाती पळोन । कीं अद्भुत वर्षतां घन । वणवा विझोन जाय जैसा ।।७७।। जें जें टाकी येतसे अस्त्रजाळ । तें तें दृष्टीनेंचि विरे सकळ । भार्गव म्हणे हा तमाळनीळ । क्षीराब्धिवासी[५] अवतरला ।।७८।। आमुची सीमा जाहली येथून । खालीं ठेवी धनुष्यबाण । तो गजाखालीं उतरोन सीताजीवन । भेटावया धांविन्नला ।।७९।। जैशा क्षीराब्धीच्या लहरी धांवती । एकासी एक प्रीतीनें भेटती । कीं अद्वैतशास्त्रींच्या[६] श्रुती । दोन्ही येती ऐक्यासी ।।२८०।। राम परशुधर जेव्हां भेटले । एकरूप दोघांचें वोतिलें । की दोन्ही दीप एकचि जाहले । तैसेंचि भासलें जनांसी ।।८१।। एकस्वरूप दोघे जण । कालत्रयीं न होते भिन्न । भृगुपति[७] रघुपति[८] अभिधान । परी दुजेपण असेना ।।८२।। जेणें निर्दाळिले सकळ क्षत्री । ते क्रोधज्योति[९] ती अंतरीं । ती रघुपतीच्या मुखाभीतरी । प्रवेशली अकस्मात ।।८३।। मग भार्गवासी म्हणे रघुनंदन । म्यां जो चापासी लाविला बाण । यास सांगें काहीं कारण । कोणीकडे टाकूं आतां ।।८४।। परशुराम म्हणे स्वर्गमार्ग । निरोधोनि टाकीं सवेग । मी चिरंजीव होऊनि सांग[१०] । तपाचरण करीन ।।८५।। तो निमिष न लागतां गेला बाण । टाकिला स्वर्गमार्ग रोधून । चिरंजीव केला भृगुनंदन । हे कथा पूर्ण नाटकीं असे ।।८६।। असो आज्ञा घेऊनि ते वेळां भार्गव बद्रिकाश्रमीं गेला । जनकासी निरोप दिधला । तोही गेला मिथिलेसी ।।८७।। इकडे नरवीरपंचानन । देवाधिदेव रघुनंदन । दळभारेंसीं संपूर्ण । अयोध्येसी पातला ।।८८।। नगरांतून धांवती जन । दृष्टीभरी[११] पाहिला रघुनंदन । साक्षात शेष नारायण । अयोध्येंत प्रवेशती ।।८९।। जें आत्मप्राप्तीचें स्थान । तें अयोध्यानगर देदीप्यमान । प्रथम दुर्ग स्थूळदेह जाण । सूक्ष्म आंतूनि दूसरें ।।२९०।। कारणदुर्ग जाणिजे तिजें । पुढें महाकारण दुर्ग विराजे । षट्चक्रांचीं[१२] गोपुरें सतेजें । ठायीं ठायीं झळकती ।।९१।। असो नगराबाहेरूनी । चारी अवस्था चारी अभिमानी । हुडे[१३] झळकती पाहतां दुरोनी । दिव्य तेज तळपतसे ।।९२।। स्थूळ सूक्ष्म तत्त्वें बहुत । या चर्या दाट झळकत । पंच प्राण दशेंद्रियें तेथ । वीर गर्जती ठायीं ठायीं ।।९३।। भू[१४] नीर[१५] अनळ[१६] अनिळ[१७] निराळ[१८] । हेचि भांडीं वरी विशाळ । शमदमांचे वृक्ष वरी निर्मळ । सदा सफळ विराजती ।।९४।। रज तम अविद्या केर । नगरांत नाहीं अणुमात्र । श्रवणचंदनसडे[१९] निरंतर । चहूंकडे घातले ।।९५।। मननाचिया रंगमाळा । घरोघरीं घातल्या निर्मळा । शांतिकस्तुरीचा[२०] सुवास आगळा । चहूंकडे येतसे ।।९६।।

---

१. नेमका बाण २. श्रीराम ३. जोराचा वारा ४. शंकराच्या तृतीय नेत्रापुढे ५. श्रीविष्णू ६. अद्वैतप्रतिपादक वेदान्तातील ७. परशुराम ८. श्रीराम ९. क्रोधाची ज्वाळा १०. सर्व उपांगांसह ११. डोळे भरून १२. मूलाधार, मणिपूर, अनाहत इत्यादि कुंडलिनीच्या मार्गातील चक्रे १३. बुरूज १४. पृथ्वी १५. जल १६. अग्नी १७. वायू १८. आकाश १९. श्रवणभक्ती हेच चंदनाचे सडे २०. शांती हीच कस्तुरी

निजध्यास तोरणें बहुत । साक्षात्कार कळस झळकत । कर्दळीस्तंभ विराजत । मनोजयाचे चहूंकडे ॥९७॥ पूर्णानंदाचे कुंभ । निजबोधें भरले स्वयंभ । आत्मप्रकाश दीप सुप्रभ । चहूंकडे लखलखित ॥९८॥ अयोध्यावासियांच्या गळां । सदा डोलती सुमनमाळा । दयेचा तांबूल रंगला । चतुर्थ मोक्षविशेष[१] ॥९९॥ समाधि आणि सुलीनता । सर्वांसी लाविल्या गंधाक्षता । शुद्धसत्त्ववस्त्रें समस्तां । मळ तत्त्वतां नसेचि ॥३००॥ चारी[२] चौबारें बारा[३] बिदी । सोळा[४] बाजार बाहात्तर[५] सांदी । चौदा[६] दासी त्रिशुद्धी । पाणी वाहती अयोध्येंत ॥१॥ निरभिमानी चौसष्ट[७] जणी । सदा विलसती श्रीरामसदनीं । आणिक एक चारी[८] आठ[९] जणी । प्रीतिकरोनि राबती ॥२॥ अष्टभावमखरें कडोविकडी । नव महाद्वारें तेथें उघडीं । ऊर्ध्वमुख निजप्रौढीं । दशमद्वार झांकिलें ॥३॥ अष्टांगयोगी रामभक्त । तेचि त्या द्वारें येत जात । आणिकांस तो न सांपडे पंथ । असे गुप्त सर्वदा ॥४॥ चतुर्दश रत्नें साधोनि वृत्रारी । जैसा प्रवेशे अमरपुरीं । कौसल्यात्मज ते अवसरीं । तैसा अयोध्येंत प्रवेशला ॥५॥ सफळ देखोनि दिव्य द्रुम[१०] । बहुत धांवती विहंगम । तैसा पहावया आत्माराम । नगरजन धांवती ॥६॥ देव वर्षती सुमनसंभार । धडकत वाद्यांचा गजर । मंडपघसणी[११] झाली थोर । श्रीराम पाहावयाकारणें ॥७॥ देखोनियां रामचंद्र । वेधले जननयनचकोर । उचंबळला सुरसमुद्र[१२] । प्रेमभरतें दाटलें ॥८॥ कीं श्रीराम देखतां दिनमणी । टवटवल्या निजभक्तकमळिणी । सकळ लोकां अलंकारलेणीं । राघवेंद्रें दीधलीं ॥९॥ भांडारें फोडोनि दशरथें । निजधन वांटिलें याचकांतें । गजारूढ बंदीजन तेथें । सूर्यवंश वाखाणिती ॥३१०॥ निजात्मसदनीं रघुनाथ । सीतेसहित प्रवेशे समर्थ । तनमनधनेंसीं यथार्थ । मूद वरोन ओंवाळिजे ॥११॥ रामविजय ग्रंथ प्रचंड । येथें संपलें बालकांड । पुढें अयोध्याकांड परम गोड । श्रवणें कोड पुरवी पैं ॥१२॥ अग्राकडोनि इक्षुदंड[१३] । मूळाकडे विशेष गोड । सप्तकांड तैसा न हा इक्षुदंड । बहुत रसाळ पुढें पुढें ॥१३॥ पापपर्वत जडभार । रामविजय त्यावरी वज्र । संतश्रोते पुरंदर[१४] । चूर्ण करिती निजबळें ॥१४॥ श्रीमद्भीमातटविलासा । ब्रह्मानंदा पंढरीशा । श्रीधरवरदा पुराणपुरुषा । अभंगा अविनाशा अक्षया ॥१५॥ स्वस्ति श्रीरामविजय ग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत श्रोते चतुर । अष्टमाध्याय गोड हा ॥३१६॥ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ ओव्या ३१६ ॥

**॥ अध्याय आठवा समाप्त॥**

## ॥ बालकांड समाप्त॥

१. सायुज्यमुक्ती २. वेद ३. बारा मास ४. सोळा कला ५. बहात्तर नाड्या ६. विद्या ७. चौसष्ट कला ८. चारी वाणी ९. अष्टसात्त्विक भाव १०. वृक्ष ११. माणसांची गर्दी १२. देवांचा समुदाय १३. ऊस १४. इंद्र

# अयोध्या कांड

## ।। अध्याय नववा ।।

# मंथरेचा सल्ला - कैकयीचा हट्ट

।। श्रीगणेशाय नमः।। श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः। श्रीगुरवे नमः। नमूं श्रीगुरु ब्रह्मानंद। जो जगदंकुरमूळकंद[१]। जो निजजनतारक[२] प्रसिद्ध। कैवल्यदाता सुखाब्धि ।।१।। जो योगद्वीपींचें निधान। जो वैराग्यवल्लीचें सुमन। कीं वेदांतसमुद्रींचा[३] मीन। आत्मजीवनीं तळपतसे ।।२।। कीं तो धर्ममेरूचें शिखर। कीं चिदाकाशींचा जलधर। कीं कृपासागरींचें सुंदर। दिव्य रत्न प्रकटलें ।।३।। कीं शांतीचें चंद्रमंडळ। कीं सत्यतेजें सूर्य केवळ। कीं सत्त्वसरोवरींचें कमळ। किंवा सुफळ आनंदवृक्ष ।।४।। कीं क्षमामलयपर्वत[४] पूर्ण। कीं निर्विकार दिव्य चंदन। मुमुक्षुफणिवर[५] वेष्टून। सर्वदाही बैसले ।।५।। कीं शुद्धब्रह्मभागीरथीजळ[६]। तेथींचा लोट अति निर्मळ। भक्ति विरक्ति ज्ञान केवळ। तीर्थराज अवतरला ।।६।। ऐसा महाराज श्रीगुरुनाथ। त्यासी परिसाचा देऊं दृष्टांत। तो लोहाचें सुवर्ण करीत। परी आपणाऐसें न करवे ।।७।। सुरभि[७] चिंतामणि साचार। कल्पवृक्ष म्हणावा उदार। तरी तो कल्पिलेंचि देणार। परी आपणाऐसें न करवे ।।८।। जनकजननींची उपमा कैसी। द्यावी आतां सद्गुरूसी। तीं जन्मदायक निश्चयेंसीं। परी हा जन्ममरणासी दूर करी ।।९।। चौऱ्यायंशीं लक्ष योनि अमूप। सर्वाठायीं असती मायबाप। परी सद्गुरु दुर्लभ चित्स्वरूप। जन्मोजन्मीं कैंचा तो ।।१०।। जो भवइंधनदाहक[८] वैश्वानर। अज्ञानतिमिरच्छेदक दिवाकर। कीं दुःखपर्वतभंजन पुरंदर। बोधवज्र[९] झळके वरी ।।११।। ऐसा महाराज गुरुनाथ। त्यासी शिष्य विरक्त शरणागत। भ्रमर पद्मकोशीं बैसत। तैसे लुटित चरणरज ।।१२।। कीं स्फुलिंग मिळे अग्नींत। कीं जळबिंदु पडे सरोवरांत। कीं सरिता सागरीं ऐक्य होत। ऐसे भक्त गुरुचरणीं ।।१३।। कीं मुशींत आटिले अलंकार। कीं जळीं विरे जळगार। कीं तरंग मोडून साचार। एक नीर उरें पैं ।।१४।। ऐसे गुरुचरणीं मिळोन। गुरुदास्य करिती अनुदिन। क्षीराब्धीमाजी उपमन्य। विलसे जैसा सर्वदा ।।१५।। कीं जान्हवींत मणिकर्णिका तीर्थ। कीं भीमेंत चंद्रभागा विख्यात। तैसे भजनगंगेंत यथार्थ। गुरुभक्त वंद्य पैं ।।१६।। ऐसें ऐकतां गुरुस्तवन। परम आनंदले संतजन। धन्य रे धन्य म्हणोन। तर्जनी मस्तक डोलविती ।।१७।। ऐसें देखोनि श्रीधरें। नमस्कार घातला प्रेमादरें। म्हणे तुम्ही रामकथामृतपात्रें[१०]। सादर श्रवणीं बैसलां ।।१८।। तुम्ही ज्ञानगंगेचे ओघ निर्मळ। कीं विवेकभूमीचीं निधानें केवळ। कीं कृपार्णवींचीं[११] जहाजें सबळ। क्षमाशीड वरी तळपे ।।१९।। कीं नवविध भक्तीचीं दिव्य द्वीपें सुंदरें। कीं अनुभवशास्त्रींचीं मंदिरें। कीं पिकलीं आनंदक्षेत्रें। समसमान चहूंकडे ।।२०।। परोपकारनभींचीं नक्षत्रें निर्मळ। परम गुणप्रिय मुक्तमराळ। कीं शब्दरत्नग्राहक सकळ। या ग्रंथश्रवणीं मिळाले ।।२१।। कीं रामकथाकमळिणीचे[१२] भ्रमर। कीं अवधानदाते जलधर[१३]। माझे शब्द आरुष[१४] निर्धार। परी तुम्हीं प्रीति ठेविली ।।२२।। रानपक्षी शुक[१५] यथार्थ। त्याचे शब्द ऐकतां तटस्थ। होती शास्त्रज्ञ पंडित। तैसेंचि येथें जाहलें ।।२३।। कीं बोबडें बोलतां बालक। अत्यंत संतोषे जनक। तैसें शब्दांचें कौतुक। संतजन करिती पैं ।।२४।। तरी आतां इतुकेंच करा सत्वर। सादरता[१६] हे दिव्य अलंकार। मजलागीं देऊन साचार। संतजनीं गौरवावें ।।२५।।

---

१. जगताचा प्रारंभ २. भक्तांचा तारक ३. वेदान्तरूपी समुद्रातील ४. क्षमारूपी मलय पर्वत ५. मुमुक्षू हेच सर्प ६. शुद्ध ब्रह्म हे गंगेचे पाणी ७. कामधेनू ८. संसाररूपी इंधन जाळणारा ९. बोधरूपी वज्र १०. रामकथारूपी अमृत घेण्यास योग्य ११. कृपेच्या सागरातील १२. रामकथा हीच कमलिनी १३. मेघ १४. असंबद्ध १५. पोपट १६. लक्षपूर्वक

वक्ता-क्षेत्र पिकलें पूर्ण । परी सादरता पाहिजे वरी घन । चित्तव्याकुळता हें अवर्षण । तेणें मोड करपती ॥२६॥ बोलती संत श्रोते चतुर । तुझीं वचनें हा सुधाकर[१] । येणें आमुचे कर्णचकोर[२] । तृप्त जाहले निर्धारें ॥२७॥ असो आतां वाग्वल्ली सुंदरी । चढे अयोध्याकांडमंडपावरी । तेथींचीं फळें निर्धारीं । भक्तचतुरीं सेविजे ॥२८॥ मागें अष्टमाध्यायीं कथन । जानकी परिणिली कोदंड भंगोन । त्यावरी भृगुपतीचा[३] दर्प हरोन । रघुपती आला अयोध्ये ॥२९॥ कैकयीचा बंधु विख्यात । परम प्रतापी संग्रामजित । मान देऊनि बहुत । लग्नासी आणिला दशरथें ॥३०॥ मिथिलेचा लग्नसोहळा पाहून । अयोध्येसी आला परतोन । कैकयीस म्हणे भरत शत्रुघ्न । नेऊं आपुले ग्रामातें ॥३१॥ ऐकोनि बंधूचें वचन । येरी म्हणे अवश्य जा घेऊन । परी रायातें पुसोन । मग दोघांतें नेइंजे ॥३२॥ दशरथास पुसे संग्रामजित । मास एक शत्रुघ्न आणि भरत । स्वराज्यासी नेऊन त्वरित । आणून मागुती पोंचवूं ॥३३॥ अवश्य म्हणतां अजसुत[४] । कैकयी भरतासी सांगत । तुवां मातुलासह जावें त्वरित । शत्रुघ्नासी घेऊनियां ॥३४॥ भरत म्हणे श्रीरामावांचुन । मज न गमे एकही क्षण । रघुपतीचे सेवेवीण । न रुचे मज आन कांहीं ॥३५॥ श्रीराम चंद्र मी चकोर । मी चातक रघुवीर अंबुधर[५] । राम सुरभि[६] मी वत्स साचार । वियोग सहसा सोसेना ॥३६॥ श्रीरामसेवा सांडोन । इतर सुखें इच्छी कोण । पीयूषतुल्य अन्न टाकून । कोण वमन विलोकी ॥३७॥ मुक्ताफळें हंस टाकोन । प्राणांतींही न भक्षी शेण । कल्पद्रुमींचा विहंगम जाण । बाभुळेवरी न बैसे ॥३८॥ घृतमधुदुग्धसरोवर[७] । जरी सुरसें भरलें अपार । परी जीवन सांडूनि जळचर । कदा तेथें न जाती ॥३९॥ ऐसें बोलतां भरत । नेत्रीं आले अश्रुपात । माता म्हणे एक मासपर्यंत । क्रमोनि[८] येईं सवेंचि ॥४०॥ नुल्लंघवे मातृवचन । भरत श्रीरामास पुसे येऊन । मग बोले जानकीमनमोहन[९] । बा रे लौकरी येइंजे ॥४१॥ भरतशत्रुघ्नांनीं ते वेळे । रघुवीरचरण वंदिले । चतुरंग दळ सिद्ध जाहलें । रथीं बैसले दोघेही ॥४२॥ राया दशरथाचे कुमर । श्रीरामचरणाब्जभ्रमर[१०] । मातुळग्रामासी सत्वर । दळभारेंसीं पातले ॥४३॥ इकडे अयोध्येसी रामलक्ष्मण । सर्वदा करिती गुरुसेवन । तैसेचि दशरथाचें भजन । रघुनंदन करीतसे ॥४४॥ वसिष्ठमुखें नित्य विद्याश्रवण । श्रीराम करीतसे आपण । चतुःषष्टिकलाप्रवीण । रघुनंदन जाहला ॥४५॥ मग धनुर्विद्येचा अभ्यास । करिता जाहला परमपुरुष । रंगभूमि साधूनि विशेष । युद्धकळा शिके तेथें ॥४६॥ वेणुमस्तकीं[११] घालितां कुठार । चिरत जाय जैसा दूर । तैसी श्रीरामबुद्धि तीव्र । तर्क अपार पावतसे ॥४७॥ वसिष्ठ धनुष्यबाण घेऊन । जें जें मांडून दावी ठाण । त्याहून विशेष रघुनंदन । दावी करून गुरूसी ॥४८॥ अस्त्रशस्त्रविद्याप्रवीण । जाहले राम आणि लक्ष्मण । ते परीक्षा पाहावया अजनंदन । रंगमंडपीं बैसला ॥४९॥ रंगमंडपाची रचना । न वर्णवेचि सहस्रवदना । तें तेज विलोकितां सहस्रकिरणा[१२] । परमाश्चर्य वाटतसे ॥५०॥ शशांकप्रभेसम[१३] पूर्ण । कोरिले काश्मीर पाषाण । त्यांची पोंवळी प्रभाघन । सभोंवतीं रचियेली ॥५१॥ त्यामाजी सप्तरंगी पाषाण । चक्रजाळ्या चौकटी पूर्ण । माजी घातल्या दारुण । पाहतां आश्चर्य वाटतसे ॥५२॥ साधिलें पाचुबंद अंगण । गरुडपाचूंची जोतीं पूर्ण । निळयाचे गज घडोन । तेचि तोळंबे लाविले ॥५३॥ त्यावरी हिरेयाचे स्तंभ । वरी वैडूर्यउथाळीं स्वयंभ । सुवर्णाचीं तुळवटें[१४] सुप्रभ । लंबायमान पसरलीं ॥५४॥

१. चन्द्र २. कर्ण हेच चकोर पक्षी ३. परशुरामाचा ४. राजा दशरथ ५. मेघ ६. कामधेनू ७. तूप, मध आणि दूध यांचे सरोवर ८. राहून ९. श्रीराम १०. रामचरणरूपी कमळातील भ्रमर ११. बांबूवर १२. सूर्याला १३. चंद्रकांतीप्रमाणे १४. तुळ्या

गरुडपाचूचे दांडे विराजती । आरक्त माणिककिलचा झळकती । चर्या शेषफणाकृती[१] । जैसे गभस्ति वळीनें ॥५५॥ एकावरी एक नवखण । तेथें रात्रीस नाहीं कारण । जेथें गरुडपाचूचे रावे पूर्ण । शब्द करिती नवल हें ॥५६॥ निळयाचे मयूर धांवती । रत्नांचीं गोलांगुलें[२] नाचती । छप्पन्न देशींच्या नृपाकृती । चित्रें भिंतीवरी पैं ॥५७॥ खांबीं सूत्रींच्या पुतळिया । नाचती गिरक्या घेऊनियां । नृसिंहमूर्ति स्तंभांतूनियां । हुंकारती क्षणक्षणां ॥५८॥ ऐशिया रंगमंडपात । बैसता जाहला द्विपंचरथ[३] । वसिष्ठादि ऋषी समस्त । अष्टाधिकारी आणि प्रजा ॥५९॥ मंडपजाळीवाटे तत्त्वतां । पाहती कौसल्यादि माता । श्रीरामें विद्या साधिल्या समस्ता । देखावया आस्था सकळांची ॥६०॥ जैसा नक्षत्रांमाजी अत्रिसुत[४] । तैसा सभेसी राजा दशरथ । इंद्राजवळी बृहस्पति बुद्धिमंत । तैसा वसिष्ठ बैसला ॥६१॥ असो रंगमंडपापुढें दोघे जण । श्रीराम आणि लक्ष्मण । पाचुबंद अंगणीं येऊन । उभे ठाकले तेधवां ॥६२॥ जैसे शशी आणि चंडकिरण । कीं अपर्णावर[५] आणि रमारमण[६] । कीं मेरुमांदार स्वरूपें धरून । उभे ठाकले रणांगणीं ॥६३॥ साक्षात शेषनारायण । अवतारपुरुष दोघे जण । अनंत जन्मींचें तपाचरण । दशरथाचें फळा आलें ॥६४॥ कोटिकंदर्पलावण्यखाणी[७] । तेजासी उणा वासरमणी । कीं अनंत विजू पिळूनी । रामरूप वोतलें ॥६५॥ तो लावण्यामृतसागर । आजानुबाहु श्रीरघुवीर । गुरु आणि पितयासी नमस्कार । करोनि शस्त्रें वंदिलीं ॥६६॥ नाना वाहनीं आरूढोनि रघुपती । दावी युद्धाच्या अगाध रीती । रथ फिरवी नानागतीं । विस्मित पाहती जन सर्व ॥६७॥ मग दावी कुंजरयानफेरी[८] । सवेंचि तुरंगारूढ होय झडकरी । रथचमक दावी नानापरी । अलातचक्र जैसें कां ॥६८॥ चरणयुद्ध अस्त्रयुद्ध । शस्त्ररीति नानाविध । मल्लमेषकुंजरयुद्ध । व्याघ्रसिंहयुद्धगती ॥६९॥ कूर्मवृषभनक्रयुद्ध[९] । जलमंडलयुद्ध[१०] विशद । अंतरिक्ष भूमि गदा प्रसिद्ध । सकळ कलायुद्ध दाविलें ॥७०॥ शक्ति पाशुपत तोमर । शूल परिघ लहुडी चक्र । कंदुक भिंडिमाळा वज्र । दावी रघुवीर गति त्यांची ॥७१॥ पाश असिलता मुद्गल । शतघ्नी परशु अंकुश कुंत सरळ । यमदंष्ट्रा शब्दयुद्ध सबळ । यंत्रमंत्रयुद्धगती ॥७२॥ नेत्र झांकोनि सोडी बाण । पुढें पाहे मागें भेदी जाण । दळसिंधुपरतटाकगमन[११] । राजीवनयन दावीतसे ॥७३॥ एक सोडितांचि बाण । कोट्यवधि व्हावे त्यापासून । सकळ चमूचें शिरच्छेदन । एकाचि बाणें करावें ॥७४॥ अग्न्यस्त्र पर्जन्यास्त्र । वात पर्वत आणि वज्र । माया ब्रह्म माहेश्वर । भूतास्त्र भैरवास्त्र पैं ॥७५॥ सिंह सर्प आणि गरुडास्त्र । काम वैराग्य तारकासुर । पाप नाम गंधर्वास्त्र । दावी रघुवीर अस्त्रें हीं ॥७६॥ ब्रह्मशिरो विश्वजित । या अस्त्रगती दावी रघुनाथ । तैसेंच करी सुमित्रासुत । मान दशरथ डोलवी ॥७७॥ वसिष्ठ उठोनि ते अवसरीं । श्रीरामसौमित्रासी हृदयीं धरी । दशरथाचा आनंद अंबरीं । न समाये तेव्हां सर्वथा ॥७८॥ सभा विसर्जून दशरथ । वसिष्ठ सौमित्र रघुनाथ । प्रवेशते जाहले सदनांत । आनंदयुक्त सर्वही ॥७९॥ यावरी एके दिवशीं अजनंदन । दर्पणीं विलोकी निजवदन । तों दाढींत शुभ्र केश देखोन । काय बोलता जाहला ॥८०॥ म्हणे शीघ्र बोलवा ब्रह्मनंदन । अष्टाधिकारी ऋषी प्रजाजन । सकळ व्यवहारी[१२] वैश्यजन । विवेकसंपन्न थोर थोर ॥८१॥ सकळांसी बैसवोनि एकांती । निजगुह्य पुसे कौसल्यापती[३] । म्हणे राज्य द्यावें रामाप्रती । ऐसें चित्तीं वाटतसे ॥८२॥

१. शेषाच्या फणेसारखा २. माकडे ३. राजा दशरथ ४. चंद्र ५. श्रीशंकर ६. श्रीविष्णू ७. कोटी मदनाएवढा सुंदर ८. हत्तीवरून फेरी ९. कासव, बैल आणि मगर यांसारखे युद्ध १०. पाण्यात चक्राकार फिरून केलेले युद्ध ११. एकदम सेनेपलीकडे जाणे १२. व्यापारी

भरद्वाज बोले सप्रेम । आजि माझें सफल जन्म । त्रिभुवनपति श्रीराम । गृहा आला म्हणोनियां ॥५०॥ माझिया पुण्याचे गिरिवर[१] । भेदोनि गेले चिदंबर[२] । तरीच सीतावल्लभ रघुवीर । मूळेंविण[३] पातला ॥५१॥ सकळमंगलदायक[४] रघुवीर । जो मंगळभगिनीचा निजवर । मंगळमातेचा[५] उद्धार । करावया जात प्रदक्षिणे ॥५२॥ जो पंचद्वयरथनंदन[६] । करावया सुरांचें बंधमोचन । कमळिणीमित्रकुळभूषण[७] । येणें पंथें चालिला ॥५३॥ तों ऋषी धांवती अपार । त्यांहीं कैसा वेष्टिला रघुवीर । जैसा देवीं वेष्टिला सहस्रनेत्र । कीं किरणांत मित्र विराजे ॥५४॥ कीं चंदनें वेष्टित मलयानिळ । कीं विरक्तीं वेष्टिला जाश्वनीळ[८] । कीं वराभोंवते सकळ । वऱ्हाडी जैसे मिरवती ॥५५॥ कीं साधक जैसे निधानाजवळी । कीं रत्नाभोंवतीं परीक्षकमंडळी । कीं कनकाद्रीभोंवतीं पाळी[९] । कुलाचलांची[१०] विराजे ॥५६॥ कीं नक्षत्रीं वेष्टिला शशी । कीं मानस वेष्टिलें राजहंसीं । तैसा ऋषींनीं अयोध्यानिवासी । भरद्वाजाश्रमीं वेष्टिला ॥५७॥ भरद्वाजें पूजिला रघुनंदन । तेथें क्रमिला एक दिन । ऋषी बोलती सुवचन । अजनंदनपुत्राप्रति ॥५८॥ चतुर्दश वर्षेपर्यंत । श्रीरामा राही येथें स्वस्थ । दंडकारण्याप्रती व्यर्थ । कासयासी जावें हो ॥५९॥ राघव म्हणे येथें राहतां । अयोध्येच्या प्रजा येतील समस्ता । ब्राह्मण आणि मातापिता । येतील भेटीस निश्चयें ॥६०॥ आम्ही गुप्तरूपें येथुनी । प्रवेशूं महाकाननीं । पुढील भविष्यार्थ मनीं । मुनी तुम्ही जाणतसां ॥६१॥ असो ऋष्याश्रमीं क्रमोनि एक दिवस । ऋषींस पुसे अयोध्याधीश । पुढें क्रमावया अरण्यवास । मार्ग आम्हांस दाविजे जी ॥६२॥ भारद्वाज म्हणे चित्रकूटपर्वतीं । विद्वज्जन बहुत राहती । तुम्हीं तेथें करावी वस्ती । कांहीं दिवस राघवा ॥६३॥ सिद्धवटपर्यंत । भारद्वाजें बोळविला रघुनाथ । आज्ञा घेऊनि त्वरित । प्रयागासी परतला ॥६४॥ सिद्धवट देखोनि नमन । करी पद्माक्षीरमण[७] । त्या सिद्धवटीं सावित्री पूर्ण । सीता देखोन नमस्कारी ॥६५॥ विजयी होऊनि रघुनंदन । वनींहून आलिया परतोन । दोन लक्ष गोदानें येथें देईन । ब्राह्मणसंतर्पण यथाविधि ॥६६॥ पुढें चित्रकूटपर्वतावरी । चढला शरयूतीरविहारी[७] । तेथें वाल्मीकिऋषी तप करी । बहुत ऋषींसमवेत ॥६७॥ जेणें नारदकृपेचेनि बळें । अवतारभविष्य[११] कथियेलें । जैसें कमळाअगोदर भरिलें । सरोवरीं जळ जेवीं ॥६८॥ अवताराआधीं जन्मपत्र । केलें शतकोटी विस्तार । तेणें दृष्टीं देखतां रघुवीर । आश्रमाबाहेर धांवला ॥६९॥ वाल्मीकीचे निजचरणीं । माथा ठेवी मोक्षदानी । वाल्मीकें वरचेवर उचलोनी । आलिंगन दीधलें ॥७०॥ इतरां समस्त द्विजवरां । भेटला परात्पर सोयरा । सौमित्रें चित्रकूटीं ते अवसरा । पर्णकुटिका बांधिली ॥७१॥ ऋषिमंडळींत रघुवीर । चित्रकूटीं राहिला जगदुद्धार । गुहक पाठवून हेर । समाचार नेला हो ॥७२॥ चित्रकूटीं राहिला रघुनायक । सुमंतासी सांगे गुहक । राघववियोगें दोघांसी दुःख । अत्यंत जाहलें तेधवां ॥७३॥ गुहकें सुमंत घरासी नेला । म्हणे मी आतां राम कैं देखेन डोळां । असो रथासहित सुमंत परतला । वेगें अयोध्येसी येतसे ॥७४॥ अयोध्या दिसे प्रेतवत । रिता घेऊनि प्रवेशला रथ । सुमंत मुखावरी पल्लव घेत । झांकोनि मुख चालिला ॥७५॥ सुमंत म्हणे आपुले मनीं । श्रीराम टाकोनि आलों वनीं । ऐेशिया मज अभाग्यासी जननी । काय व्यर्थ प्रसवली ॥७६॥ कैकयी सदनासमोर । सुमंतें सोडोनि रहंवर[१२] । मंदिरांत प्रवेशे सत्वर । अति मुखचंद्र उतरला ॥७७॥

१. पर्वत २. चित्ताकाश ३. बोलावण्याशिवाय ४. सर्व शुभ देणारा ५. पृथ्वीचा ६. दशरथ ७. श्रीराम ८. श्रीशंकर ९. रांग १०. इतर पर्वतांची ११. रामायण १२. रथ

रिता आणिला माघारा रथ । अयोध्येंत समस्तांसी जाहलें श्रुत । घरोघरीं एकचि आकांत । सीताकांतवियोगें ॥७८॥ इकडे कंठीं प्राण धरून । कैकयीसदनीं अजनंदन[१] । सुमंत तयासी देखोन । नमन करूं लाजतसे ॥७९॥ राजा म्हणे सुमंतप्रधाना । कोठें टाकिलें राजीवनयना । मज वाटतें माझिया प्राणा । मूळ आलासी सत्वर ॥८०॥ जगद्वंद्य माझी वस्तु जाण । टाकिली कोण्या वनीं नेऊन । श्रीराम माझें निधान । कोणें चोरें चोरिलें ॥८१॥ राजहंस माझा रघुनंदन । पंकगर्तेत ठेविला रोवून । माझी सुढाळ मुक्ता पूर्ण । भिरकावून दिधली कोठें ॥८२॥ अन्नपूर्णावरहृदयींचे[२] रत्न । म्यां तुझे हातीं दिधलें पूर्ण । घोरवनीं तें टाकून । कैसा आलासी माघारा ॥८३॥ मज अंधाची काठी बळें । हिरूनि कोणीं नेली न कळे । अरण्यामाजी माझीं बाळें । उपवासी निराहार ॥८४॥ सुंदर सुकुमार सुमनकळी । माझी माउली जनकबाळी । सुमंता रथाखालीं कैसी उतरली । कैसी चालिली पंथीं सांग ॥८५॥ तिहीं भोजनें कोठें केलीं वनीं । शयन केलें कोणे मेदिनीं । सुमंता सांग मजलागुनी । देह टाकूनि जाईन मी ॥८६॥ मग तो सुमंत म्लानवदन । सांगे सकळ वर्तमान । तीन दिवस निराहार पूर्ण । तिघें जणें पैं होतीं ॥८७॥ तृणासनीं[३] राजीवनेत्र[४] । पहुडला घनश्यामगात्र[५] । पांघरावया अंबर[६] । आपाद समस्त देखिला म्यां ॥८८॥ शृंगवेरपर्यंत । म्यां बोळविला रघुनाथ । ज्याचेनि नामें जगत उद्धरत । तो गुहकें नेला परपारा ॥८९॥ मायानदी उल्लंघून । संत स्वरूपीं होती लीन । तैसा पैलतीरा रघुनंदन । देदीप्यमान पाहिला म्यां ॥९०॥ याउपरी करुणाकरें[७] । अयोध्येसी जाय त्वरें । तेथोनियां जगदुद्धारें[८] । निजकरें मज पालविलें ॥९१॥ राघवें साष्टांग नमन । घातलें मग तेथून । पुढें चरणचालीं रघुनंदन । करीत गमन वनवासा ॥९२॥ जैसा अस्ता गेला दिनकर । तैसा वनीं प्रवेशला रघुवीर । याज्ञिक कुंडामाजी वैश्वानर । आच्छादित जैसा कां ॥९३॥ ऐसीं सुमंताचीं वचनें भूपाळ । कर्णीं ऐकतांची तत्काळ । धबधबा हाते वक्षःस्थल । पिटोन घेत ते समयीं ॥९४॥ सुमंता वनीं रघुनंदन । कैसा परतलासी सोडून । अरे तुझें हृदय निर्दय पूर्ण । कैसा प्राण गेला नाहीं ॥९५॥ सुमंता तुझा थोर धीर । वज्रापरी तुझें शरीर । वनीं सांडोनि रघुवीर । कैसा येथवरी आलासी ॥९६॥ गळामाजी गुंतला मीन । तैसा तळमळी अजनंदन । श्रीरामवियोगाचा अग्न । जाळीत पूर्ण सर्वांगी ॥९७॥ म्हणे धांव धांव बा रे रघुनंदना । सरोजनेत्रा सुहास्यवदना । कोमलांगा माझिया प्राणा । गेलासी वना टाकूनि ॥९८॥ हांक फोडिली दशरथें । धांव माउलिये रघुनाथे । मज सांडोनि तान्हयातें । गेलीस वना दूरदेशा ॥९९॥ रामा चालिला माझा प्राण । अंतकाळीं दावीं तुझें वदन । ऐसें बोलतां वटारिले नयन । सोडिला प्राण रामस्मरणें ॥१००॥ राम राम करितां दशरथ । जाहला रामरूप यथार्थ । खुंटला शोक समस्त । हेत मात सर्व राहिली ॥१॥ पहा शरीराचें कर्म गहन । चौघे पुत्र दशरथास असोन । एकही जवळी नसतां सोडिला प्राण । मग सुमंत प्रधान धांवला ॥२॥ तेणें उशासी मांडी दिधली । सुमित्रा कौसल्या जवळी आली । तेव्हां एकचि हांक जाहली । महाशब्देंकरूनियां[९] ॥३॥ सप्तशत राण्या सकळ । दुःखें पिटिती वक्षःस्थळ । हडबडलें अयोध्यापुर सकळ । शोक तुंबळ लोकांतें ॥४॥ आक्रोशें कौसल्या सुमित्रा रडत । रामवियोगें दुःख बहुत । त्यांत मृत्यु पावला दशरथ । नाहीं अंत शोकातें ॥५॥ जैसें पायांस डंखिजे महाव्याळें[१०] । तों मस्तकीं वृश्चिकें ताडिले । कीं वणव्यांत प्राणी सांपडले । त्यावरी तोडिलें तस्करांनी ॥६॥

१. दशरथ २. श्रीशंकराच्या हृदयातील ३. गवताच्या शेजेवर ४. श्रीराम ५. सांवळ्या अवयवांचा ६. आकाश ७. दयावंत श्रीरामाने ८. जगाचा उद्धारक श्रीराम ९. रडण्याच्या मोठ्या आवाजाने १०. महासर्पाने

आधींच बहुत धाकेंकरून । त्यावरी पडती पाषाण । आधींच नवज्वरें गेला व्यापून । त्यांत विषपान पैं झालें ॥७॥ आधींच गृहास लागला अग्न । त्यावरी जाहला प्रभंजन । कीं पूरीं जातां बुडोन । तों गळां पाषाण बांधिला ॥८॥ व्याघ्रभयें पळतां उठाउठी । तों रिसें कंठी घातली मिठी । तैसी कौसल्येस जाहली गोष्टी । ललाट पिटी अवनीये ॥९॥ तों तेथें पातला ब्रह्मसुत । म्हणे शोक कां करितां व्यर्थ । आतां वेगीं आणोनि भरत । राज्यीं तया स्थापावें ॥११०॥ एक राजा उभा राहिल्याविण । करूं नये राजाचें दहन । आणि समीप नसता नंदन । कदा अग्नि देऊं नये ॥११॥ मग तैलद्रोणींत साचार । घातलें दशरथाचें शरीर । वसिष्ठ म्हणे सुमंता सत्वर । रथ घेऊनि धांवें कां ॥१२॥ सूर्योदय होतांचि येथें । वेगीं घेऊनि यावें भरतातें । त्याचे कर्णीं वोखट[1] तेथें । सर्वथाही सांगू नको ॥१३॥ वनास गेला रघुनंदन । अथवा दशरथें सोडिला प्राण । हें गुह्य त्यासी न सांगोन । वेगें घेऊन येइंजे ॥१४॥ भरत केवळ श्रीरामभक्त । ही गोष्ट ऐकतां विपरीत । तत्काळ देह टाकील तेथ । यालागीं श्रुत न करावें ॥१५॥ भक्त विरक्त चतुर वरिष्ठ । जो ज्ञानगंगेचा निर्मल लोट । जो विवेकरत्नांचा मुकुट । एकनिष्ठ सुभट जो ॥१६॥ वैराग्यवैरागर[2] पूर्ण । जो आनंदभूमीचें निधान । जो विरक्तवल्लीचें सुमन । जो समुद्र सत्याचा ॥१७॥ जो शांतिवृक्षाचें[3] पक्व फळ । जो दयेचा आगर केवळ । कीं उपरतीचा[4] निर्मळ । पूर्ण कुंभ उचंबळला ॥१८॥ ऐसा सर्वगुणीं अलंकृत । वेगीं घेऊन ये भरत । तैसाचि निघाला सुमंत । आचार्यचरण[5] वंदूनी ॥१९॥ वायुवेगें चालिला सुमंत । स्वप्न देखे मातुलालयीं भरत । कृष्णवर्णवस्त्रवेष्टित[6] । नारी एक देखिली ॥१२०॥ तिनें घेऊनियां करीं । तैल जिरवी आपुले शिरीं । भरत जागा होऊनि झडकरी । रुदन करी आक्रोशें ॥२१॥ म्हणे स्वप्न नव्हे हा अनर्थ । आम्ही चौघे बंधु आणि दशरथ । पांचांमाजी जीवघात । होईल एकाचा निर्धारें ॥२२॥ आणि प्राणसखा अत्यंत । तो अंतरेल दूर बहुत । धरणीवरी मस्तक भरत । आपटी शोकें तेधवां ॥२३॥ आक्रंदोनि हांक देत । केवीं दृष्टीं देखेन रघुनाथ । राजाधिराज दशरथ । अंतरला ऐसें वाटतें ॥२४॥ तों मातुळ संग्रामजित । भरतासी स्नेहें हृदयीं धरित । शत्रुघ्नासी समजावित । शोक व्यर्थ कां करितां ॥२५॥ रजनी सरतां तत्काळ । सिद्ध करोनि चतुरंगदळ । आयोध्येप्रति उतावेळ । नेऊन घालवितो तुम्हांतें ॥२६॥ ऐसे बोलतां सरली रजनी । भरत शत्रुघ्न उठोनी । नगराबाहेर येऊनी । मार्ग लक्षीत अयोध्येचा ॥२७॥ ऊर्ध्ववदनेंकरूनि[7] चकोर । विलोकित जैसा चंद्र । कीं चक्रवाक चिंती दिवाकर[8] । किंवा मयूर मेघातें ॥२८॥ ऐसा अयोध्येचा मार्ग लक्षीत । तों एकाएकीं देखिला रथ । वरी प्रधान सुमंत । आरूढोनि येतसे ॥२९॥ मंद मंद येत रहंवर । अश्वांचे नेत्री वाहे नीर । ध्वजाचें विद्युत्प्राय[9] चीर । अति मलिन दिसतसे ॥१३०॥ वरी सुमंत म्लानवदन । नेत्री वाहत अश्रुजीवन[10] । राघवलीला आठवून । क्षणक्षणां स्फुंदतसे ॥३१॥ मागुती वस्त्रें नेत्र पुसीत । तों शत्रुघ्न आणि भरत । जवळी आले धावोनि त्वरित । चिन्हें विपरीत देखोनियां ॥३२॥ सुमंतें देखतांचि भरत । वेगें रथाखाली उतरत । क्षेमालिंगन दोघां देत । सांगे त्वरित बोलाविलें ॥३३॥ भरत सुमंताचे वदन । क्षणक्षणां पाहे विलोकून । म्हणे सख्या तुझे आरक्त नयन । शोकें झाले दिसती पैं ॥३४॥

---

१. वाईट २. वैराग्याची खाण ३. शांतिभावनेचा वृक्ष ४. विरक्तीचा ५. वसिष्ठांचे पाय ६. काळे वस्त्र नेसलेली ७. वर मुख करून ८. सूर्य ९. विजेसारखे लखलखीत १०. डोळ्यांतील पाणी

काय अयोध्येचें वर्तमान । सुखी आहे कीं रघुनंदन । श्रीदशरथ क्षेम कल्याण । सुखरूप आहे कीं ॥३५॥ सुमंत म्हणे सुखी रघुनंदन । तुम्हांसी बोलाविलें त्वरेंकरून । मग रथीं बैसत भरतशत्रुघ्न । त्वरेने शीघ्र चालिले ॥३६॥ पुढें धुरे बैसला सुमंत । घडीघडी नेत्रांसी वस्त्र लावीत । तेणें भरत होय सद्‌गदित । तों पुढें देखत अयोध्या ॥३७॥ प्राणरहित जैसें शरीर । तैसें दिसे अयोध्या नगर । कीं जीवनेंविण[१] सरोवर । किंवा कांतार दग्ध जैसें ॥३८॥ कीं नारी जैसी भ्रताराविण[२] । कीं जननीविण तान्हें दीन । कीं नासिकावांचोनि वदन । अयोध्याभुवन तेंवि दिसे ॥३९॥ राजमंदिराचे ढळले कळस । मंगलवाद्यांचा नाही घोष । घरोघरीं नारी पुरुष । शोक आक्रोशें करिताती ॥१४०॥ होतें जेथें दशरथाचें प्रेत । सुमंतें तेथेंचि नेला रथ । छत्र भंगलें देखतां भरत । रथाखाली पडियेला ॥४१॥ दशरथाचें प्रेत देखोनि । भरत तेव्हां लोळे धरणी । अश्रुधारा वाहती नयनीं । शोक गगनीं न समाये ॥४२॥ शोकसमुद्रीं निमग्न । जाहला कैकयीनंदन । भोंवते सद्‌गद प्रजाजन । दुःखेंकरून बोलती ॥४३॥ मग सुमंतप्रधानें सांवरूनी । भरत बैसविला उठवोनी । भरत विचार करी मनीं । राम नयनीं पाहीन आतां ॥४४॥ संसारमाया सांडोन । दशरथ पावला स्वर्गभुवन । मी आतां रामचरण । दृढ धरीन निजभावें ॥४५॥ विलोकितां श्रीरामवदन । मी शोकावेगळा होईन । प्रधानासी म्हणे मज नेऊन । श्रीरामचरणांवरी घालावें ॥४६॥ वडील बंधु रघुनाथ । दशरथासम यथार्थ । रामसदनाकडे भरत । मुरडोनियां[३] चालिला ॥४७॥ परी वनास गेला रघुनंदन । हें कोणासी न बोलवे वचन । एक म्हणती देईल प्राण । सीतारमण न देखतां ॥४८॥ तों आरडत कौसल्यामाये । भरत धांवोनि धरी पाये । माये श्रीराम कोठें आहे । तो लवलाहें दावीं कां ॥४९॥ तों कौसल्येसी आली मूर्च्छना । बोलतां न बोलवे वचना । बा रे राम गेला तपोवना । मग रायें प्राण त्यजियेला ॥१५०॥ भरतें ऐसे ऐकिलें । ललाट भूमीवरी आपटिलें । तें दुःख न जाय वर्णिलें । कल्पांत मांडला ते वेळीं ॥५१॥ अहा रघुवीरा राजीवनेत्रा । नवमेघरंगा[४] स्मरारिमित्रा[५] । जगद्वंद्या कोमलगात्रा । कां उपेक्षिलें आम्हातें ॥५२॥ ऐसे बोलोनियां भरत । मेदिनीवरी अंग घालित । माझी माउली रघुनाथ । गेली निश्चित टाकोनी ॥५३॥ मेदिनीगर्भरत्नभूषण[६] । वनासी निघतां रघुनंदन । दशरथें जेवीं सोडिला प्राण । तैसें मरण मज कां न ये ॥५४॥ अद्यापि न ये मजला मृत्य । कां मृत्यूच निमाला यथार्थ । रामवियोगाचें दुःख अत्यंत । मृत्यासही न सोसवे ॥५५॥ धन्य धन्य राजा दशरथ । कोमळहृदय प्रेमळ यथार्थ । देह ठेवूनि सीतानाथ । जवळ केला त्वरेनें ॥५६॥ तंव तो कमलोद्‌भवसुत[७] । आचार्य पातला त्वरित । भरत जाऊनि चरण धरीत । मज रघुनाथ दाखवीं ॥५७॥ पहावया भरताचें मन । वसिष्ठ काय बोले वचन । तुज राज्य दिधल्याविण । रायास अग्नि देऊं नये ॥५८॥ आणि तुझिया मातेच्या मनांत । तुज राज्य व्हावें प्राप्त । वनास गेला रघुनाथ । तेंच निमित्त जाण पां ॥५९॥ ऐसें ऐकतां ते अवसरीं । परम दुःख पावला अंतरीं । भरत आक्रंदत दीर्घस्वरीं । राज्य करीं म्हणतांचि ॥१६०॥ सुकुमार चंपककळिकेवरी । चपळा[८] पडतां न उरे उरी । कीं कर्पूरजननीचे[९] शिरीं । शुंडाप्रहारीं[१०] ताडी गज ॥६१॥

१. पाण्याशिवाय २. नवऱ्याशिवाय ३. वळून ४. हे शामलांगी रामा ५. महादेवप्रिय रामा ६. सीतापती राम ७. वसिष्ठ ऋषी ८. वीज ९. केळीच्या झाडावर १०. सोंडेने

कीं शस्त्रघायें तोडिलीं बाळें । कीं वज्रघायीं चूर्ण कपाळें । कीं अग्नींत पडलीं मुक्ताफळें । तैसें वाटलें भरतातें ॥६२॥ श्रीराम गेला वनांतरीं । जरी मी येथें राज्य करीं । तरी जितुके ब्राह्मण पृथ्वीवरी । म्यां वधिले स्वहस्तें ॥६३॥ जगद्वंद्यास वनीं सांडोन । जरी मी अंगीकारीं राज्यासन । विगतधवा जे जारीण । तिचें गर्भस्थळ मी पावें ॥६४॥ रजस्वलेच्या शोणितासमान । राज्याभिषेकाचें उदक पूर्ण । मी आपुल्या उदरीं शस्त्र घालीन । राज्यासन घ्या म्हणतां ॥६५॥ ज्यासी मृडानीवर[१] ध्याई मनीं । ज्याची अयोध्या राजधानी । ते मी भोगितांचि ये क्षणीं । महाचांडाळ जाहलों ॥६६॥ रघुवीर सांडोन काननीं । जरी मी भोगीन राजधानी । तरी जिव्हा जावो झडोनी । कीटक पडोत तत्काळ ॥६७॥ वनीं सांडोनि जगन्मोहन । जरी मी घेईन राज्यासन । तरी गुरुवध मद्यपान । मातृगमन घडे मज ॥६८॥ कलंक लागेल वासरमणी । पाप प्रवेशेल गंगाजीवनीं । मृगजळीं घटोद्भवमुनी[२] । जरी बुडोन जाईल ॥६९॥ मित्रकिरणाचियावरी[३] । चढती मुंगियांच्या हारी । कीं वडवानळाचे शिरीं । नृत्य करी पतंग ॥१७०॥ कीं ऊर्णनाभीच्या[४] तंतुसूत्रीं[५] । जरी उचलेल धरित्री । कीं तृणपाशें[६] महाकेसरी । जरी गुंतोन पडेल ॥७१॥ कीं मही उचलेल मशका । जरी सुपर्णासी बाधेल अळिका[७] । कीं दृष्टीं देखतां दीपका । मृगांक खालीं पडेल ॥७२॥ जरी हें घडेल ब्रह्मनंदना । तरी मज होईल राज्यवासना । ऐकोनि भरताच्या वचना । वसिष्ठ जाहला सद्गद ॥७३॥ अहो तें भरताचें वचन । वैराग्यवल्लीचें सुमन । कीं विवेकनभींचे उडुगण[८] । प्रेमतेजें झळकत ॥७४॥ कीं तें भक्तिपंथींचें सरोवर । कीं निश्चयभावाचें[९] दिव्य नगर । कीं तें विश्रांतीचें मंदिर । वचनरूप प्रत्यक्ष ॥७५॥ असो तो कैकयीनंदन । म्हणे स्वामी शिवतों तुझे चरण । श्रीरघुवीराची मज आण । राज्याभिषेक करूं नेदीं ॥७६॥ कैकयीचें काळें वदन । माता नव्हे ते लांव पूर्ण । तीस आवडे रांडपण । पतीचा प्राण घेतला ॥७७॥ मग वसिष्ठें जें जें चिंतिलें । तें तें भरतासी निवेदिलें । मंथरा दासीचे बोलें । कार्य नासलें सर्वही ॥७८॥ कलहकल्लोळसरिता[१०] । ते ही मंथरा दासी तत्त्वतां। कुबुद्धि शिकवूनि तुझी माता । इनेंचि पाहें पां बोधिली ॥७९॥ ऐसी ऐकतांचि मात । वेगें धांवे वीर भरत । मंथरेसी वेणी अकस्मात । धरूनि शस्त्र काढिलें ॥१८०॥ मग धांवोनि ब्रह्मसुत[११] । भरताचा धरिला हात । म्हणे स्त्री वधितां पाप अद्भुत । कदा विपरीत करूं नको ॥८१॥ मग लत्ताप्रहारेंकरूनी[१२] । भरतें ताडिलें तियेलागूनि । त्रिवक्र कुब्जा तेथूनि । नाम तियेसी जाहलें ॥८२॥ असो ब्रह्मपुत्रें तये क्षणीं । रामपादुका सिंहासनीं । मणिमय जडित दिव्यरत्नीं । सिंहासनीं स्थापिल्या ॥८३॥ त्यांवरी छत्र धरून । मग राजदेह उचलोन । अग्निमुखीं समर्पून । उत्तरकर्म भरत करी ॥८४॥ सप्तशत रायाच्या युवती । अग्निप्रवेश तत्काळ करिती । जैसीं सूर्यकिरणें सामावती । सूर्यासरसीं अस्तमानीं ॥८५॥ सुमित्रा आणि कौसल्या । प्राण द्यावया सिद्ध जाहल्या । मग त्या वसिष्ठें वर्जिल्या । शास्त्रप्रमाण रीतीनें ॥८६॥ पुत्रवंत्या स्त्रिया विशेष । त्यांही न करावा अग्निप्रवेश । तों कौसल्या म्हणे आम्हांस । कशास व्यर्थ ठेवितां ॥८७॥ वनास गेला रघुनाथ । परत्र[१३] पावला दशरथ । आतां काय वांचूनि व्यर्थ । काया अग्नींत निक्षेपूं ॥८८॥ मग वसिष्ठ सांगे वाहूनि आण । तुम्हांस श्रीराम भेटवीन । मग वनासी करील गमन । पुढतीं आगमन करील पैं ॥८९॥ निवटोन[१४] असुर समस्त । अयोध्येसी येईल रघुनाथ । हा वाल्मीकीचा मूळ काव्यार्थ । माना यथार्थ सर्वही ॥१९०॥

---

१. श्रीमहादेव २. अगस्ती ऋषी ३. रविकिरणांवर ४. कोळ्याच्या ५. जाळ्याच्या धाग्यावर ६. गवताच्या जाळ्यात ७. अळी ८. नक्षत्रे ९. दृढनिश्चयरूपी १०. झगडे भांडणे ह्याच लाटा जिच्यांतील अशी नदी ११. वसिष्ठ ऋषींनी १२. लाथा मारून १३. परलोकांत ऋषींनी १४. मारून

गुरुवचन मानूनि प्रमाण । चित्रकूटीं भेटेल रघुनंदन । अग्निप्रवेश म्हणून । वर्ज केला ते काळीं ॥९१॥ असो रात्र जाहली दोन प्रहर । कैकयी येऊन सत्वर । भरतासी एकांत विचार । सांगे कैसा ऐका तें ॥९२॥ म्हणे पुत्रा ऐक वहिलें । संकटीं म्यां राज्य साधिलें । रामासी वनवासा पाठविलें । नानायत्नेंकरूनियां ॥९३॥ वना गेले रामलक्ष्मण । हें तूं मानीं परम कल्याण । सत्वर घेईं छत्रसिंहासन । कांहीं अनमान करूं नको ॥९४॥ पितृवचन करावया प्रमाण । वनास गेला रघुनंदन । त्या शोकास्तव राव पावला मरण । हेंही जाण बरें जाहलें ॥९५॥ सापत्नबंधु राम निर्धारें। त्यासी वंचन करितां बरें । देव दैत्य दायाद[1] वैरें । अद्यापिही वर्तती ॥९६॥ गरुड सर्प सापत्न[2] । वैरें वर्तती दोघेजण । जरी तूं होसी माझा नंदन । तरी वचन पाळीं हें ॥९७॥ भरतें ऐकतांचि तिची वाणी । म्हणे उठें येथोनि चांडाळिणी । तुझा वध केला असता ये क्षणीं । परी माता म्हणोनि रक्षिली ॥९८॥ परम निर्दय तूं पापीण । अमंगळ तूं लांव पूर्ण । घेतला दशरथाचा प्राण । जानकीजीवन धाडिला वना ॥९९॥ तूं सर्पीण होसी यथार्थ । डंखोनि मारिला दशरथ । माझा सखा रघुनाथ । दूर वनासी धाडिला ॥२००॥ पिता बंधु दोघेजण । गेले ज्या पंथेंकरून । त्या मार्गें मीही जाईन । ऊठ येथूनि पापरूपे ॥१॥ असो कैकयी गेली उठोन । तों उदय पावला चंडकिरण । भरतें वल्कलें वेष्टून । भस्म लाविलें सर्वांगी ॥२॥ सर्व अलंकार त्यागून । वटदुग्धीं[3] जटा वळून । वनाप्रति कैकयीनंदन । चरणचालीं चालिला ॥३॥ षोडशपद्में दळभार । नगरलोक निघाले सत्वर । ओस पडिलें अयोध्यापुर । जीवमात्र चालिले ॥४॥ कौसल्या सुमित्रा दोघीजणी । शिबिकेंत बैसल्या ते क्षणीं । वरी वस्त्रावरण घालुनी । वाहनासहित झांकिल्या ॥५॥ वसिष्ठादि सकळ ब्राह्मण । सवें निघाले चाऱ्ही वर्ण । अयोध्येंत कैकयीवांचून । नाहीं कोणी राहिलें ॥६॥ जन म्हणती ओस नगर । कैकयीचें वपन करूनि सत्वर । तिजवरी धरावे छत्र । परम अपवित्र पापिणी ॥७॥ तिचे पोटीं भरत जन्मला । जैसा कागविष्ठेंत[4] अश्वत्थ[5] प्रकटला । कीं कागिणीपोटीं कोकिळा । निपजे अवचिता जैसी कां ॥८॥ असो भरत म्हणे सुमंतातें । रघुवीर गेला कोण्या पंथें । तोच मार्ग दावीं आम्हांतें । तुझें अनुमतें चालूं आम्ही ॥९॥ मग भरतसमवेत दळभार । गुहकाश्रमा पावले सत्वर । वाजत वाद्यांचे गजर । नादें अंबर कोंदलें ॥२१०॥ गुहक विलोकी दुरून । म्हणे मातेनें धाडिले दोघेजण । दळभार सिद्ध करून । रामलक्ष्मण वधावया ॥११॥ मग सहस्रांचे सहस्र किरात । गुहकें मेळविले समस्त । धनुष्य ओढोनियां त्वरित । जान्हवीतीर बळकाविलें ॥१२॥ भरतासी सांगती सेवक । संग्रामासी सिद्ध जाहला गुहक । जन्हुकुमरीचें[6] उदक । स्पर्शों न देती कोणातें ॥१३॥ मग शत्रुघ्न आणि दळपती[7] । भरतासंगें विचार करिती । म्हणती आज्ञा द्यावी निश्चितीं । शिक्षा लावूं तयांतें ॥१४॥ भरत म्हणे गुहक रामभक्त । म्यां ऐकिला होता वृत्तांत । तरी समाचार न घेतां यथार्थ । युद्ध त्यासीं न करावें ॥१५॥ मग भरत पुढें होऊन । गुहकाप्रती बोले वचन । त्वां युद्ध आरंभिलें निर्वाण । काय कारण सांग तें ॥१६॥ गुहक म्हणे घेऊन दळभार । वधावया जातोसी रघुवीर । तरी मी श्रीरामोपासक निर्धार । वेंचीन प्राण स्वामिकाजीं[8] ॥१७॥ माझा स्वामी रघुनंदन । निराहार[9] वनीं निर्वाण । तुम्ही मारावया दोघेजण । दळभारेंसी[10] चालिलां ॥१८॥ परम निंदक दुर्जन खळ[11] । जे रघुनाथद्वेषी चांडाळ । त्यांची शिरें छेदोनि तत्काळ । पाठवीन यमलोका ॥१९॥

१. भाऊबंद २. सावत्र ३. वडाच्या चिकाने ४. कावळ्याच्या विष्ठेत ५. पिंपळ ६. गंगेचे ७. सेनापती ८. स्वामीच्या कार्यार्थ ९. उपवासी १०. सेनेसहित ११. दुष्ट

मातेच्या बोलेंकरूनि । श्रीराम वधूं पाहसी वनीं । तरी तुम्हांस जान्हवीचें पाणी । स्पर्शो नेदीं अणुमात्र ।।२२०।। ऐकतां गुहकाचें वचन । भरतासी आलें दीर्घ रुदन । गुहकास म्हणे सोडूनि बाण । माझें शिर छेदोनि टाकीं ।।२१।। मज पापियाचा देह त्वरित । गुहका छेदीं यथार्थ । कैकयीनें केला अनर्थ । सीताकांत धाडिला वना ।।२२।। जन्मलों कैकयीचे उदरीं । जन म्हणती हा रामचंद्राचा वैरी । तरी गुहका आतां वेग करीं । छेदीं झडकरी देह माझा ।।२३।। श्रीरामवियोगाचें दुःख । मज न सोसवेचि अणुमात्र देख । निर्वाणबाण[1] सोडोनि एक । मज रघुनायकपद दावीं तूं ।।२४।। भरताचें अंतर ओळखून । गुहक धांवोनि धरी चरण । दोघांसी पडिलें आलिंगन । गेले विसरून देहभाव ।।२५।। कंठ दाटला दोघांचा । उभारणी जाहली रोमांचा । दोघांचे नेत्रीं अश्रुधारांचा । पूर पडत ते काळीं ।।२६।। दोघेही श्रीरामाचे भक्त । दोघेही योगी विरक्त । दोघेही श्रीरामास आवडत । वल्कलें वेष्टित दोघेही ।।२७।। दोघांहीं केलें भस्मोद्धूलन[2] । दोघांही केलें जटावलण[3] । दोघेही न घेती अन्न । रामदर्शनावांचोनि ।।२८।। गुहक म्हणे भरता वसिष्ठा । श्रीराम गेला चित्रकूटा । आतां चला जी उठा उठा । वेगीं भेटा राघवातें ।।२९।। ऐकतां गुहकाचें वचन । भरत धरूं धावे चरण । गुहक घाली लोटांगण । प्रेमेंकरून सद्गद ।।२३०।। भरतें स्नानसंध्या सारून । गुहकासी म्हणे प्रीतीकरून । श्रीराम राहिला एक दिन । तें स्थळ मज दाविजे ।।३१।। गुहक म्हणे न्यग्रोधवृक्ष । त्याखालीं राहिला कमलपत्राक्ष[4] । जयासी हृदयीं ध्यात विरूपाक्ष[5] । सहस्राक्ष[6] शरण जयातें ।।३२।। या तृणसेजेवरी जाण । पद्मनयनें केलें शयन । याच पंथें येऊन । केलें स्नान जान्हवीचें ।।३३।। सीतेच्या तगटवस्त्रांचे रज । ते न झगटती तृणसेज । देखतां भरत भक्तराज । साष्टांग नमन करीतसे ।।३४।। रघुनाथपदमुद्रा[7] तेथ । उमटल्या देखोनि भरत । ते धुळी कपाळा लावीत । सद्गदित होवोनि ।।३५।। असो नौका आणोनि सहस्र । उतरला सकळ दळभार । प्रयागासी येऊन सत्वर । भरद्वाजदर्शन घेतलें ।।३६।। लक्षोनि चित्रकूटाचा पंथ । चालती गुहक आणि भरत । तों फळें वेंचावया सुमित्रासुत । पर्वततातळीं उतरला ।।३७।। तों पर्णकुटीमाजी रघुनंदन । करावया बैसला हवन । तेथें उपसामग्री आणोन । जनकात्मजा[8] देतसे ।।३८।। चकोरमुखीं एकसरा । अत्रिसुत सोडी अमृतधारा । तैशा आहुती घाली वैश्वानरा । तृप्त होय रामहस्तें ।।३९।। तेव्हां आश्रमाबाहेर जनकबाळी । जे सुकुमार चंपककळी । तों सुदर्शनगंधर्वे जातां निराळीं । ते वेल्हाळी देखिली ।।२४०।। जानकी देखोनि सुंदर । चित्तीं जाहला कामातुर । भय लज्जा समग्र । सोडोनियां दिधली ।।४१।। मंगळरूप ते मंगळभगिनी । गंधर्व धांवला ते क्षणीं । अमंगळ कागरूप धरूनी । सीतेलागी झडपीतसे ।।४२।। जैसा पतंग दीप देखोन । उडी घाली विसरून मरण । कीं खदिरांगारासी वृश्चिक येऊन । पुच्छेकरून ताडी जेवीं ।।४३।। कीं अंतर्गृहींचे दिव्यान्न । स्पर्शो धांवे जैसे श्वान । यज्ञशाळेमाजी मळिण । अंत्यज जैसा पातला ।।४४।। असो जानकीचें स्तनयुग । धरूं पाहे पतित काग । जगन्माता धांवली सवेग । अंग घाली धरणीतें ।।४५।। मग म्हणे धांव धांव रघुराया । कागें विटंबिली माझी काया । आक्रंदे परम जनकतनया । रघुवर्या जाणवलें ।।४६।। आहुती टाकी रघुनाथ । जवळी नाहीं सुमित्रासुत । मग दर्भ मंत्रोनि त्वरित । रामचंद्रे प्रेरिला ।।४७।।

---

१. प्राण हरण करणारा बाण २. भस्म फासले ३. जटा वळल्या ४. श्रीराम ५. श्रीशिव ६. इंद्र ७. रामाच्या पावलांच्या खुणा ८. सीता

कल्पांतविजेसमान[1]। कागें दर्भ देखिला दुरून । पळों लागला घेतलें रान । पाठिसी बाण लागला असे ॥४८॥ गंधर्व भ्रमे सकळ सृष्टी । परी कोणी न घाली तया पाठीं । हिंडतां जाहला हिंपुटी । होय कष्टी दुरात्मा ॥४९॥ इंद्रादिक देवगण । समस्तांसी गेला शरण । ते म्हणती न दाखवीं वदन । दुष्टा होईं माघारा ॥२५०॥ मग भेटला नारद मुनी । काग लागला तयाचे चरणीं । म्हणे पहा हो या त्रिभुवनीं । ठाव नेदी कोणी मज ॥५१॥ माझी पाठ न सोडी बाण । मग नारद बोले वचन । मूढा रामासी जाईं शरण । तोचि मरण चुकवील ॥५२॥ मग म्हणे जगद्वंद्या रामचंद्रा । मी तुज शरण कृपासागरा[2]। दीनरक्षका[3] अतिउदारा । मज पामरा न मारावें ॥५३॥ मजवरी टाकिला बाण । हें लोकांत न दिसे थोरपण । कमळावरी वज्र घेऊन । घातल्या काय पुरुषार्थ ॥५४॥ सूक्ष्म आलिका[4] धरी सुपर्ण । वडवानळ जाळी तृण । भोगींद्र उचली सुमन । हें काय अपूर्व बोलावें ॥५५॥ पर्जन्यें उठलें तृण । अगस्ति प्याला किंचित जीवन । मेघें निजप्रतापेंकरून । घटीं जीवन भरियेलें ॥५६॥ सूर्ये दीपतेज झांकिलें । गोवत्स[5] विदारिला शार्दूलें[6] । रघुपति त्वां मज तैसें मारिलें । तरी थोरपण प्रकटेना ॥५७॥ मातेचिया स्तनावरी । बाळक हस्त ठेवूनि क्रीडा करी । तरी काय माता जीवें मारी । बाळकातें सांग पां ॥५८॥ महाराज रविकुळभूषणा । ताटिकांतका अहल्योद्धरणा । द्विपंचमुखदर्पहरणा[7]। शरणागता न मारावें ॥५९॥ मग बोले रघुपती । माझा बाण असत्य कल्पांतीं । नव्हेचि जाण निश्चितीं । महामलिना अपवित्रा ॥२६०॥ मग बाणासी आज्ञापी रघुनंदन । याचा रक्षोनियां प्राण । वेगें छेदावा सव्य नयन । शिक्षा यास जाण पैं ॥६१॥ न लागतां पातया[8] पातें[8] । दर्भें छेदिलें नयनातें । काग म्हणे रघूत्तमातें । देई वरातें मज कांहीं ॥६२॥ मग दोहींकडे एक बुबुळ । खेळ ऐसें केलें चंचळ । काकदृष्टी अवघ्यांत चपळ । जन सकळ देखती ॥६३॥ सीतेसी द्यावया चुंबन । तूं धांवलासी दुरात्मा पूर्ण । तरी तूं करिसी विष्ठाभक्षण । कनिष्ठ जाण पक्ष्यांत तूं ॥६४॥ तुज वर एक देतों जाण । प्रेतपिंड[9] तूं भक्षिल्याविण । सर्वथा नोहे उद्धरण । हें वरदान तुज दिधले ॥६५॥ मग सुदर्शन गंधर्व तेव्हां । साष्टांग नमोनि श्रीराघवा । आपले स्वस्थळाप्रति तेधवां । जाता जाहला आनंदें ॥६६॥ भरत प्राणसखा आतां । येऊनि भेटेल रघुनाथा । श्रोतीं परिसावी तेचि कथा । भवव्यथा नासे जेणें ॥६७॥ रामविजय ग्रंथ प्रचंड । रसभरित अयोध्याकांड । तें श्रवण करितां वितंड । विघ्नें उदंड वितळती ॥६८॥ अयोध्याधीशा रामचंद्रा । ब्रह्मानंदा ज्ञानसमुद्रा । श्रीधरवरदा प्रतापरुद्रा । मज नाममुद्रा अखंड देईं ॥२६९॥ स्वस्ति श्रीरामविजय ग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत भक्त चतुर । एकादशाध्याय गोड हा ॥२७०॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ओव्या २७० ॥

**॥ अध्याय अकरावा समाप्त॥**

---

१. कल्पांतीच्या विजेसारखा तेजस्वी २. कृपाळू श्रीरामा ३. दुःखितांच्या रक्षका श्रीरामा ४. अळी ५. वासरू ६. सिंहाने ७. रावणाचा गर्व नष्ट करणाऱ्या ८. चटकन ९. प्रेताच्या पिंडाला कावळा शिवला तरच मृताला सद्गती लाभते

## ॥ अध्याय बारावा ॥

# श्रीराम-भरत भेट

॥ श्रीगणेशाय नमः॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः। संतमंडळी बैसली थोर । बृहस्पतीऐसी चतुर । आतां साहित्यसुमनांचे[१] हार । गुंफोन गळां घालूं त्यांचे ॥१॥ अनर्घ्य शब्दरत्नें प्रकाशवंत । त्यांचे ग्राहक चतुर पंडित । विशेषें रघुनाथभक्त विरक्त । ते प्रेमभरें डुल्लती ॥२॥ मतिमंद बैसतां श्रोता श्रवणीं । तरी ग्रंथरस जाय वितळोनी । जैसें भस्मामाजी नेउनी । व्यर्थ अवदान घालिजे ॥३॥ रत्नपरीक्षा करिती चतुर । तेथें गर्भांध[२] विटे साचार । गायन ऐकती सज्ञान नर । परी बधिर तेथें विटती पैं ॥४॥ कमळसुवास सेविती भ्रमर । परी तो स्वाद न जाणे दर्दुर[३] । हंस घेती मुक्तांचा चार । परी तो बकांसि प्राप्त नाहीं ॥५॥ दुग्ध दोहोनि नेती इतर । गोचिड तेथें अहोरात्र । परी प्राप्त त्यास रुधिर । नेणे क्षीर मतिमंद तो ॥६॥ कीं वसंतकाळीं कोकिळा । पंचमस्वरें आळविती रसाळा । काकजाती तैशा सकळा । परी तयां तो स्वर नव्हेचि ॥७॥ बलाहक[४] गर्जना करिती गगनीं । मयूर नाचती पिच्छें पसरूनी । परी ते कळा वृषभांनी । नेणिजे जैसी सर्वथा ॥८॥ चकोर चंद्रामृत सेविती । परी ते कळा कुक्कुट नेणती । म्हणोनि श्रोता मंदमती । सहसाही न भेटावा ॥९॥ श्रोता भेटलिया चतुर । ग्रंथरस वाढे अपार । जेवीं वीर संघटतां थोर । रणचक्रीं रंग भरे ॥१०॥ असो एकादशाध्यायाचे अंतीं । चित्रकूटीं राहिला रघुपती । सुदर्शन गंधर्व निश्चितीं । काकरूपी उद्धरिला ॥११॥ उपरी सिंहावलोकनें करूनि तत्त्वतां । श्रोतीं परिसावी मागील कथा । दळभारेंसी भरत तत्त्वतां । चित्रकूटासमीप आला ॥१२॥ तंव तो भूधरअवतार[५] । चित्रकूटाखालीं सौमित्र । फळें वेंचितां तो दळभार । गजरें येतां देखिला ॥१३॥ ओळखिला आपला ध्वजसंकेत[६] । आले कळलें शत्रुघ्न भरत । म्हणे कैकयीनें पाठविले यथार्थ । वनीं रघुनाथ वधावया ॥१४॥ हे युद्धासी आले येथ । जरी रघुनाथा करूं श्रुत । तरी हेही गोष्ट अनुचित । युद्ध अद्‌भुत करीन मी ॥१५॥ माझा श्रीराम एकला वनीं । हे आले दळभार सिद्ध करूनी । तरी जैसा वणवा लागे वनीं । तैसें जाळीन सैन्य हें ॥१६॥ रवीच्या किरणांवरी देखा । कैशा चढतील पिपीलिका । कल्पांतविजूस मशक मुखा- । माजी केवीं सांठवील ॥१७॥ चढून प्रळयाग्नीचे शिरीं । पन्नग[७] कैसा नृत्य करी । ऊर्णनाभीचे तंतूभीतरीं । वारण कैसा बांधवेल ॥१८॥ तृणपाशेंकरून[८] । कैसा बांधवे पंचानन । द्विजेंद्रासी अळिका धरून । कैसी नेईल आकाशीं ॥१९॥ दीपाचें तेज देखोन । कैसा आहाळेल चंडकिरण । तैसा मी वीर लक्ष्मण । मज जिंकू न शकती हे ॥२०॥ भार देखोनि समीप । क्षण न लागतां चढविलें चाप । बाण सोडिले अमूप । संख्येरहित ते काळीं ॥२१॥ वाटे गडगडितां[९] महाव्याघ्र । थोकती[१०] जेवीं अजांचे भार । तैसा सोळा पद्में दळभार । भयभीत जाहला ॥२२॥ त्या बाणांचें करावया निवारण । वीर सरसावला शत्रुघ्न । दोघांचें समसमान संधान[११] । बाणें बाण तोडिती ॥२३॥ एक चंद्र एक मित्र[१२] । कीं रमावर[१३] आणि उमावर[१४] । किंवा ते मेरुमंदार । युद्धालागीं मिसळले ॥२४॥

---

१. ललितसाहित्यरूपी फुलांच्या माळा २. जन्मापासून आंधळा ३. बेडूक ४. ढग ५. शेषाचा अवतार लक्ष्मण ६. ध्वजाच्या खुणेवरून ७. साप ८. गवताचा फास करून ९. गर्जना करताच १०. थबकतात ११. अचूक निशाण १२. सूर्य १३. श्रीविष्णू १४. श्रीमहादेव

एक समुद्र एक निराळ[१] । एक दावाग्नि एक वडवानळ । एक गदा एक चक्र निर्मळ । विष्णुआयुधें भिडती कीं ॥२५॥ एक वासुकी एक भोगींद्र । एक वसिष्ठ एक विश्वामित्र । तैसे शत्रुघ्न आणि सौमित्र । बाण सोडित परस्परें ॥२६॥ एकावरी एक सोडिती बाण । ते वरचेवरी उडविती संपूर्ण । बाणमंडप जाहला सघन । चंडकिरण न दिसेचि ॥२७॥ रामनामबीजांकित[२] । बाण सुटती सतेज मंडित । रघुनाथनाम गर्जत । सुसाटे निघत येतांचि ॥२८॥ वाटे ओढवला प्रळयकाळ । वनचरां सर्वां सुटला पळ । ऋषीश्वर पळती सकळ । कडे वेंघिती पर्वताचे ॥२९॥ सांडोनि गुंफा तपश्चरण । पळती आपुला जीव घेऊन । एक धांवतां धापा दाटून । मूर्च्छा येऊनि पडियेले ॥३०॥ एक म्हणती राक्षसदळ । आलें रामावरी तुंबळ । येणें मखरक्षणीं[३] राक्षस सबळ । वीस कोटी निवटिले ॥३१॥ तें वैर स्मरोनि अंतरीं । सत्य हे आले राघवावरी । आतां सौमित्रीची कैंची उरी । अनर्थ निर्धारीं ओढवला ॥३२॥ असो ऋषीश्वर समस्त । आले जेथें रघुनाथ । गोष्टी सांगतां बोबडी वळत । संकेत दाविती एक करें ॥३३॥ एक रुदन करूनि फोडिती हांका । वेगें पळवीं जनककन्यका । आतां गूढविवरीं[४] लपवीं कां । रघुनायका ऊठ वेगीं ॥३४॥ न भरे जों अर्ध निमिष । तों चढविलें श्रीरामें धनुष्य । जैसा उगवला चंडांश । गुंफेबाहेर तैसा आला ॥३५॥ ऋषींस म्हणे अयोध्यानाथ । तुम्ही मनीं न व्हावें दुश्चित । काळही विघ्न करूं आलिया येथ । खंडविखंड करीन बाणीं ॥३६॥ पडत्या आकाशा देईन धीर । रसातळा ऊर्वी[५] जातां करीन स्थिर । तुम्ही समस्त बैसा धरूनि धीर । तपश्चर्या करीत पैं ॥३७॥ अथवा करावें अध्ययन । न्याय मीमांसा सांख्यज्ञान । पातंजल अथवा व्याकरण । यांची चर्चा करावी ॥३८॥ असो पाठीसीं घालून ब्राह्मण । पुढें चालिला रघुनंदन । तों ध्वजचिन्हें ओळखिलीं पूर्ण । शत्रुघ्न बाण टाकीतसे ॥३९॥ आपले भेटीकारणें उत्कंठित । सद्गद जाहला भरत । लक्ष्मणापाशीं सीतानाथ । क्षण न लागतां पातला ॥४०॥ मग म्हणे सौमित्रीसी । बा रे भरत आला भेटीसी । तूं किमर्थ यासीं युद्ध करिसी । पाहें मानसीं विचारूनि ॥४१॥ ऐसें बोलतां राजीवनेत्र । परी वीरश्रियेनें वेष्टिला सौमित्र । सोडितां न राहे[६] शर । मग रघुवीर काय करी ॥४२॥ हातींचें धनुष्य हिरूनी । श्रीरामें घेतलें तये क्षणीं । सौमित्रि लागला श्रीरामचरणीं । हास्यवदन करूनियां ॥४३॥ श्रीरामें वारितां फणिपाळ[७] । अवघें वितळलें बाणजाळ । जैसें निजज्ञान ठसतां केवळ । मायापडळ[८] जेवीं विरे ॥४४॥ भरतासहित अयोध्येचे जन । सर्वीं विलोकिला रघुनंदन । जैसा निशा संपतां चंडकिरण । उदयाचळीं विराजे ॥४५॥ तों भरतासी न धरवे धीर । सप्रेम धांव घेतली सत्वर । वाटेसी साष्टांग नमस्कार । वारंवार घालीतसे ॥४६॥ कीं बहुत दिवस माता गेली । ते बाळकें समीप देखिली । कीं गाय वनींहूनि परतली । वत्सें आटोपिली धांवूनियां ॥४७॥ कीं क्षीराब्धि देखोनि त्वरित । धांव घेत क्षुधाक्रांत । कीं मृगजळ देखोनि त्वरित । मृग धांवती उष्णकाळीं ॥४८॥ कीं सफळ देखोनि दिव्य द्रुम । झेंपावे जैसा विहंगम । भरतें धरूनि तैसा राम । चरणसरोजीं[९] स्पर्शिला ॥४९॥ जैसें लोभियाचें जीवित्व धन । तैसे भरतें धरिले दृढ चरण । नयनोदकेंकरून[१०] । केलें क्षालन रामपायां ॥५०॥ मग उचलोनियां दोहीं करीं । बंधूसी आदरें हृदयीं धरी । जैसा जयंतपुत्र सहस्रनेत्रीं[११] । प्रीतीकरूनि आलिंगिला ॥५१॥

१. आकाश २. रामनाम ज्यांवर कोरलेले आहे असे ३. विश्वामित्रांच्या यज्ञाचे रक्षण करताना ४. गुप्तस्थानी ५. पृथ्वी ६. थांबत नव्हता ७. लक्ष्मण ८. मायेचा पडदा ९. चरणरूपी कमळाला १०. अश्रूंनी ११. इंद्राने

कीं क्षीरसागरीं लहरिया उठती । त्या एकांत एक मिसळती । कीं वेदांतशास्त्रीं श्रुती । ऐक्या येती परस्परें ॥५२॥ तैसा आलिंगिला भरत । तों शत्रुघ्न लोटांगण घालित । परम प्रीतीनें रघुनाथ । आलिंगन देत तयातें ॥५३॥ सकळ अयोध्येचे ब्राह्मण । रामासी भेटती प्रीतीकरून । सर्व दळभार प्रजाजन । करिती नमन रामासी ॥५४॥ लक्ष्मण भरत शत्रुघ्न । परस्परें देती क्षेमालिंगन । मग सुमंत प्रधानें येऊन । श्रीरामचरण वंदिले ॥५५॥ मग सुमंत म्हणे रघुराया । पैल वसिष्ठ आणि दोघी माया[1] । तंव त्या दशरथकुळवर्या[2] । धीर न धरवे ते काळीं ॥५६॥ सामोरा चालिला रघुनंदन । भोंवते अपार अयोध्याजन । जैसा कां वेदोनारायण । अनेक श्रुतीं वेष्टिला ॥५७॥ येऊनियां वसिष्ठाजवळी । रामें गुरुचरण वंदिले भाळीं । जैसा मदनदहनाचे[3] चरणकमळीं । स्कंद ठेवी मस्तक ॥५८॥ तों कौसल्या सुमित्रा माता । त्यांची वाहनें जवळी देखतां । धांवूनि येतां रामसुमित्रासुतां । उतरती खालत्या दोघीजणी ॥५९॥ कौसल्येचे चरणीं मस्तक । ठेवूनि बोले रघुनायक । म्हणे सुखी कीं मम जनक । श्रीदशरथ दयाब्धि ॥६०॥ तों जाहला एकचि कल्लोळ । रुदन करिती लोक समग्र । सुमित्राकौसल्येसी बहुसाल । नाहीं पार तयातें ॥६१॥ वसिष्ठ म्हणे रघुनाथा । तुझा वियोग न साहे दशरथा । रामराम म्हणतां मोक्षपंथा[4] । गेला तत्काळ जाण पां ॥६२॥ वचन ऐसें ऐकतां कानीं । करुणासागर मोक्षदानी । विमलांबुधारा[5] नयनीं । तेच क्षणीं चालिल्या ॥६३॥ स्फुंदस्फुंदोनि विलाप थोर । पितयालागीं करी रघुवीर । म्हणे पूर्ण सत्याचा सागर । श्रीदशरथ वीर जो ॥६४॥ ज्याचे युद्धाची ठेव[6] । पाहती मानव इंद्रादि देव । वृषपर्वा शुक्रादि सर्व । दैत्य युद्धीं जिंकिले ॥६५॥ श्रोते म्हणती नवल एथ । जो पुराणपुरुष रघुनाथ । तो शोकार्णवीं पडिला ही मात । असंगत[7] दिसतसे ॥६६॥ जो जगद्वंद्य आत्माराम । जो विश्वबीजफलांकित[8] द्रुम । तो शोकाकुलित परब्रह्म । पितयालागीं कां जाहला ॥६७॥ विषकंठ[9] आला कीं क्षीरसागरा । उष्णता व्यापिली रोहिणीवरा । पक्षिवर्या त्या खगेंद्रा । सर्पबाधा केवीं जाहाली ॥६८॥ चिंतामणि दरिद्रें व्यापिला । कल्पवृक्ष केवीं निष्फळ जाहला । प्रळयाग्नीचे डोळां । अंधत्व केवीं पातलें ॥६९॥तंव वक्ता देत प्रत्युत्तर । श्रोतीं ऐकिजे सादर । पूर्ण ब्रह्मानंद रघुवीर । मानवलोकीं अवतरला ॥७०॥ जगद्गुरु देवाधिदेव । दावी मायेचें लाघव । अवतारकारणाची ठेव । लौकिकभाव दाविला ॥७१॥ नट जो जो धरी वेष । त्याची संपादणी करी विशेष । यालागीं जगदात्मा आदिपुरुष । दाखवी आवेश मायेचा ॥७२॥ ऐसी उघडतां शब्दरत्नमांदुस[10] । गुणग्राहक श्रोते पावले संतोष । संदेहरहित नि:शेष । जेवीं तम नासे सूर्योदयीं ॥७३॥ कीं वैराग्यें निरसे काम । ज्ञानें वितळे जेवीं भ्रम । जैसा निधानांतूनि[11] परम । दारुण सर्प निघाला ॥७४॥ करितां संशयाचें निरसन । मागें राहिलें अनुसंधान । तरी हे गोष्टीस दूषण । सर्वथाही न ठेवावें ॥७५॥ ग्रासामाजी लागला हरळ । तो काढावया लागेल वेळ । कीं अनध्यायामाजी[12] रसाळ । वेदाध्ययन राहिलें ॥७६॥ चोरवाटा चुकवावया पूर्ण । अधिक लागला एक दिन । तरी ते गोष्टींतें दूषण । कदा सज्ञान न ठेविती ॥७७॥ रात्रीमाजी सत्कर्में राहती । परी सूर्योदयीं सर्वेंचि चालती । छायेस पांथिक[13] बैसती । सवेंच जाती निजमार्गें ॥७८॥

१. माता २. श्रीरामाला ३. श्रीशंकराच्या ४. मोक्षधामास ५. अश्रुधारा ६. पद्धत ७. न जुळणारे ८. विश्व हेच ज्याचे फल आहे असा वृक्ष (आदिपुरुष श्रीराम) ९. महादेव १०. शब्दरूपी रत्नांची पेटी ११. गुप्त धनातून १२. अभ्यासाला सुटी असते त्या दिवशी १३. वाटसरू

समुद्राचें भरतें ओहटे । सवेंच मागुतीं विशेष दाटे । कीं चपळ तुरंग[१] चपेटे[२] । विसांवा घेऊनि मागुती ।।७९।। तेवीं परिसा पुढील कथार्थ । आठवोनि पिता दशरथ । शोकाकुलित जनकजामात[३] । क्षण एक जाहला ।।८०।। मग वसिष्ठ म्हणे श्रीरामा । प्रयागाप्रति जाऊनि गुणग्रामा । उत्तरक्रिया करूनि निजधामा। दशरथासी बोळविजे ।।८१।। कित्येक प्राकृत कवि बोलत । कीं पतनीं पडिला दशरथ । परी हे गोष्टी असंमत । बोलतां अनर्थ वाचेसी ।।८२।। जयाचें नाम घेतां आवडीं । जीव उद्धरले लक्षकोडी । तो आपला पिता पतनीं पाडी । काळत्रयीं न घडे हें ।।८३।। असो गयेप्रति येऊन । उत्तरक्रिया सर्व सारून । पिता निजपदीं स्थापून । आले परतोनि चित्रकूटा ।।८४।। सकळ ऋषी आणि अयोध्याजन । बैसले श्रीरामासी वेष्टून । मग भरत घालोनि लोटांगण । कर जोडूनि उभा ठाकला ।।८५।। म्हणे जयजयाजी पुरुषोत्तमा । मायाचक्रचालका पूर्णब्रह्मा । विरिंचिजनका सुखविश्रामा । मंगलधामा रघुराया ।।८६।। हे राम करुणासमुद्रा। हे रविकुलभूषणा राघवेंद्रा । सर्वानंदसदना[४] रामचंद्रा । प्रतापरुद्रा जगद्गुरो ।।८७।। हे रावणदर्पहरणा । हे राम भवहृदयमोचना[५] । हे राम अहल्योद्धारणा । मखरक्षणा सीताधवा ।।८८।। हे राम कौसल्यागर्भरत्ना । हे राम अपारश्रममोचना[६] । सनकसनंदनमानसरंजना[७] । निरंजना निजरूपा ।।८९।। दानवकाननवैश्वानरा[८]। मम हृदयारविंदभ्रमरा । अज्ञानतिमिरच्छेदक दिवाकरा । समरधीरा सर्वेशा ।।९०।। हे राम भक्तचातक-जलधरा । प्रेमचकोरवेधकचंद्रा । संसारगजमर्दकमृगेंद्रा[९] । अनंगमोहना अनंगा ।।९१।। उपवासी मरतां चकोर । त्याचें धांवण्या धांवे चंद्र । कीं अवर्षण पडतां जलधर । चातकालागीं धांवे कीं ।।९२।। कीं चिंताक्रांतासी चिंतामणी । सांपडे पूर्वभाग्येंकरूनी । कीं दरिद्रियाचें अंगणीं । कल्पवृक्ष उगवला ।।९३।। कीं पतिव्रतेसी प्राणनाथ भेटला । कीं क्षुधितापुढें क्षीराब्धि आला । कीं साधकासी निधि जोडला । आनंद जाहला तैसा आम्हां ।।९४।। हंसें देखिलें मानससरोवर । कीं प्रेमळा भेटला उमावर । कीं संकल्पीं द्रव्य अपार । दुर्बळ ब्राह्मणासी दीधलें ।।९५।। तैसा आनंद जाहला जनांसी । आतां सत्वर चलावें अयोध्येसी । सांभाळावें बांधवां आम्हांसी । श्रीदशरथाचेनि[१०] न्यायें[१०] ।।९६।। आपुलें राज्य सांभाळावें । गोब्राह्मणां प्रतिपाळावें । आमुचे मनोरथ पूर्ण करावे । आतां परतावें सत्वर ।।९७।। जननी आमुची परम चतुर । मज देत होती राज्यभार । जैसें छेदोनियां शिर । गुडघ्यास पूजा बांधिली ।।९८।। पूज्यमूर्ति वोसंडून । जैसे गुरवाचे धरी चरण । राजकुमर सांडोन । कन्या दिधली अजारक्षका[११] ।।९९।। पाडोनि देवळाचें शिखर। घातलें भोंवतें आवार[१२] । नागवूनि[१३] यात्रा समग्र । अन्नसत्र घातलें ।।१००।। फणस टाकोनि रसाळ । प्रीतीनें घेतलें कनकफळ[१४] । मुक्त सांडोनि तेजाळ । गुंज जैसी घेतली ।।१।। गार घेऊनि टाकिला हिरा । अंधकार घेऊनि त्यजिलें दिनकरा[१५] । पाच भिरकावूनि सत्वरा । कांच बळें रक्षिली ।।२।। परिस त्यागून घेतला खडा । पंडित दवडूनि आणिला वेडा । चिंतामणि टाकोनि रोकडा । पलांडु[१६] घेतला बळेंचि ।।३।। अमृत टाकूनि घेतली कांजी । कल्पवृक्ष तोडोनि लाविली भाजी । कामधेनु दवडोनि सहजीं । अजा[१७] पूजी आदरें ।।४।। निजसुख टाकोनि घेतलें दुःख । कस्तूरी टाकूनि घेतली राख । सोनें टाकूनि सुरेख । शेण जैसें घेतलें ।।५।। सांडोनियां रायकेळें । आदरें भक्षी अर्कीफळें[१४] । ज्ञान सांडोनि घेतलें । अज्ञान जाण बळेंचि ।।६।।

---

१. घोडा २. थाप दिल्याने जोरात धावतो ३. श्रीराम ४. सर्व प्रकारच्या आनंदाचे घर ५. शंकराच्या मनाला मुक्त ठेवणाऱ्या रामा ६. अत्यंत श्रमातून सुटका करणाऱ्या रामा ७. सनक व सनंदन यांना प्रिय ८. दैत्यरूपी वनाला दग्ध करणारा अग्नी ९. संसाररूपी हत्तीला मारणारा सिंह १०. दशरथाच्या न्याय पद्धतीप्रमाणेच ११. धनगराला मेंढपाळाला १२. कुंपण १३. लुटून १४. धोतऱ्याचे फळ १५. सूर्याला १६. कांदा १७. शेळी

तैसें कैकयीनें केलें साचार । वना दवडोनि जगदुद्धार । मज द्यावया राज्यभार । सिद्ध जाहली साक्षेपें ॥७॥ सर्व अपराध करूनि क्षमा । अयोध्येसी चलावें श्रीरामा । याउपरी जगदात्मा । काय बोलिला तें ऐका ॥८॥ सूर्य मार्ग चुके करितां भ्रमण । नेत्रीं अंधत्व पावे दहन । मशकाची थडक लागून । जरी मेरु पडेल ॥९॥ पाषाणप्रहार लागून । वायु पडेल मोडोनि चरण । कीं पिपीलिका शोषी सिंधुजीवन[1] । विजेसी धांवूनि मशक धरी ॥११०॥ धगधगित अग्निज्वाळ । कर्पूरतुषारें[2] होय शीतळ । हेंही घडेल एकवेळ । परी वचनास चळ नोहे माझे ॥११॥ एकबाण एकवचन । एकपत्नीव्रत पूर्ण । चौदा वर्षें भरल्याविण । कदापि आगमन घडेना ॥१२॥ ऐसें निश्चयाचें वचन । बोलता जाहला रघुनंदन । अग्नीनें आहाळे जैसें सुमन । तैसें भरता जाहलें ॥१३॥ मग भरतें चेतविला जातवेद[3] । प्राण द्यावया जाहला सिद्ध । म्हणे हा देह करीन दग्ध । रामवियोग मज न सोसवे ॥१४॥ महाराज वाल्मीकि मुनी । भरतास एकांतीं नेउनी । मूळकाव्यार्थ अवघा कानीं । भविष्यार्थ[4] सांगितला ॥१५॥ तो ऐकतां कैकयीसुत[5] । उगाच राहिला निवांत । मग येऊनि जनकजामात[6] । हृदयीं धरी भरतातें ॥१६॥ आपुल्या हस्तेंकरून । पुसिले भरताचे नयन । करें कुरवाळिलें वदन । समाधान करीतसे ॥१७॥ देव बंदींचे सोडवून । चौदा वर्षांत येतों परतोन । मग वरदहस्त[7] उचलोन । भाष दिधली भरतातें ॥१८॥ चौदा वर्षें चौदा दिन । पंधरावे दिवशीं संपूर्ण । माध्यान्हा येतां चंडकिरण । भेटेन येऊन तुजलागीं ॥१९॥ भरत म्हणे हा नेम टळतां । मग देह त्यागीन तत्त्वतां । श्रीरामचरणीं ठेविला माथा । प्रेमावस्था अधिक पैं ॥१२०॥ भरत मागुता उठोन । विलोकी श्रीरामाचें वदन । अमलदलराजीवनयन[8] । तैसाचि हृदयीं रेखिला ॥२१॥ भरत सद्‌गद बोले वचन । मी अयोध्येसी न जाईं परतोन । सकळ मंगलभोग स्नान । त्यजूनि राहीन नंदिग्रामीं ॥२२॥ अवश्य म्हणे रघुनायक । मणिमय पादुका सुरेख । भरतासी दिधल्या शोकहारक । येरें मस्तकीं वंदिल्या ॥२३॥ शिवमस्तकीं विराजे चंद्र । तैशा शिरीं पादुका सुंदर । शोक हारपला समग्र । शरीर शीतळ जाहलें ॥२४॥ जैसें कंठीं धरितां नामस्मरण । शीतळ जाहला पार्वतीरमण । तैसाचि प्रेमळ भरत जाण । अंतरीं पूर्ण निवाला ॥२५॥ शत्रुघ्नासी म्हणे रघुनाथ । तूं आणि प्रधान सुमंत । राज्यभार चालवा समस्त । यथान्यायेंकरुनियां[9] ॥२६॥ सदा स्तवावे संतसज्जन । श्रीगुरुभजनीं सावधान । दूर त्यागावे दुर्जन । त्यांचें अवलोकन न करावें ॥२७॥ परदारा आणि परधन । तेथें कदा न ठेविजे मन । वेदमर्यादा[10] नुल्लंघावी पूर्ण । प्राणांतही जाहलिया ॥२८॥ जरी क्लेशकाळ[11] पातला बहुत । परी धैर्य न सोडावें यथार्थ । गुरुभजन पुण्यपंथ । न सोडावे सर्वथा ॥२९॥ साधु संत गोब्राह्मण । त्यांचें सदा करावें पाळण । सकळ दुष्टांस दवडोन । स्वधर्म पूर्ण रक्षावा ॥१३०॥ कथा कीर्तन पुराणश्रवण । काळ क्रमावा येणेंकरून । आपुला वर्णाश्रमधर्म[12] पूर्ण । सर्वथाही न त्यजावा ॥३१॥ संतांचा न करावा मनोभंग[13] । हरिभजनीं झिजवावें अंग । सांडोनि सर्व कुमार्ग । सन्मार्गेंचि वर्तावें ॥३२॥ ऋषींचे आशीर्वाद घ्यावे । वर्म कोणाचें न बोलावें । विश्व अवघें जाणावें । आत्मरूपी निर्धारें ॥३३॥ सत्संग धरावा आधीं । नायकावी दुर्जनाची[14] बुद्धी । कामक्रोधादिक वादी । दमवावे निजपराक्रमें ॥३४॥ मी जाहलों सज्ञान । हा न धरावा अभिमान । विनोदेंही पराचें छळण । न करावें सहसाही ॥३५॥

१. समुद्राचे पाणी २. कापराच्या कणांनी ३. अग्नी ४. भावी घटना ५. भरत ६. श्रीराम ७. वर देणारा हात ८. स्वच्छ पाकळ्या असणाऱ्या कमळासारखे डोळे असणारा-राम ९. योग्य राजनीतीप्रमाणे १०. वेदांनी घालून दिलेले नियम ११. संकटांचा काळ १२. चार वर्ण व चार आश्रम यांची व्यवस्था १३. अपमान १४. दुष्टांची

शमदमादिक साधनें । स्वीकारावीं साधकानें । जन जाती आडवाटेनें । त्यासीं सुमार्ग दाविजे ॥३६॥ शोकमोहांचे चपेटे पूर्ण । अंगीं आदळती येऊन । विवेकवोडण पुढें करून । ज्ञानशस्त्र योजावें ॥३७॥ काम क्रोध मद मत्सर । हे गृहासी येऊं न द्यावे तस्कर । आयुष्य क्षणिक जाणोनि साचार । सारासार विचारावें ॥३८॥ क्षणिक जाणोनि संसार । सोडावा विषयांवरील आदर । सद्‌गुरुवचनीं सादर । सदा चित्त ठेविजे ॥३९॥ दैवें आलें भाग्य थोर । त्याचा गर्व न धरावा अणुमात्र । एकदांचि गेलें जरी समग्र । कदा धीर न सोडावा ॥१४०॥ कमलपत्राक्ष[१] कृपानिधान[२] । वर्षत स्वातीजल पूर्ण । तें सुमंत आणि शत्रुघ्न । कर्णशुक्तिकेंत[३] सांठविती ॥४१॥ शब्दामृत[४] वर्षतां रामचंद्र । निवाले भरतकर्णचकोर[५] । कीं रामवचन क्षीरसागर[६] । उपमन्यु[७] भरत साच तेथें ॥४२॥ सूर्य उगवतां निरसे तमजाळ । तैसें रामवचनें झालें हृदय निर्मळ । मग भरत परतोनि तत्काळ । नंदिग्रामीं राहिला ॥४३॥ करूनि मातेचें समाधान । सकळ ब्राह्मण प्रजाजन । सुमंत आणि शत्रुघ्न । पाठवी परतोनि अयोध्ये ॥४४॥ श्रीरामपादुका सिंहासनीं । शत्रुघ्न वरी छत्र धरूनी । मग राज्य चालवी अनुदिनीं । नामस्मरणीं सावध ॥४५॥ क्षणक्षणां येत नंदिग्रामासी । मागुता जाय अयोध्येसी । सकळ पृथ्वीच्या राजांसी । धाक भरतशत्रुघ्नांचा ॥४६॥ प्रतिसंवत्सरीं[८] करभार । भूपाळा देती समग्र । असो नंदिग्रामीं भरत वीर । निर्विकार बैसला ॥४७॥ नंदिग्रामाजवळ अरण्यांत । पर्णकुटी करून राहे भरत । श्रीरामपादुका विराजित । रात्रंदिवस मस्तकीं ॥४८॥ जे आवडते श्रीरामभक्त । तेही भरताऐसे विरक्त । कनक कामिनी गृह सुत । त्याग करूनि बैसले ॥४९॥ वटदुग्धीं जटा वळूनी । सकळ मंगलभोग त्यजोनी । वल्कलें वेष्टोनि तृणासनीं । बैसलें ध्यानीं श्रीरामाचे ॥१५०॥ नक्षत्रांत जैसा चंद्र । तैसा मध्यें भरत साचार । रात्रंदिवस रामचरित्र । भरत सांगे समस्तांतें ॥५१॥ किंवा मानससरोवरीं । बैसती राजहंसांच्या हारी[९] । भरतासभोंवते तेचिपरी । वेष्टूनियां बैसले ॥५२॥ श्रीधर म्हणे श्रोतयां समस्तां । चित्त द्यावें पुढिल्या श्लोकार्था । रघुनाथ चित्रकूटीं असतां । काय कथा वर्तली ॥५३॥ कवीची शब्दरत्नमांदुस[१०] । उघडितां पंडित पावती संतोष । इतर कुबुद्धि मतिमंदांस । रत्नपरीक्षा न कळे हो ॥५४॥ असो चित्रकूटीं असतां रघुनंदन । मिळोनि बहिर्मुख[११] ब्राह्मण । म्हणती रामा तूं जाईं येथून । आम्हांसी विघ्नें तुझेनि ॥५५॥ तुझी स्त्री परम सुंदर । न्यावया जपती बहुत असुर । वाल्मीकभविष्य साचार । ऐसेंच असे जाण पां ॥५६॥ वनींहूनि वार्ता उठली साचार । त्रिशिरा दूषण आणि खर । दळभारेंसी येथें येणार । तुजकरितां रघुवीरा ॥५७॥ म्हणोनि सांगतों तुजशीं । येथोनि जाईं निश्चयेंसी । नाहीं तरी आम्ही स्वाश्रमासी । त्यजोनि जाऊं निर्धारें ॥५८॥ श्रीराम म्हणे ब्राह्मणांलागुनी । तुम्हीं निश्चिंत असावें अंत:करणीं । मी काळही फोडीन समरांगणीं । राक्षसांतें गणी कोण ॥५९॥ परम अविश्वासी ब्राह्मण । म्हणती विघ्नें येती येथें दारुण । हा आपले स्त्रीस रक्षील जाण । कीं आम्हासी रक्षील ॥१६०॥ हा त्यांसी न पुरे समरांगणीं[१२] । चाऱ्ही बाण जाती सरूनी । याच्या बोलाचा विश्वास धरूनी । कदा येथें न राहावें ॥६१॥ मग सकळीं करूनि एक विचार । रात्रींच उठोनियां समग्र । कुटुंबें घेउनि सत्वर । गेले विप्र पळोनियां ॥६२॥

१. श्रीराम २. कृपाळू ३. कानरूपी शिंपल्यात ४. शब्दरूपी अमृत ५. भरताचे कान हाच चकोर ६. दुधाचा सागर ७. भरत हाच उपमन्यू ८. दरवर्षी ९. रांगा १०. शब्दरूपी रत्नांची पेटी ११. वरवरचा विचार करणारे १२. युद्धप्रसंगी

उपरी प्रात:काळीं उठोन । श्रीराम पाहे ऋषिजन । तंव ते रात्रींच गेले पळोन । राजीवनयन[१] काय करी ॥६३॥ एक वाल्मीकि उरला पूर्ण । तो महाराज तपोधन । भूत भविष्य वर्तमान । त्रिकालज्ञान जयासी ॥६४॥ वायुसंगें उडे तृण । परी अचळ न सोडी स्थान । किंवा रणमंडळ सोडून । रणशूर पळे ना ॥६५॥ तैसा वाल्मीकि उरला जाण । तेणें आधींच कथिलें रामायण । इतर बहिर्मुख ब्राह्मण । श्रीराम निधान[२] नोळखती ॥६६॥ प्रत्यया न येतां रघुवीर । आचार तितका अनाचार । कर्म तोच भ्रम थोर । पिशाच नर तेचि पैं ॥६७॥ तेणें केलें वेदपठण । करतलामलक[३] शास्त्रें प्रमाण । परी तें मद्यपियाचें भाषण । राघवा शरण न जातां ॥६८॥ जैसी मुग्धा बत्तीसलक्षणी । परम सौंदर्यलावण्यखाणी[४] । परी मन नाहीं पतिभजनीं । तरी तें सर्वही वृथा गेलें ॥६९॥ खरपृष्ठीसी[५] चंदन देख । परी तो नेणे सुवाससुख । षड्रसीं फिरवी जे दर्वी[६] पाक- । रसस्वाद नेणें ती ॥१७०॥ कृपा न करितां सीतावर । कायसा व्यर्थ तत्त्वविचार । त्याचें ज्ञान नव्हे साचार । जैसे कीर[७] अनुवादती ॥७१॥ तेणें केलें तीर्थाटन । होय चौसष्टिकळाप्रवीण[८] । तेणें केलें जरी कीर्तन । तें जाण गायन गोरियाचें[९] ॥७२॥ असो रघुपतीस सांडोनि विप्र । पळोन गेले समग्र । जगद्वंद्य रघुवीर । त्याचें स्वरूप नेणोनियां ॥७३॥ असो आतां बहु भाषण । श्रीराम चित्रकूट त्यागोन । वाल्मिकिऋषीस नमून । दंडकारण्या चालिला ॥७४॥ श्रीरामविजय ग्रंथ प्रचंड । येथें संपलें अयोध्याकांड । आतां अरण्यकांड[१०] इक्षुदंड[११] । अति अपूर्व सुरस पुढें ॥७५॥ रामविजय ग्रंथ क्षीरसागर[१२] । दृष्टांतरत्नें[१३] निघती अपार । संत श्रोते निर्जर[१४] । अंगीकारोत सर्वदा ॥७६॥ ब्रह्मानंदा रविकुलभूषणा[१५] । श्रीधरवरदा[१६] सीताजीवना । पुढें अरण्यकांडरचना । बोलवीं आतां येथोनी ॥७७॥ स्वस्ति श्रीरामविजय ग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत भक्त चतुर । द्वादशाध्याय गोड हा ॥१७८॥
॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ ओव्या १७८ ॥

॥ अध्याय बारावा समाप्त॥

## ॥ अयोध्याकांड समाप्त ॥

१. श्रीराम २. श्रीरामरूपी ठेवा ३. हातावरील आवळ्यासारखी सहज कळणारी ४. अत्यंत सुंदर ५. गाढवाच्या पाठीला ६. पळी ७. पोपट ८. चौसष्ट कलांमध्ये प्रवीण ९. पारध्याचे १०. अरण्यकांडाची कथा ११. उसासारखी गोड १२. हा ग्रंथ म्हणजे क्षीरसागर आहे १३. त्यात दृष्टान्तरूपी रत्ने मिळतील १४. श्रोते हेच देव १५. श्रीरामा १६. श्रीधरकवीला वर देणाऱ्या

# अरण्य कांड

## ।। अध्याय तेरावा ।।

# श्रीरामाचे दंडकारण्यात जाणे, अत्री, शरभंग, अगस्ती, जटायू यांची भेट

।। श्रीगणेशाय नमः ।। श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः। संस्कृतापासोनि केवळ । झाली प्राकृत भाषा रसाळ । कीं स्वातीजळापासोनि[१] मुक्ताफळ[२] । अतितेजाळ निपजे पैं ।।१।। चंद्राचे अंगीं निपजे चांदणें । कीं दिनकरापासाव जेवीं किरणें । कीं जंबुनदापासाव[३] सोनें । बावनकसी निपजे पैं ।।२।। कीं दुग्धापासोनि नवनीत । कीं अभ्यासापासोनि मति अद्भुत । कीं इक्षुदंडापासोनि निपजत । रसभरित शर्करा ।।३।। कीं पुष्पापासोनि परिमळ[४] । कीं रंभेपासोनि[५] कर्पूर शीतळ । मृगापासोनि परिमळ । मृगमद[६] जेवीं निपजे पैं ।।४।। कथालक्षण[७] सरितानाथ[८] । साहित्यतरंग[९] अपरिमित । प्रेमळ लहरिया[१०] अद्भुत । ऐक्या येत परस्परें ।।५।। अमृताहून गोड अन्न । परी रुचि न ये शाकेविण[११] । दृष्टांताविण ग्रंथ संपूर्ण । रसीं न चढे सर्वथा ।।६।। रत्नखाणी मेरुपाठारीं[१२] । तैसे दृष्टांत कथेमाझारीं । कमलावांचोनि सरोवरीं । शोभा न ये सर्वथा ।।७।। अलंकारें शोभे नितंबिनी । कीं गगन मंडित उडुगणीं[१३] । कीं मानससरोवरा हंसांवांचोनि । शोभा न येचि सर्वथा ।।८।। कीं मननाविण श्रवण । कीं सद्भावाविण कीर्तन । कीं क्षेत्र[१४] जैसें बीजाविण । दृष्टांतांविण ग्रंथ तैसा ।।९।। कीं सभा जैसी पंडितांविण । कीं सुस्वराविण गायन । कीं शुचितेविण[१५] तपाचरण । दृष्टांतांविण ग्रंथ तैसा ।।१०।। कीं विरक्तीविण ज्ञान । कीं प्रेमाविण व्यर्थ भजन । कीं दानाविण भाग्य पूर्ण । दृष्टांतांविण ग्रंथ तैसा ।।११।। अरण्यकांड अरण्यांत । दृष्टांतवृक्ष विराजत । तेथें आनंदफळें पंडित । सदा सेवोत स्वानंदें ।।१२।। आतां अरण्यकांड वसंतवन । तेथें वाग्देवी चिच्छक्ति[१६] पूर्ण । क्रीडा करीत उल्हासेंकरून । संतसज्जन परिसा तें ।।१३।। असो चित्रकूटाहूनि अयोध्यानाथ । सीतासौमित्रीसमवेत । निजभक्तांसी उद्धारित । जगन्नाथ जातसे ।।१४।। दक्षिणपंथें जनकजामात । सकळ ऋषींचे आश्रम पहात । त्रयोदश वर्षेपर्यंत । रघुनाथ क्रमीत ऐसेंचि ।।१५।। कोठें वर्ष कोठें अयन[१७] । कोठें मास कोठें पक्ष पूर्ण । कोठें एक रात्र द्वि त्रिदिन । कोठें पंच रात्री क्रमियेल्या ।।१६।। मग अत्रीचिया आश्रमाप्रती । येता झाला जनकजापती । तों देखिली दत्तात्रेयमूर्ती । अविनाशस्थिती जयाची ।।१७।। सह्याद्रीवरी श्रीराम । अज अजित मेघश्याम । श्रीदत्तात्रेय पूर्ण ब्रह्म । देत क्षेम तयातें ।।१८।। क्षीरसागरींच्या लहरिया । परस्परें समरसोनियां । कीं जान्हवी आणि मित्रतनया[१८] । एके ठायीं मिळताती ।।१९।। कीं नानावर्ण गाई । परी दुग्धास दुजा वर्ण नाहीं । तैसा जनकाचा जांवई । आणि अत्रितनय मिसळले ।।२०।। अवतारही उदंड होती । सर्वेचि मागुती विलया जाती । तैसी नव्हे श्रीदत्तात्रेयमूर्ती । नाश कल्पांती असेना ।।२१।। पूर्णब्रह्म मुसावलें[१९] । तें हें दत्तात्रेयरूप वोतिलें । ज्याचे विलोकनमात्रें[२०] तरले । जीव अपार त्रिभुवनीं ।।२२।। सकळ सिद्ध ऋषि निर्जर । विधि[२१] वाचस्पति[२२] शचीवर[२३]। दत्तात्रेयदर्शना साचार । त्रिकाळ येती निजभावें ।।२३।।

---

१. स्वाती नक्षत्रांतील पावसाच्या पाण्यापासून २. मोती ३. जंबू नामक नदीत ४. सुगंध ५. केळीतून ६. कस्तुरी ७. कथेचे गुण ८. समुद्र ९. भाषालंकार १०. लाटा ११. भाजीशिवाय १२. मेरुपर्वतावर १३. नक्षत्रांनी १४. शेत १५. पावित्र्याविना १६. शुद्ध चेतना १७. सहा महिने १८. यमुना १९. घनरूपात ओतले २०. पाहण्यानेच २१. ब्रह्मा २२. देवगुरू बृहस्पती २३. इंद्र

अद्यापि सह्याद्रीपर्वतीं। देवांचे भार उतरती। सर्व ब्रह्मांडींचीं दैवतें धांवती। अवधूतमूर्ती पहावया ॥२४॥ घेतां दत्तात्रेयदर्शन। देवांसी सामर्थ्य चढे पूर्ण। मग ते इतरांसी होत प्रसन्न। वरदान द्यावयातें ॥२५॥ ज्यासी प्रयागीं प्रात:स्नान। पांचाळेश्वरीं अनुष्ठान। करवीरपुरांत[१] येऊन। भिक्षाटण माध्यान्हीं ॥२६॥ अस्ता जातां वासरमणी। सह्याद्रीस जाती परतोनी। तों देवांचे भार कर जोडोनी। वाट पाहती अगोदर ॥२७॥ दृष्टीं देखतां दिगंबर। एकचि होय जयजयकार। असंख्य वाद्यांचे गजर। अद्यापि भक्त ऐकती ॥२८॥ दत्तात्रेयभक्त देखतां दृष्टीं। दैवतें जीं जीं सकळ सृष्टीं। त्याचे पायीं घालिती मिठी। पुढें ठाकती कर जोडूनि ॥२९॥ करितां दत्तात्रेयस्मरण। भूतप्रेतें पळती उठोन। मग उपासकांसी विघ्न। कवण करूं शकेल ॥३०॥ असो. ऐसा स्वामी अवधूत। जो अत्रीचा महापुण्यपर्वत[२]। तयासी वंदोनि रघुनाथ। अत्रिदर्शन घेतलें ॥३१॥ तंव ते अनसूया सती। सीता राम तियेसी वंदिती। सीतेसी आलिंगूनि प्रीतीं। वर देती जाहली ॥३२॥ आपुले निढळींचें[३] कुंकुम काढिलें। तें सीतेचे कपाळीं लाविलें। अमलवस्त्र[४] नेसविलें। जें न मळे न विटे कल्पांतीं ॥३३॥ गळां घातला सुमनहार। जो कधीं न सुके साचार। जैसा नित्य नूतन दिनकर। तेज अणुमात्र ढळेना ॥३४॥ सीतेचें सुवासिक शरीर। अनसूया करी निरंतर। ज्या सुवासें अंबर[५]। परिपूर्ण होय पैं ॥३५॥ भेटतां राक्षस दुर्धर। सीतेसी भय न वाटे अणुमात्र। ऐसा दिधला निर्भय वर। अनसूयेनें तेधवां ॥३६॥ सर्वेचि रेणुकेचें दर्शन। घेत रविकुळभूषण। जिच्या वरें भार्गवें पूर्ण। नि:क्षत्रिय केली धरित्री ॥३७॥ ते मूळपीठनिवासिनी[६] शक्ति। तीस वंदी अयोध्यापती। ते श्रीरामाची मूळप्रकृती। आदिमाया निर्धारें ॥३८॥ ते प्रथमअवताराची[७] जननी। तीच कौसल्या जाली दुसरेनी। श्रीराम स्तवी म्हणोनी। ऐका श्रवणीं सादर ॥३९॥ जय जय आदिकुमारिके। जय जय मूळपीठनायिके। सकळ कल्याणसौभाग्यदायिके[८]। जगदंबिके मूळप्रकृति ॥४०॥ जय जय भार्गवप्रियभवानी[९]। भवभयनाशके भक्तवरदायिनी। सुभद्रकारके हिमनगनंदिनी। त्रिपुरसुंदरी महामाये ॥४१॥ जय जय आनंदकासारमराळिके[१०]। जय जय चातुर्यचंपककलिके। जय जय शुंभनिशुंभ-दैत्यांतके। सर्वव्यापके मृडानी ॥४२॥ जय जय शिवमानसकनकलतिके[११]। पद्मनयने दुरितवनपावके। जय जय त्रिविधतापमोचके। निजजनपाळके अन्नपूर्णे ॥४३॥ तव मुखकमलशोभा देखोनी। इंदुबिंब[१२] गेलें विरोनी। ब्रह्मादिकें बाळें तीन्ही। स्वानंदसदनीं निजविसी ॥४४॥ जीव शीव दोन्ही बाळकें। अंबे तुवां निर्मिलीं कौतुकें। जीव तुझें स्वरूप नोळखे। म्हणोनी पडिला आवर्तीं[१३] ॥४५॥ शिव तुझे स्मरणीं सावचित्त। म्हणोनी तो नित्यमुक्त। ब्रह्मानंदपद हाता येत। तुझे कृपेनें जननीये ॥४६॥ मेळवूनी पंचभूतांचा मेळ। तुवां रचिला ब्रह्मांडगोळ। इच्छा परततां तत्काळ। क्षणांत निर्मूळ करिसी तूं ॥४७॥ ऐसें स्तवोनि चापपाणी। सह्याद्रीवरी दिनत्रय क्रमोनी। अत्रिऋषीची आज्ञा घेऊनी। दक्षिणपंथें चालिले ॥४८॥ अत्रि म्हणे गा रघुपती। या वनीं राक्षस बहु वसती। जतन करीं सीता सती। क्षणही परती न कीजे ॥४९॥ अवश्य म्हणोनि जलजनेत्र। पुढें चालिला स्मरारिमित्र[१४]। पाठीसीं भोगींद्रअवतार। वीर सौमित्रि जातसे ॥५०॥ त्यामागें मंगळभगिनी[१५]। मंगळकारक विश्वजननी। स्थिर स्थिर हंसगमनी। मंगळजननीवरी[१६] चाले ॥५१॥

१. कोल्हापुरात २. श्री दत्तात्रेय ३. कपाळावरील ४. निर्मल वस्त्र ५. आकाश ६. माहूर येथील रेणुकेचे स्थान हे शक्तीचे मूळ पीठ मानतात ७. रामाआधीचा परशुराम अवतार ८. कल्याण व सौभाग्य देणाऱ्या ९. भार्गवाची आवडती १०. आनंदरूपी सरोवरात विहार करणारी हंसी ११. भगवान शंकराला प्रिय १२. चंद्रबिंब १३. संसारचक्रात १४. श्रीराम १५. सीता १६. पृथ्वीवर

मारीच म्हणे रावणा । अभिलाषी जो परांगना । तो मुकला आपुलिया प्राणा । सत्य जाण निर्धारें ॥२६॥ सद्विवेक हृदयीं धरोन । अनुचित कर्मी न घालीं मन । सद्गुरु सांगे तें वचन । अवश्य हृदयीं धरावे ॥२७॥ न करावें कोणाचें हेळण । कदा न बोलिजे दुष्ट वचन । पराची वेदना जाणून । परोपकार करावा ॥२८॥ सर्वां भूतीं एक भगवंत । हा वेदशास्त्रीं श्रेष्ठार्थ । म्हणोनि द्वेष न करावा सत्य । साधिजे परमार्थ अवश्य ॥२९॥ क्षणिक जाणोनि शरीर । साधावा सारासारविचार । मी भाग्यें ज्ञानें बहु थोर । हा अभिमान न धरावा ॥३०॥ काम क्रोध मद मत्सर । हे शत्रु जिंकावे अनिवार । दशमुखा तूं सज्ञान थोर । सखा रघुवीर करीं वेगें ॥३१॥ सखा करितां चापपाणी । मग सुखासी नाहीं वाणी । जोंवरी शशी आणि तरणी । तोंवरी सुखें नांदसी ॥३२॥ राम केवळ परम पुरुष । आदि नारायण सर्वेश । तुझे उरावरी पडलें धनुष्य । सीतास्वयंवरीं आठवीं कां ॥३३॥ तुझे चालिले जेव्हां प्राण । मग उठिला रामपंचानन[१] । चंडीशकोदंड[२] भंगोन । जीवदान तुज दिधलें ॥३४॥ तैं तुज रामें वांचविलें । त्याचें काय हेंचि फळ जाहलें । जेणें उपकार बहुत केले । त्यासी मारिसी शस्त्र घेउनी ॥३५॥ जेणें पाजिला सुधारस[३] । त्यासीच पाजिलें महाविष । जेणें रणींहून सोडविलें नि:शेष । त्याचिया गृहासी अग्नि लाविसी ॥३६॥ जन्मूनि जेणें केलें पाळण । आपत्काळीं रक्षिलें पूर्ण । तो निद्रिस्थ असतां पाषाण । कैसा वैरी घालावा ॥३७॥ नौका बुडतां कांसे लावित । कीं जळत्या गृहींहूनि काढित । कीं शिर छेदितां सोडवित । तो पितयातुल्य वेद म्हणे ॥३८॥ यालागीं दशकंठा तूं सुबुद्ध । रामाशीं न करावा विरोध । राम केवळ ब्रह्मानंद । आनंदकंद जगद्गुरु ॥३९॥ तुझा स्वामी जो शंकर । तोही रामभजनीं सादर । ते रामभार्या[४] तूं पामर । हिरोनि आणूं इच्छितोसी ॥४०॥ ऐसीं मातुळाचीं वचनें । सुधारसाहूनि गोड गहनें । कीं विवेकवैरागरींचीं रत्नें । रावणाहातीं दीधलीं ॥४१॥ परम मतिमंद कुल्लाळ देख । परीक्षा नेणेचि महामूर्ख । रोगिष्ठापुढें अन्नें सुरेख । व्यर्थ जैसीं वाढिलीं ॥४२॥ अवदान समर्पिले भस्मांत । कीं उकरडां ओतिलें अमृत । कीं जो मद्यपानी उन्मत्त । त्यास परमार्थ कायसा ॥४३॥ असो परम क्रोधायमान । रावण बोले तेव्हां तीक्ष्ण । जैसें साधूचें छळण । निंदक करी साक्षेपें ॥४४॥ माझिया प्रतापापुढें । राम मनुष्य काय बापुडें । केलीं चूर्ण देवांचीं हाडें । तुजदेखतां समरांगणीं ॥४५॥ त्याचा प्रताप तूं वानिसी[५] । तरी तुज वधीन निश्चयेंसीं । म्हणोनि हस्त घातला शस्त्रासी । मारीच मानसीं वीटला ॥४६॥ म्हणे अधम तूं परम दुर्जन । होईं माघारा न बोलें वचन । मी आतां मृगवेष धरून । जातों शरण राघवेंद्रा ॥४७॥ रामबाणें होतां मरण । मी अक्षयसुख भोगीन । तुझे हातेंकरून । अध:पतन पतिता ॥४८॥ आतां पंचवटीस चला लौकरी । मग दोघे बैसोनि रथावरी । वायुवेगें ते अवसरीं । जनस्थानासी पातले ॥४९॥ वनीं गुप्त उभा रावण । मारीच निघे मृगवेष धरून । अंतरीं करीत रामस्मरण । म्हणे धन्य धन्य आजि मी ॥५०॥ आला चमकत पंचवटी । श्रीरामरूप न्याहाळी दृष्टीं । हृदयीं जाहला परम संतुष्टी । अंतरी कष्टी नव्हेचि ॥५१॥ जैसें सुवर्णतगट सुरंग । तैसें मृगाचें दिसे अंग । ऐसें देखतां सीतारंग[६] । हात घाली धनुष्या ॥५२॥ मृग क्षणक्षणां परतोन । पाहे राघवाकडे विलोकून । तों ते पद्माक्षी[७] बोले वचन । पद्मजातजनकाप्रति[८] ॥५३॥ म्हणे ऐसा मृग आजिपर्यंत । आम्हीं देखिला नाहीं यथार्थ । याचे त्वचेची[९] कंचुकी[१०] सत्य । उत्तम होईल केलिया ॥५४॥

१. रामरूपी सिंह २. शिवधनुष्य ३. अमृत ४. श्रीरामपत्नी सीता ५. वाखाणतोस ६. श्रीराम ७. सीता ८. राघवाप्रत ९. चामड्याची १०. चोळी

अयोध्येसी प्रवेश करितां । ते कंचुकी लेईन प्राणनाथा । षण्मास उरले आतां । मनुसंवत्सरांमाजी[१] पैं ॥५५॥ सीतेची इच्छासरिता साचार । कर्मजळाचा तुंबळ पूर । दुःखसमुद्राप्रती साचार । भेटावया जाऊं पाहे ॥५६॥ जाणूनि जानकीचें मानस । आणि पुढील होणार भविष्य । सत्वर चालिला अयोध्याधीश । धनुष्यासी बाण लावूनियां ॥५७॥ म्हणे सौमित्रे सावधान । रक्षीं जानकी चिद्रत्न । परम कपटी पिशिताशन । नसतींच विघ्नें करितील ॥५८॥असो गुंफेत सीता चिद्रत्न । द्वारीं रक्षपाळ लक्ष्मण । जैसा महाभुजंग[२] अनुदिन । निधानकुंभ रक्षीतसे ॥५९॥ पार्वतीजवळ जैसा कुमार[३] । कीं इंदिरेपाशीं खगेश्वर[४] । तैसा तो भूधरावतार[५] । रक्षी द्वार गुंफेचें ॥६०॥ इकडे मृगाचे पाठीं लागे । राघव जात वातवेगें । गौतमीतीराच्या पूर्वमार्गे । केलें मृगें पलायन ॥६१॥ मनाहून वेग अत्यंत । मनमोहन त्वरें जात । ध्वजवज्ररेखांकित । पदें उमटत धरेवरी ॥६२॥ पद्मोद्भव[६] आणि भोगींद्र[७] । नीलग्रीव[८] आणि वज्रधर[९] । चरणरज इच्छिती निरंतर । दुर्लभ साचार तयांसी ॥६३॥ असो मृगाचें वर्म लक्षून । रामें सोडिला दिव्य बाण । भूमीवरी पडिला हरिण । अचूक संधान रघुपतीचें ॥६४॥ सादर पाहे रघुवीर । तों पडलें राक्षसाचें शरीर । श्रीरामबाणें निशाचर । पावला परत्र निर्धारें ॥६५॥ आश्चर्य करी अयोध्याधीश । म्हणे परम कपटी राक्षस । असो अश्वत्थाखालीं पुराणपुरुष[१०] । श्रमोनियां बैसला ॥६६॥ इकडे काय जाहलें वर्तमान । वनीं गुप्त उभा रावण । गुंफाद्वारीं लक्ष्मण । बैसला रक्षणा अव्यग्र[११] ॥६७॥ शांतीजवळी परमार्थ । कीं तपासी रक्षी शुचित्व । तैसा द्वारीं सुमित्रासुत । मग लंकानाथ काय करी ॥६८॥ श्रीरामासारखा शब्दध्वनी । राक्षसें उठविला काननीं । सौमित्रे धांव धांव म्हणोनी । सीता कर्णी आइकत ॥६९॥ सौमित्रे धांवे लौकरी । वनीं वेष्टिलें रजनीचरीं । संकट पडलें मजवरी । तूं कैवारी पाठीराखा ॥७०॥ रणभूमीस बंधूविण । उडी घालील सांग कवण । राक्षसीं घेतला माझा प्राण । मग येऊन काय पाहसी ॥७१॥ ऐसें ऐकतां जनकनंदिनी । परम घाबरली अंतःकरणीं । म्हणे श्रीराम माझा पडिला वनीं । करुणावाणी बाहती तुम्हां ॥७२॥ रणीं बंधु संकटीं मित्र । वृद्धापकाळीं ओळखिजे कलत्र । विषमकाळीं सत्पुत्र । सांभाळिती पितयातें ॥७३॥ कीं शस्त्रमार होतां अत्यंत । करींचें वोडण[१२] पुढें होत । कीं संसारतापें संतप्त । साधु निववीत निजबोधें ॥७४॥ मग बोले तो लक्ष्मण । जानकी हें कापट्यवचन । संकटीं पडेल रघुनंदन । हें कल्पांतीं घडेना ॥७५॥ तो देवाधिदेव रघूत्तम । चराचरबीज[१३] सुफलांकित[१४] द्रुम । त्यासी संकट पडेल दुर्गम[१५] । हें कल्पांतींही घडेना ॥७६॥ जरी तमें झांकेल चंडांश । किंवा शीतज्वर[१६] बाधेल अग्नीस । जगद्भक्षका काळास । भूतबाधा जरी होय ॥७७॥ ऊर्णनाभीचे तंतूनें सहज । जरी बांधिजेल महागज । तरी संकटीं पडेल रघुराज । जनकतनये जाण पां ॥७८॥ ऐसें बोलतां लक्ष्मण । सीता जाहली क्रोधायमान । तीक्ष्ण शब्दशस्त्रेंकरून[१७]। लक्ष्मणासी ताडिलें ॥७९॥ म्हणे तुमचें कळलें बंधुपण । ओळखिली म्यां मनींची खूण । माझा अभिलाष धरून पूर्ण । काननाप्रती आलासी ॥८०॥ राम राक्षसीं वधिजेल वनीं । मग करूं इच्छिसी मातें पत्नी । जैसा मैंद[१८] क्षमा धरूनी । सेवा करी साक्षेपें[१९] ॥८१॥ सन्मुख देखोनि रघुनाथा । म्हणसी जानकी जगन्माता । कीं वनीं राम वधावया तत्त्वतां । तुज कैकयीनें धाडिलें ॥८२॥ तूं दायाद[२०] परम दुर्जन । सापत्नबंधु कपटी पूर्ण । जळो तुझें काळें वदन । कळलें ज्ञान वैराग्य तुझें ॥८३॥

---

१. चौदा वर्ष पूर्ण होण्यास २. मोठा साप ३. कार्तिकेय ४. गरुड ५. लक्ष्मण ६. ब्रह्मा ७. शेष ८. श्रीशंकर ९. इंद्र १०. श्री राम ११. एकाग्र चित्ताने १२. ढाल १३. सृष्टीचा आदिकारण राम १४. उत्तम फळांनी युक्त १५. कठीण १६. हिवताप १७. शब्दरूपी शस्त्राने १८. कपटी, लबाड १९. खोट्या नम्रतेने २०. भाऊबंद.

रघुपतीस विपरीत होतां । प्राण हा त्यजीन तत्त्वतां । निर्दय पाहतां तुजपरता । भुवनत्रयीं दिसेना ॥८४॥ माझा अभिलाष धरून । रामासी इच्छितोसी मरण । ऐसे जानकीनें वाग्बाण । सौमित्रीवरी सोडिले ॥८५॥ कीं तप्तशस्त्रांचे[१] घाय पूर्ण । त्याहूनि बोल ते तीक्ष्ण । कीं पर्वताचे कडे जाण । अंगावरी कोसळले ॥८६॥ वचनें नव्हत तीं निश्चित । कीं दुःखवल्लीं[२] फळें यथार्थ । परम दुःखी सुमित्रासुत । प्रत्युत्तर देतसे ॥८७॥ म्हणे माते जनकनंदिनी । मी निष्पाप बोलिलों वाणी । कीं विजयी सदा चापपाणी[३] । दुःख वनीं त्यासी कैचें ॥८८॥ पृथ्वी आप तेज वायु आकाश । तुज मज साक्ष चंडांश । मी बोलिलों निर्दोष । जैसें कां यश सोज्वळ ॥८९॥ मी बाळक तूं जननी । हाचि भावार्थ माझे मनीं । तुज फळेल करणी । पडसी बंधनीं षण्मास ॥९०॥ पुन्हां भेटे जों रघुनाथ । तों भोगिसी महा अनर्थ । ऐसें बोलोनि सुमित्रासुत । चालिला त्वरित वनासी ॥९१॥ मग तो उर्मिलाप्राणनाथ[४]। जनकाचा कनिष्ठ जामात । गुंफेद्वारीं रेखा ओढीत । धनुष्यकोटीनें[५] तेधवां ॥९२॥ म्हणे तूं या रेखेबाहेर जासी । तरी परम अनर्थ पावसी । जो रघुवीर अयोध्यावासी । त्याचीच शपथ तुज असे ॥९३॥ मग शोधीत घोर अरण्य । सौमित्रि जातां करी रुदन । म्हणें होतांचि रामदर्शन । प्राण त्यागीन निर्धारें ॥९४॥ श्रीरामपदांकित मुद्रा दिसत । ध्वजवज्रादि चिन्हें मंडित । मार्ग काढीत सुमित्रासुत । ऐका दृष्टांत कैसा येथें ॥९५॥ जैसे श्रुतीच्या आधारें निश्चित । स्वस्वरूपीं प्रवेशती संत । त्याचपरी सुमित्रासुत । श्रीरघुनाथा पाहों जाय ॥९६॥ कीं संसारतापें संतप्त पूर्ण । तो सद्गुरूसी जाई शरण । कीं तृषित जान्हवी लक्षून । जात धांवोन त्वरेनें ॥९७॥ तैसा सत्वर जात लक्ष्मण । तों अश्वत्थाखालीं मनमोहन । श्यामसुंदर देदीप्यमान । मखपाळण[६] बैसला असे ॥९८॥ कोमाइलें श्रीरामवदन । तों येतां देखिला लक्ष्मण । शोकें दिसे दीनवदन । येऊन लोटांगण घातलें ॥९९॥ कंठ जाहला सद्गदित । नयनीं आले अश्रुपात । श्रीरामचरण क्षाळीत । पाहे तटस्थ रघुवीर ॥१००॥ श्रीराम म्हणे लक्ष्मणा । कां सीता टाकोनि आलासी वना । येरू म्हणे रघुनंदना । माझा वध करीं वेगें ॥१॥ ऐसें वाटे माझे मनीं । देह समर्पावा रामचरणीं । रामें हृदयीं आलिंगूनी । कायसा मनीं खेद सांगें ॥२॥ सौमित्री सद्गदित होऊनि बोले । सीतेनें वाग्बाण सोडिले । तेणें सर्वांग माझें खोंचलें । तें बोलिलें नवजाय ॥३॥ मग बहुत प्रकारेंकरून । समाधान करी रघुनंदन । तैसेच परतले दोघेजण । आश्रमपंथ लक्षोनियां ॥४॥ इकडे कथानक काय जाहलें । मागें दशग्रीवें काय केलें । रूप अतीताचें[७] धरिलें । कापट्य करूनि ते वेळे ॥५॥ जानकी चंद्रमंडळ[८] सुंदर । तेथें राहु आला दशकंधर[९] । उभा राहिला रेखेबाहेर । दुराचार पापात्मा ॥६॥ कीं हरिणी देखोनि सुकुमार । न्यावया झेपावे जेवीं व्याघ्र । तैसा राक्षस रेखेबाहेर । अतीतवेषें उभा असे ॥७॥ रावण परम भयभीत । रेखा नुल्लंघवे यथार्थ । जैसा वडवानळ अद्‌भुत । शलभ कैसा ओलांडी ॥८॥ पुढें देखे उभा दशमुख । परी जानकी निर्भय निःशक । जैसा महेशापुढें[१०] मशक[११] । तैसा दशमुख उभा असे ॥९॥ इंद्रापुढें जैसा रंक । कीं ज्ञानियापुढें महामूर्ख । कीं केसरीपुढें[१२] जंबुक[१३] । कीं सूर्यापुढें खद्योत[१४] पैं ॥११०॥ कीं अग्नीपुढें पतंग । कीं खगेंद्रापुढें[१५] उरग । कीं राजहंसासमोर काग[१६] । तैसा खळ[१७] उभा तेथें ॥११॥

१. तापलेल्या शस्त्रांचे २. दुःखरूपी वेलीला ३. धनुर्धारी राम ४. लक्ष्मण ५. धनुष्याच्या टोकाने ६. यज्ञरक्षक श्रीराम ७. बैराग्याचे ८. चंद्र ९. रावण १०. श्रीशिवापुढे ११. डास १२. सिंहापुढे १३. कोल्हा १४. काजवा १५. गरुडापुढे १६. कावळा १७. दुष्ट

कीं नामापुढें पाप देख । कीं वेदापुढे चार्वाक । कीं शंकरापुढें मशक । मीनकेतन[1] जेवीं दिसे ॥१२॥ कीं पंडितापुढें अजापाळक[2] । कीं श्रोत्रियापुढें[3] हिंसक । कीं वासुकीपुढें[4] मंडूक[5] । लक्षण पाहूं पातला ॥१३॥ कीं अग्नीपुढें जैसें तृण । कीं ज्ञानापुढें अज्ञान । कीं महावातापुढें जाण । जळदजाळ[6] जैसें कां ॥१४॥ तैसा सीतेपुढें रावण । न्याहाळोनि पाहे तिचें वदन । मनीं म्हणे ऐसें निधान । त्रिभुवनामाजी दिसेना ॥१५॥ जगन्माता आदिशक्ती । तिचा अभिलाष धरितां चित्तीं । अवदसा आली रावणाप्रती । झोळी हातीं घेतली ॥१६॥ कामधेनु अभिलाषितां जाण । क्षय पावला सहस्रार्जुन । जालंधर पार्वतीलागून । अभिलाषितां भस्म जाहला ॥१७॥ तृणाचे वळईमाजी देखा । कैसी उगी राहे दीपकलिका । तैसें वाटे दशमुखा । स्पर्श कदा न करवे ॥१८॥ कापुराचा पुतळा । केवीं गिळील अग्निज्वाळा । तैसी न स्पर्शवे जनकबाळा । रावणाचेनि सर्वथा ॥१९॥ सीतेप्रति पुसे रावण । ये वनीं तूं कोणाची कोण । कां सेविलें घोर विपिन । काय कारण पुढें असे ॥१२०॥ मग जगन्माता बोले वचन । अयोध्याप्रभु रघुनंदन । मी त्याची ललना पूर्ण । कन्यका जाण जनकाची ॥२१॥ चंडीशकोदंड दारुण । रामें भंगिलें न लागतां क्षण । जो रावणबळदर्पहरण । मखरक्षण ताटिकांतक ॥२२॥ पाळावया पितृवचन । वनासी आले रघुनंदन । शूर्पणखेसी विटंबून । त्रिशिरा खर दूषण मारिले ॥२३॥ आतां रावण आणि कुंभकर्ण । या दोघां दुष्टांतें वधून । बंदींचे वृंदारक सोडवून । अयोध्येसी मग जाऊं ॥२४॥ वना गेले रामलक्ष्मण । ते आतां येतील न लागतां क्षण । तोंवरी बैसावें आपण । स्वस्थ मन करोनियां ॥२५॥ स्वहस्तेंकरूनि[7] जाण । तुम्हांसी पूजिती रघुनंदन । नावेक बैसावें म्हणोन । तृणासन घातलें ॥२६॥ भयभीत लंकानाथ । प्रवेश न करवे गुंफेआंत । सीता बाहेर न ये सत्य । चापरेखा उल्लंघोनि ॥२७॥ अतीत म्हणे हें राक्षसवन । तूं एकली येथे कामिन । बहुतेक आहेस राक्षसीण । आंत नेऊन गिळिसी मज ॥२८॥ त्वां आसन घातलें गुंफेंत । तरी मी आंत न यें यथार्थ । मज तूं खासी हें निश्चित । कळलें गत सर्व तुझें ॥२९॥ सीता म्हणे शिव हर हर । आम्ही राक्षस नव्हे जी साचार । असों अतीताचे किंकर । सत्य निर्धार जाण पां ॥१३०॥ रावण विचारी अंतरीं । ही न येचि गुंफेबाहेरी । मग मूर्च्छा घेऊनि उर्वीवरी[8] । लटिकाचि तो पडियेला ॥३१॥ म्हणे आतां फलाहाराविण । माझा जातो येथें प्राण । तूं गुंफेबाहेर येऊन । वदनीं माझ्या फळ घालीं ॥३२॥ तों गुप्तरूपें देव समस्त । जगन्मातेचें स्तवन करीत । तूं लंकेस जाऊन त्वरित । बंधमुक्त करीं आम्हां ॥३३॥ तुज स्पर्शतांचि रावण । भस्म होईल न लागतां क्षण । मग आम्हांस बंदींहून । सर्वथा कोणी न सोडवी ॥३४॥ तुझें करोनि निमित्त । लंकेस येईल रघुनाथ । तरी मुख्यरूप अग्नींत । करीं गुप्त जननीये ॥३५॥ तुझें प्रतिबिंबस्वरूप जाण । स्वयें नटेल हुताशन । रावणवंश भस्म करून । कार्यसिद्धि करील तो ॥३६॥ तरी मुख्यरूप गुप्त व्हावें । छायारूप तेथें जावें । ऐसें देव विनवीत आघवे । अवश्य म्हणे जानकी ॥३७॥ असो इकडे रावण । म्हणे धांव धांव जातो प्राण । मग जगन्माता[9] फळें घेऊन । रेखेजवळी पातली ॥३८॥ भिक्षा घालावयासी कर । सीतेनें केला रेखेबाहेर । तैसीच ओढोनियां सत्वर । निशाचरें[10] उचलिली ॥३९॥

---

१. मदन २. मेंढपाळ ३. वैदिकापुढे ४. वासुकी नावाच्या सापासमोर ५. बेडूक ६. मेघसमूह ७. स्वत:च्या हातांनी ८. पृथ्वीवर ९. सीता १०. रावणाने

आपलें स्वरूप लंकेश । दाविता जाहला जानकीस । म्हणे म्यां बंदीं घातले त्रिदश । वरीं नि:शंक मज आतां ।।१४०।। सीतेलागीं आलिंगीन । ऐसें मनीं भावी रावण । सीता म्हणे जाशील भस्म होऊन । न लागतां क्षण आतांचि ।।४१।। अग्नीस ओळंबा केवीं लागे। पतंग नुरे दीपासंगें । तुझा मृत्यु जवळी वेगें । आला जाण राक्षसा ।।४२।। रामपंचाननाची वस्तु[१] पूर्ण । जंबुका तूं नेतोसी चोरून । जैसें अन्नसदनीं रिघे श्वान । तैसा जाण तूं दशमुखा ।।४३।। खदिरांगारासी[२] वृश्चिक । पुच्छ हाणूं जातां देख । तैसा तूं भस्म होसी नि:शंक । सोडीं मज राक्षसा ।।४४।। परी न सोडीच रावण । घातली रथावरी नेऊन । गुंफेभोंवतीं जे ब्राह्मण । भयेंकरून पळाले ।।४५।। गृहस्थासी पडतां विषमकाळ । आश्रित पळती जैसे सकळ । तैसे ब्राह्मण रानोमाळ । भयेंकरून पळताती ।।४६।। सीता जाहली दीनवदन । म्हणे कोठें रामलक्ष्मण । करुणास्वरें हांक फोडून । धांवा करी राघवाचा ।।४७।। तों निराळमार्गें[३] रथ । पळवीत जाय लंकानाथ । दीर्घस्वरें आक्रंदत । जनकदुहिता ते काळीं ।।४८।। नानावृक्षवनचरांप्रती । हांक फोडून सीता सती । म्हणे सत्वर सांगा रघुपती । राक्षस नेतो म्हणोनियां ।।४९।। सीतेची करुणा देखोन । पशु पक्षी करिती रुदन । वृक्ष आणि पाषाण । दु:खेंकरून उलताती ।।१५०।। सीता म्हणे श्रीरामा । अपर्णावरमनोविश्रामा[४] । पद्मजातजनका[५] पूर्णब्रह्मा । धांवें आतां लौकरी ।।५१।। हे ताटिकांतका रघुवीरा । हे मखपाळका समरधीरा । अहल्योद्धारा परम उदारा । धांवें सत्वर ये वेळे ।।५२।। रावण हा सर्प दारुण । जिव्हारीं झोंबला जातो प्राण । तूं सुपर्णवहना[६] गारुडी पूर्ण । झडप घालोनि पाव वेगीं ।।५३।। रावण नव्हे हा सबळ मातंग[७] । पंचानना धांव तूं सवेग । वियोगानलें[८] जाळिलें सर्वांग । करुणाघन[९] वर्षें तूं ।।५४।। जो परम साधु सुमित्रासुत । पवित्र जैसा केवळ आदित्य । त्यासी छळितां रघुनाथ । मज अंतरला आतांचि ।।५५।। जो करील साधूचें छळण । नसतेंच ठेवी त्यासी दूषण । तरी जन्मोजन्मीं वंशखंडण । नरक दारुण भोगील तो ।।५६।। साधुछळक दुराचारी । त्याचे भारें कांपे धरित्री । ईश्वर सर्व दोष क्षमा करी । तारी भवसागरीं पतिता ।।५७।। परी पतित जो संतछळक । त्यासी दु:खें भोगवी अनेक । त्या दुष्टाचें न पाहावें मुख । पापी निष्टंक साधुद्रोही ।।५८।। दरिद्र दु:ख विघ्नें बहुत । त्यावरीच कोसळती समस्त । सध्या मजचि आली प्रचीत । राक्षस नेत धरोनियां ।।५९।। जानकीचे विलाप ऐकोन । चराचर जीव करिती रुदन । जटायु धांविन्नला देखोन । क्षोभला पूर्ण काळ जैसा ।।१६०।। काया थोर गिरिसमान । वज्रचंचू परम तीक्ष्ण । तिखट नखें विद्रुमवर्ण[१०] । रावणावरी कोसळला ।।६१।। जटायु म्हणे रे दुर्जना । महानिष्ठुरा खळा मलिना । सांडीं वेगीं श्रीरामललना । नाहीं तरी प्राणा मुकशील ।।६२।। दीपाचे पोटीं होय काजळ । तैसा ब्रह्मवंशीं तूं चांडाळ । तुझें छेदीन शिरकमळ । सांडीं वेल्हाळ जानकी ।।६३।। कासया केलें वेदाध्ययन । काय कोरडें ब्रह्मज्ञान । जळो तुझें तपश्चरण । शिवभजन व्यर्थ केलें ।।६४।। जो जगद्वंद्य जगदुद्धार । त्याची वस्तु नेसी तूं तस्कर । तुझे कर्ण नासिक समग्र । छेदोनि आजि टाकीन ।।६५।। असो धनुष्य घेऊनि रावण । जटायूवरी सोडी बाण । येरू चंचुघातेंकरून । शर मोडोन टाकीत ।।६६।। तों रिता जाहला तूणीर । जटायूस न लागे एक शर । परम प्रतापी तो अरुणपुत्र[११] । केलें विचित्र ते काळीं ।।६७।। चंचुघातें परम दारुण । मारिले अश्व मोडिला स्यंदन[१२] । सारथियाचें शिर छेदोन । न लागतां क्षण पैं नेलें ।।६८।।

१. धर्मपत्नी २. निखाऱ्याला ३. आकाशातून ४. भगवान शंकराच्या मनाला शांत करणारा ५. ब्रह्मदेवपिता ६. गरुडवाहना ७. हत्ती ८. वियोगाच्या अग्नीने ९. दयारूपी ढग १०. लाल ११. जटायू १२. रथ

मुकुट धनुष्य तूणीर । झडप घालोनि नेलें समग्र । चूर्ण केले वस्त्रालंकार। दशकंधर नग्न उभा ॥६९॥ रावणमस्तकींचे केश । उपडोनि टाकिले नि:शेष । क्षपणक[१] जैसा लंकेश । नि:शस्त्री नग्न उभा असे तो ॥१७०॥ गगनींहून अकस्मात । रावणावर पडे जैसा पर्वत । चंचुघातें समस्त । मस्तकें दाही फोडिलीं ॥७१॥ रुधिरें जाहला बंबाळ । जैसा कुंकुमें माखिला शैल[२] । सांडिली जानकी वेल्हाळ । घेतला पळ रावणें ॥७२॥ हृदयीं बोध ठसावतां समग्र । नि:शेष पळे अहंकार । सीता टाकोनि दशकंधर । पळे तैसा भयेंचि ॥७३॥ मनीं विचारी लंकानाथ । पांखरें मज गांजिलें बहुत । मग उभा राहोनि तेथ । पाचारीत जटायूतें ॥७४॥ म्हणे तुज रघुनाथाची आण । सांगें तुझें मृत्यंग[३] कोण । मीही सांगतों आपुले मरण । युद्धकंदन मग करूं ॥७५॥ जटायु म्हणे पक्ष उपडितां । मज मृत्यु तेव्हांच तत्त्वतां । तुझें मरण लंकनाथा । तैसेंच सांगें त्वरेनें ॥७६॥ येरू म्हणे चरणांगुष्ठ[४] फोडितां । मी मृत्यु पावेन क्षण न लागतां । जटायु यावयासी हाता । राक्षसेंच केला उपाय ॥७७॥ जटायूनें धांवूनि आंवळिला । दशमुखाचा अंगुष्ठ फोडिला । येरें घालोनि ते वेळां । दोन्ही पक्ष उपडिले ॥७८॥ भडभडां चालिलें रुधिर । कासावीस जाहला तो द्विजवर[५] । म्हणे केव्हां येईल रघुवीर । हा समाचार सांगेन तया ॥७९॥ स्कंदतातमित्रांगना[६] । स्कंधी घेवोनि राक्षसराणा[७] । गति थोडी वाटे पवना । निराळमार्गें तेवीं जाय ॥१८०॥ जटयुकारणें अत्यंत । जनकतनया शोक करीत । निजकरें ललाट पिटीत । आक्रंदत दीर्घस्वरें ॥८१॥ म्हणे जटायु भक्त पूर्ण । मजकारणें वेंचिला प्राण । मी रामपितृव्य[८] म्हणोन । दशरथासमान मानिला ॥८२॥ ऐसी सीता शोक करीत । रावण निराळमार्गें जात । तों मातंगपर्वतावरी अद्भुत । पांच वानर उभे असती ॥८३॥ सुग्रीव नळ नीळ जांबुवंत । पांचवा महारुद्र हनुमंत । ज्याचा बळप्रताप अद्भुत । व्यासवाल्मीकीं वर्णिला ॥८४॥ उपजतांचि बाळपणीं । क्षणें आकळिला जेणें तरणी । इंद्रादिक निर्जर समरांगणीं । जर्जर केले प्रतापें ॥८५॥ अंतरिक्षें जातां दशकंधर । जानकी फाडी चीरपदर[९] । अलंकार बांधोनि समग्र । मारुतीकडे टाकिले ॥८६॥ ते ग्रंथि घेऊन हनुमंतें । निराळमार्गें पाहे वरुतें । तों राक्षस जाय गगनपंथें । जानकीतें घेवोनि ॥८७॥ हांक फोडीत सुंदरा । धांव रामा राजीवनेत्रा । घनश्यामा कोमळगात्रा । वंद्य त्रिनेत्रा विधीतें ॥८८॥ हे रामा जगदंकुरकंदा । हे ताटिकांतका ब्रह्मानंदा । हे राक्षसांतका जगद्वंद्या । पाव एकदां मजलागीं ॥८९॥ ऐसें ऐकतां हनुमंत । मनीं आवेशला अत्यंत । म्हणे कोणा सभाग्याची वस्त । राक्षस नेतो चोरूनि ॥१९०॥ मारोनियां रजनीचर । सोडवूं आतां हे सुंदर । तिचा शोधीत येईल भ्रतार । देऊं तयासी साक्षेपें ॥९१॥ जैसा देखतां वारण । अकस्मात पडे पंचानन । भयभीत जाहला रावण । म्हणे हें विघ्न दूसरें ॥९२॥ मारुतीचें उड्डाण अद्भुत । गेला ध्रुवमंडळापर्यंत । तों रावण प्रवेशला लंकेंत । अदृश्य होत क्षणमात्रें ॥९३॥ काळाचे दाढेंत पडतां उरला । सर्पमुखींचा मूषक पळाला । मृगेंद्रकवेंतून[१०] वांचला । पूर्वभाग्यें जंबुक ॥९४॥ व्यर्थ गेलें कपीचें उड्डाण । मनीं म्हणे अंजनीनंदन । पुढें याचा सूड घेईन । बहुत गांजीन राक्षसां ॥९५॥ मग अवनिजेचे[११] अलंकार । अवनिगर्भीं[१२] ठेवीत वानर । इकडे लंकेंत दशकंधर[७] । काय करिता जाहला ॥९६॥ परम सबळ अठरा राक्षस । त्यांसी आज्ञापी लंकाधीश[७] । म्हणे जाऊनि पंचवटीस । शोधा रामासी साक्षेपें ॥९७॥ राघवा आणि लक्ष्मणा । वधोनि यावें दोघांजणां । त्यांहीं मस्तकीं वंदोनि आज्ञा । उत्तरपंथें चालिले ॥९८॥

१. भिक्षू २. पर्वत ३. मर्मस्थान ४. पायाचा अंगठा ५. श्रेष्ठ पक्षी ६. सीता ७. रावण ८. रामाचा काका ९. वस्त्राचा पदर १०. सिंहाच्या पंजातून ११. सीतेचे १२. भूमीमध्ये

कीं काळें बोलावूं पाठविलें। आयुष्यसिंधूचें जळ आटलें। कीं मृत्यूपुरीस चालिले। स्थळ पाहावया रावणा ॥१९९॥ रावण सीतेस एकांतीं । नेऊन मग बहुत प्रार्थी । पायीं लागे लंकापती । काकुळती येतसे ॥२००॥ वैभवसंपत्ति दावी समस्त । वर्णी आपुला पुरुषार्थ । म्यां बंदीं घातले देव समस्त । मज त्वरित वरीं कां ॥१॥ लाज न धरी कामातुर । मरण नेणे प्रतापशूर । मद्यपियास सारासार । कांहीं विचार समजेना ॥२॥ कामुकासी नव्हेचि विरक्ती । मैंदासी[1] काय हरिभक्ती । व्याघ्रासी उपजेल शांती । काळत्रयीं घडेना ॥३॥ असो लाज सोडोनि दशवदन । म्हणे जानकी ऐक वचन । एकराशी रामरावण । लावीं लग्न ऐक्यत्वें ॥४॥ चित्रा नक्षत्र तूळराशी । समान रामरावणांसी । तरी तूं अवज्ञा कां करिसी । बोल वेगें शुभानने ॥५॥ जानकी म्हणे दशमुखा । तस्करा महामलिना मूर्खा । पतंग आलिंगितां दीपिका । कैसा मग वांचेल ॥६॥ प्रळयाग्नींत स्नान करूनी । मशक केवीं येईल परतोनि । वासुकीचा विषदंत पाडूनी । मूषक कैसा आणील ॥७॥ मृगेंद्रजिव्हेचें[2] मांस देख । तोडूनि केवीं वांचेल जंबुक । आदित्यमंडळ[3] मंडूक । पाडील कैसें भूमीतें ॥८॥ सौंदणी[4] आणि समुद्र । दोन्ही एकराशी साचार । वायस आणि वैनतेय पक्षींद्र[5] । एकराशी होतसे ॥९॥ सिंह आणि शृगाल[6] जाण । मशक महेश राशी समान । तम आणि तरणि[7] पूर्ण । केवीं समान सांग पां ॥२१०॥ रजक[8] आणि रमावर । कुक्कुट आणि कुंजर[9] । रजनीचर आणि रघुवीर । केवीं समान सांग पां ॥११॥ कंटक आणि कंजलोचन[10] । कपटी आणि कमळासन । तैसा राम आणि रावण । राशिगुण कासया ॥१२॥ मदनें सर्वांसीं जिंकिलें । परी शिवापुढें तें न चाले । अग्नीनें सर्वांसि जाळिलें । परी मेघापुढें काय तो ॥१३॥ सर्वांसी गांजिसी तूं परम । परी मज स्पर्शतां होसी भस्म । आतां तुज वधावया रघूत्तम । पूर्णकाम येईल ॥१४॥ मनीं भावी रावण । हिचें जों स्थिरावे मन । तोंवरी अशोकवनीं नेऊन । ठेवूं ईतें रक्षोनियां ॥१५॥ मग त्रिजटेचेनि अनुमतें । अशोकवनीं ठेवी जानकीतें । भोंवतीं दृढ रक्षणें[11] बहुतें । ठायीं ठायीं ठेविलीं ॥१६॥ अशोकवनाबाहेर । पांच कोटी रजनीचर । सावध बैसले अहोरात्र । नव्हे संचार वायूचा ॥१७॥ निधानाभोंवत्या भूतावळी । रक्षिती जैशा सर्वकाळीं । तैशा राक्षसी सीतेजवळी । वेष्टोनियां बैसल्या ॥१८॥ सत्त्वशीळ बिभीषण । साधु पुण्यपरायण । म्हणे सीता आणून संपूर्ण । कुळक्षय मांडिला ॥१९॥ रावण परम कामातुर । जाहला उन्मत्त अनिवार । तप्त जाहलें शरीर । नावडे उपचार विलास ॥२२०॥ ब्रह्म्यासी म्हणे रावण । पुरे तुझें वेदाध्ययन । अंगिरापति[12] तुझें ज्ञान । ठेवीं झांकोन क्षणभरी ॥२१॥ किन्नर हो पुरे गायन । नका चेतवूं पंचबाण[13] । सीतेच्या भोगालागीं प्राण । कासाविस होताती ॥२२॥ सकळ गंगा घरीं राबत । तयांसी म्हणे लंकानाथ । शीतळ उपचार बहुत । करा आतां मजलागीं ॥२३॥ बोलावूनि राक्षसिणी । रावण सांगे त्यांचे कर्णीं । सीतेसी तुम्ही भेडसावुनी[14] । मम शयनीं वश करा ॥२४॥ अवश्य म्हणती निशाचरी[15] । अमंगळा धांविन्नल्या एकसरी । म्हणती सीते तूं रावणासी वरीं । नाहीं तरी तुज भक्षूं ॥२५॥ विकट रूप विशाळकर्णी । एक वक्रमुख लंबस्तनी । बाबरझोटी आरक्तनयनी । भेडसाविती सीतेतें ॥२६॥ खरमुखा व्याघ्रवदना । सूकरगजमुखा लंबचरणा । ज्यांच्या नासिकांमाजी जाणा । खर तुरंग गुंतले ॥२७॥

१. लबाडास २. सिंहाच्या जिभेचे ३. रविमंडल ४. धोब्याचा हौद ५. गरुड ६. कोल्हा ७. सूर्य ८. धोबी ९. हत्ती १०. कमळनेत्र ११. रक्षक १२. बृहस्पती १३. मदन १४. भीती दाखवून १५. राक्षसिणी

एकी स्तनचपेटेकरूनी । झाडें टाकिती मोडूनी । एकपदा द्विपदा त्रिचरणी । खाऊं म्हणती सीतेतें ॥२८॥ परम कुरूप कुत्सित वर्ण । अमंगळ दुर्गंधें विटे मन । एक म्हणे इचे नरडीं बैसोन । घोट घेऊं आतांचि ॥२९॥ एक म्हणती काढा शिरा । दांत खाती करकरां । डोळे वटारिती पुढारां । हांका देती आक्रोशें ॥२३०॥ ऐसें करिती राक्षसिणी । परी ते त्रिभुवनपतीची[१] राणी । निर्भय परम अंत:करणीं । कदा न गणी तयांसी ॥३१॥ संसारदु:खें नानागती । ज्ञानियांचे अंगीं आदळती । परी ते सहसा न गणिती । सीता सती तैशीच ॥३२॥ बहुत भुंकती श्वान । परी कदा न भी वारण । कीं जंबुकहाकें[२] पंचानन । कदा दचकोनि उठेना ॥३३॥ कीं सुटतां झंझामारुत[३] । धुळीनें तृण बहुत उडत । परी बैसक[४] न सोडी पर्वत । निर्भय सत्य सीता तैसी ॥३४॥ जैसी कागांमाजी कोकिळा । तैसी त्रिजटा पुण्यशीळा । राक्षसी दटावून सकळा । दूर केल्या साक्षेपें ॥३५॥ त्रिजटा म्हणे जनकनंदिनी । तूं चिंता न करीं मनीं । तुज भेटेल कोदंडपाणी[५] । अल्पकाळेंकरूनियां ॥३६॥ वर्तमान अयोध्येपासोनी । जें जें वर्तलें जनस्थानीं । त्रिजटेप्रति जनकनंदिनी । सांगे सकळ प्रीतीनें ॥३७॥ सिंहावलोकनेंकरून । परिसा मागील चरित्र पूर्ण । मृग वधोनि रामलक्ष्मण । आश्रमासी पातले ॥३८॥ ते कथा गोड अत्यंत । श्रवण करोत ज्ञाते पंडित । रसिक रामविजय ग्रंथ । श्रवणें समस्त कोड पुरे ॥३९॥ अयोध्याधीशा ब्रह्मानंदा । श्रीधरवरदा आनंदकंदा । अभंग अक्षय अभेदा । वेदवंद्या सुखाब्धे ॥४०॥ स्वस्ति श्रीरामविजय ग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत भक्त चतुर । पंचदशाध्याय गोड हा ॥२४१॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ओंव्या २४१ ॥

॥ अध्याय पंधरावा समाप्त॥

१. श्रीरामपत्नी सीता २. कोल्हाच्या ओरडण्याने ३. सोसाट्याचा वारा ४. जागा ५. श्रीराम

## ॥ अध्याय सोळावा ॥

# राम-लक्ष्मणांचे सीतेच्या शोधार्थ दक्षिणेकडे जाणे

॥ श्रीगणेशाय नमः॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः। श्रीरामकथा अति सुरस । सकल तीर्थांहूनि तीर्थ विशेष । गंगेपरीस निर्दोष । निजभक्तांसी प्रिय होय ॥१॥ इहपरत्रतीरे[1] साचार । रघुवीरचरित्र निर्मळनीर । दाटला पूर्ण प्रेमपूर । गर्जे थोर रामघोषें ॥२॥ गंगेमाजी वाहे जीवन । कथासरिता ते जगज्जीवन । चित्तवृत्तिजळचरें पूर्ण । माजी निमग्न तळपती ॥३॥ तेथें घडिघडि डहुळे पाणी । रामकथा निर्मळ अनुदिनीं । ब्रह्मानंदें उचंबळोनी । पुनीत करी त्रिभुवना ॥४॥ गंगेमाजी बुडतां मरावें । येथें बुडी देतां तरावें । हें विशेष कर्तृत्व स्वभावें । गंगेहूनि अधिक पैं ॥५॥ रामकथा करितां श्रवण । सकळही तीर्थीं केलें स्नान । तें फळ आलें हाता पूर्ण । विशेष जाण रामकथा ॥६॥ ऐसी रघुवीरकथा पावन । वरी संतश्रोते सावधान । तरी वक्तयाचा हर्ष पूर्ण । गगनामाजी न समाये ॥७॥ पंधरावे अध्यायीं कथा सुंदर । सीतेस घेऊन गेला दशवक्त्र । मृग वधोन रामसौमित्र । पंचवटीये परतले ॥८॥ मार्गी होती अपशकुन । चालतां जड जाहले चरण । आश्रमांत पाहती येऊन । दिसे शून्य भणभणित ॥९॥ जैसें प्राणाविण कलेवर[2] । कीं उदकाविण सरोवर । कीं नासिकाविण वक्त्र । शोभिवंत दिसेना ॥१०॥ फळाविण तरुवर । कीं सैन्याविण नृपवर । कीं वंशी नसतां कन्याकुमार[3] । व्यर्थ मंदिर ज्यापरी ॥११॥ कीं दयेवांचूनि ज्ञान । कीं प्रेमाविणें कीर्तन । कीं बुबुळाविण नयन । गुंफा शून्य तेवीं दिसे ॥१२॥ ऋषींप्रति पुसावें वर्तमान । तंव ते पळाले कुटुंबें घेऊन । दशदिशा दिसती शून्य । रघुनंदन गहिंवरला ॥१३॥ नेत्रीं चालिल्या अश्रुधारा । सीता कोठें सांग सौमित्रा । ऐसें बोलतां नवपंकजनेत्रा[4] । मूर्च्छना आली ते वेळीं ॥१४॥ निचेष्टित पडे रघुनंदन । वारा घालीत लक्ष्मण । नेत्रांस लावोनि जीवन । जगज्जीवन सावध केला ॥१५॥ देवाधिदेव आत्माराम । नीलग्रीव जपे ज्याचें नाम । त्यासी कां जाहला मोहभ्रम । नवल परम हें वाटे ॥१६॥ अंधकूपीं बुडाला दिनकर[5] । प्रळयाग्नीस बाधी शीतकर[6] । कल्पवृक्ष दारोदार । मागेल भिक्षा कासया ॥१७॥ काळासी भूतें झडपिती । मृगजळीं बुडाला गभस्ती[7] । म्हणोनि सीतेसाठीं रघुपती । करी खंती नवल[8] हे ॥१८॥ तो पुराणपुरुष रघुनंदन । मायातीत शुद्धचैतन्य । परी मायेचा अभिमान पूर्ण । मायामय लटिकाचि ॥१९॥ दावी वर्तोनि जगद्गुरु । करोनि मायामय पसारु[9] । ही जगीं वोडंबरी[10] दावी रघुवीरु । मायामय लटिकीच ॥२०॥ असो वसिष्ठें उपदेशिलें ज्ञान । कीं सर्वद्रष्टा एक आपण । हा जगडंबर[11] भास पूर्ण । मायामय लटिकाचि ॥२१॥ जैशा स्वप्नींच्या जन्मपंक्ती । यातना भोगी नानागती । जागा होतां निश्चितीं । मिथ्यामय[12] सर्वही ॥२२॥ स्वप्नामाजी पतिव्रता । जैसें मरण देखे प्राणनाथा । परी सवेंचि जागी होतां । सौभाग्य पाहतां तैसेंचि ॥२३॥ घट फुटतां चंद्रबिंब । तैसेचि असे स्वयंभ । तरी अवतारलीला सीतावल्लभ । संपादोनि दावीतसे ॥२४॥

---

१. इहलोक व परलोक हे दोन तीर २. मृत शरीर ३. संतान ४. कमलनेत्र श्रीरामाला ५. सूर्य ६. चंद्र ७. सूर्य. ८. आश्चर्य ९. विस्तार १०. लटकेपणा ११. सृष्टी १२. केवळ भास

असो सौमित्रीस म्हणे रघुनाथ । भोंवतें वृक्ष आणि पर्वत । यांसी पुसों यथार्थ । सीताशुद्धी ते सांगती ॥२५॥ गिरिकंदरीं गिरिमाळ । शोधीत जात तमाळनीळ । गोदातीरीं निर्मळ । शोधी सकळ सौमित्री ॥२६॥ वनोवनीं राम धांवत । सीते सीते आळवीत । कुरंगनयने[1] भेट त्वरित । शोकें बहुत व्यापलें ॥२७॥ बदक चातक राजहंस । मयूर रावे साळ्या सरस । तयांसी पुसे अयोध्याधीश । कोठें डोळस जानकी ॥२८॥ मृग शार्दूळ सिंह उरग । नकुळ[2] सूकर कस्तूरीमृग । कोकिळा चक्रवाकें भृंग । सीतारंग[3] पुसे तयां ॥२९॥ कोणी न देती उत्तर । त्यांवरी कोपला रघुवीर । सौमित्रे आणीं धनुष्य शर । छेदीन कांतार[4] सर्वही ॥३०॥ सौमित्री म्हणे रघुनंदना । हे केवीं जाणती तुझी अंगना । यांवरी कोप राजीवनयना । सहसाही न करावा ॥३१॥ सीताविरहें रघुनंदन । भुलोनि बोले काय वचन । लक्ष्मणासी पुसे तूं कोण । काय कारण येथें उभा ॥३२॥ तेव्हां सौमित्री बोले वचन । श्रीरामाचा बंधु मी पूर्ण । मग बोले वेदवंद्य रघुनंदन । राम तो कोण कोठील ॥३३॥ भवकोदंड[5] भंगिलें थोर । तोचि राम समरधीर । मग बोले सीतावर । धनुष्य कोठें भंगिलें ॥३४॥ जनकाचिया मंडपांत । धनुष्य भंगिलें यथार्थ । जनक कोणाचा कोण निश्चित । सांग मज आतांचि ॥३५॥ जानकीचा जो पिता । तो जनक जाण रघुनाथा । अहा जानकी गुणसरिता । मज आतांचि दावीं रे ॥३६॥ सौमित्रीसी म्हणे रघुवीर । आमुचें कोठें ग्राम मंदिर । येरू म्हणे अयोध्यापुर । सेविलें कांतार पित्राज्ञें ॥३७॥ वना आलों कोण कोण । उत्तर देत सुमित्रानंदन । तुम्ही आम्ही सीताचिद्रत्न । तिघें जण आलों वना ॥३८॥ तरी जानकी दावीं त्वरित । ऐसें बोले रघुनाथ । भूमीवरी पडे मूर्च्छागत । सौमित्री मग सांवरी ॥३९॥ तों अस्ता गेला दिनकर । रात्रीमाजी प्रगटे रोहिणीवर[6] । राम म्हणे रे जाळितो मित्र । अति तीव्र बहुत कां ॥४०॥ मग बोले सुमित्रासुत । स्वामी हा चंद्र नव्हे आदित्य । शीतळकिरण उष्ण वाटत । सीताविरहेंकरूनियां ॥४१॥ श्रीरघुनाथ देवाधिदेव । दावी इत्यादि बहुत भाव । जो अज अजित स्वयमेव । उमाधव ध्याय जया ॥४२॥ सीते सीते म्हणोन । आलिंगीत वृक्ष पाषाण । तों तत्काळ ते उद्धरोन । जाती बैसोन विमानीं ॥४३॥ सौमित्रीसी म्हणे रघुनंदन । चला घेऊं अगस्त्याचें दर्शन । त्यासी सांगतां वर्तमान । बुद्धि तो पूर्ण सांगेल ॥४४॥ अगस्त्याचे आश्रमाप्रती । तत्काळ राम सौमित्री येती । तों द्वारपाळ जाऊं न देती । उभे करिती तयांतें ॥४५॥ कलशोद्भवासी[7] वर्तमान । सेवक सांगती जाऊन । तों सीता गेला घेऊनि रावण । ऋषीस ज्ञानीं समजलें ॥४६॥ अंतरीं विचारी मुनी । राम राज्य सांडोनि हिंडे वनीं । हरविली जनकनंदिनी । शोकेंकरून व्यापिला ॥४७॥ स्त्रीविरहित रघुनंदन । आतां न घ्यावें त्याचें दर्शन । मग सेवकांहातीं सांगोन । पाठविलें ते काळीं ॥४८॥ आजि दर्शन नाहीं तुम्हांतें । मागुती जावें आलिया पंथें । हांसें आलें रघूत्तमातें । हृदय ऋषींचें जाणोनि ॥४९॥ परतोनि चालिला रघुवीर । परम क्रोधावला सौमित्र । म्हणे निर्दय कठिण विप्र[8] । जगदुद्धार परतविला ॥५०॥ ज्योतिर्लिंग जाणोन । लत्ताप्रहारें केलें ताडण । कामधेनु आली आपण । तयें डांगेवरी[9] मारिली ॥५१॥ कल्पतरु द्वारीं उगवला । तो देखतांचि अभाग्यें उपडिला[10] । परीस जाणोनि गोफणिला । चिंतामणी घातला पायरीस ॥५२॥ अमृतकुंभ दैवें लाधला । तो जाणोनि बळेंच उलंडिला[11] । जगद्वंद्य घरासी आला । माघारा दवडिला समजोनि ॥५३॥

१. हरिणाक्षी २. मुंगूस ३. श्रीराम ४. अरण्य ५. शिव-धनुष्य ६. चंद्र ७. ऋषी अगस्तीला ८. ब्राह्मण ९. शरीराच्या मागच्या भागाला १०. उपटला ११. ओतून टाकला

मग बोले रघुनंदन । अगस्त्य ऋषी परम सज्ञान । तो सीतेविण माझें दर्शन । सहसाही न घेचि ॥५४॥ मी निर्विकार निर्गुण । सीता सर्वांसी कारण । तिनें मज जागें करून । सगुणत्वासी आणिलें ॥५५॥ तिनें निर्मून पंचभूतें । त्रिगुण आणि तत्त्वें समस्तें । अवतारखेळ कौतुकें बहुतें । दावी जनां तेचि पै ॥५६॥ मी अरूप अनाम निश्चितीं । हें सर्व जाणे अगस्ती । तो ऋषींमाजी केवळ गभस्ती । तपें ज्ञानें तेजस्वी जो ॥५७॥ असो श्रीराम जगजेठी[1] । परतोनि आला पंचवटी । वृक्ष गुल्म लता कवळी पोटीं । सीता सीता म्हणोनियां ॥५८॥ पंचवटीचा त्याग करून । तत्काळ चालिला रघुनंदन । जैसी अहंदेहबुद्धि सांडोन । योगी विचरे निरंजनीं ॥५९॥ कीं प्राण त्यागिलिया काया जैसी । कीं कोपत्यागें जमदग्नि ऋषी । कीं संसारमाया निश्चयेंसीं । विरक्त त्यागी मनांतुनी ॥६०॥ जीर्ण देह त्यागोनि उरग । कीं तपोधन करी कामत्याग । कीं पवित्र त्यागी कुमार्ग । श्रेष्ठ कर्म जाणोनियां ॥६१॥ कीं परनिंदा सज्जन टाकिती । आत्मस्तुति सांडिजे संतीं । कीं अमंगळाची संगती । न धरिती श्रोत्रिय कदाही ॥६२॥ कीं संसारदु:खें दारुण । विवेकी त्यागी जैसें वमन । तैसी पंचवटी त्यागोन । राम लक्ष्मण चालिले ॥६३॥ तों मग देखे रघुनंदन । द्वादश हात लांब चरण । चार हात रुंद पूर्ण । राक्षसपाउलें उमटलीं ॥६४॥ त्यांजवळी कुंकुमांकित जाण । सीतेचे उमटले दोन्ही चरण । मुक्तें विद्रुमें पडलीं गळोन । लक्ष्मण पाहे विस्मित ॥६५॥ कमळिणीमित्रकुळभूषण[2] । शोधीत जात घोर विपिन । तों जटायु देखिला दुरोन । रक्तेंकरून बंबाळ ॥६६॥ किंशुक फुलला बहुत । जैसा दुरोन आरक्त दिसत । तैसा जटायु पडला तेथ । रामस्मरण करीतचि ॥६७॥ रघुनाथें भाते घेतले । धनुष्य वेगीं चढविलें । श्रीरामासी ऐसें भासलें । कीं हा राक्षस बैसलासे ॥६८॥ भक्षोनिया जनकनंदिनी । बैसलासे तृप्त होउनी । रक्त वाहत चहूंकडोनी । पर्वतीं जैसा पाझर ॥६९॥ जवळी आला चापपाणी । तों रामनामाची मधुर ध्वनी । ती रघूत्तमें ऐकोनि श्रवणीं । येत धांवोनि समीप ॥७०॥ तों डोळां उरलासे प्राण । जटायु पडिला करीत स्मरण । रघुनाथ तो भक्त देखोन । हृदयीं पूर्ण गहिंवरला ॥७१॥जटायूस पुढें घेऊन देख । शोक करी अयोध्यानायक । कीं एकुलतें मरतां बाळक । माता तळमळे ज्यापरी ॥७२॥ कीं परम मित्र बंधु रणीं । पडलिया वाटे जेवीं हानी । त्याचपरी चापपाणी । हृदयीं धरोनि विलपत ॥७३॥ परम खेद करी सौमित्र । म्हणे जटायु भक्त आणि मित्र । जो मित्रसारथियाचा[3] पुत्र । ऐसा पवित्र नाढळे ॥७४॥ जटायूस म्हणे रघुवीर । बा रे काय जाहला समाचार । तो मज सांग अणुमात्र । जरी शक्ति असेल बोलावया ॥७५॥ श्रीरामाचे कर्णयुगलीं । हळूच जटायु सांगे ते वेळीं । रावणें सीता लंकेसी नेली । म्यां सोडविली होती येथें ॥७६॥ भोंवतें जों पाहे रघुनंदन । तों अश्व सारथी आणि स्यंदन । रावणाचीं वस्त्रें अलंकार पूर्ण । चूर्ण होऊन पडियेलीं ॥७७॥ पाहतां जटायूचा पराक्रम । पुढती गहिंवरे रघूत्तम । सीताशोकाहून परम । शोक वाटे जटायूचा ॥७८॥ जटायु बोले वचन । रघुपति तुझी घालोनि आण । राक्षसें घेतला माझा प्राण । पक्ष उपडोनि टाकिले ॥७९॥ माझ्यानें आतां न बोलवे देख । म्हणोनि पदीं ठेविला मस्तक । श्रीरामाचें नेत्रोदक[4] । अभिषेक करी जटायूतें ॥८०॥ मग बोले रघुनंदन । जटायु तुज मी उठवीन । मज तूं साह्य होईं पूर्ण । दशरथाऐसा सत्वर ॥८१॥ मग बोले अरुणनंदन[5] । ऐसें मज पुढें न ये मरण । तुझे अंकावरी[6] जाण । सोडीन प्राण आतांचि ॥८२॥

१. जगात सर्वश्रेष्ठ २. श्रीराम ३. अरुणाचा पुत्र जटायू ४. डोळ्यांतील अश्रू ५. जटायू ६. मांडीवर

जटायु विलोकी रामवदन । हृदयीं रेखिलें तैसेंचि ध्यान । मुखें करीत नामस्मरण । चालिला प्राण ते काळीं ॥८३॥ श्रीरामें तेव्हां हृदयीं धरिला । तेथेंच जटायूनें प्राण सोडिला । ब्रह्मा हंसविमान घेऊन आला । वरी बैसविला जटायु ॥८४॥ जटायूस म्हणे रघुनंदन । तुज स्वर्गीं भेटेल दशरथ जाण । त्यासी सीता नेली हें वर्तमान । सहसाही न सांगावें ॥८५॥ परम प्रतापी दशरथ पिता । कर्मभूमीस येईल मागुता । यालागीं न सांगावी हे वार्ता । जाण तत्त्वतां जटायो ॥८६॥ मी रावणासी वधोनी । पाठवीन स्वर्गभुवनीं । मग तोचि स्वमुखेंकरूनी । वृत्तांत सर्व सांगेल ॥८७॥ असो जटायु स्वर्गास पावला । रघुनाथें तो पितृव्य मानिला । दशरथें बंधु म्हणविला । शक्राचिया[1] युद्धकाळीं[1] ॥८८॥ यालागीं जनकजामातें । पितृव्य मानिलें जटायूतें । त्याचेनि संगें सीताकांतें । पंचवटीत काळ क्रमियेला ॥८९॥ घडीघडी येवोनि बैसे । श्रीराम त्यासी गोष्टी पुसे । जटायु भक्त विशेषें । रघुपतीचा आवडता ॥९०॥ त्याची उत्तरक्रिया समस्त । करिता जाहला कौसल्यासुत । सौमित्रें काष्ठें मेळवून बहुत । अग्नि दिधला तयासी ॥९१॥ ऐसा भक्तकरुणाकर[2] । शरणागतां वज्रपंजर[3] । पुढें चालिला राघवेंद्र । सीता सुंदर शोधावया ॥९२॥ दक्षिणपंथें दंडकारण्यांत । जेथें जेथें राहिला रघुनाथ । शिवलिंग स्थापिलें तेथ । बाणचिन्हांकित अद्यापि ॥९३॥ मयूरगिरि परम गहन । तेथें आला अहल्योद्धारण । हे सीते हे सीते म्हणोन । वृक्षपाषाण आलिंगी ॥९४॥ तों कैलासीं वर्तलें नवल । बैसला असतां जाश्वनीळ[4] । हातीं घेऊनि जपमाळ । जपे कोमळ रामनाम ॥९५॥ जेणें शमलें हाळाहळ । तें सहस्रनामांहूनि निर्मळ । चंद्रापरीस अति शीतळ । अमृताहून गोड पैं ॥९६॥ जें दिनकरापरीस तेजाळ । जें आकाशापरी विशाळ । जें सकळ आनंदाचें मूळ । नाम केवळ परब्रह्म ॥९७॥ रूप सगुण नाम निर्गुण । रूप मायामय आनंदघन । रूप झांके नाम पूर्ण । अनंतयुगीं ठसावें ॥९८॥ रूप सवच[5] नाम निर्वच[6] । रूप क्षणिक नाम साच । नामअर्थ करितां उगेच । वेद तटस्थ राहिले ॥९९॥ असो तें नाम सर्वांत सार । अखंड जपतां कर्पूरगौर[7] । तेथें हिमाद्रितनया[8] जोडूनि कर । विनवी सादर शिवातें ॥१००॥ म्हणे स्वामी जप आणि ध्यान । कवणाचें करितां रात्रंदिन । कोण थोर असे तुम्हांहून । मजलागोनि सांगा तें ॥१॥ शिव म्हणे ऐक शुभकल्याणी । सकळगुणसरिते लावण्यखाणी । जो रविकुळमुकुटदिव्यमणी[9] । मी ध्यातों मनीं तयातें ॥२॥ जो राक्षसकाननवैश्वानर[10] । जो भक्तहृदयारविंदभ्रमर[11] । जो अज्ञानतमनाशक[12] दिनकर । जो उदार श्रीराम ॥३॥ जो त्रैलोक्यनगरस्तंभ[13] विशाळ । जो निगमवल्लीचें पक्व फळ । जो जगदंकुरकंद निर्मळ । तो तमाळनीळ श्रीराम ॥४॥ जो द्विपंचमुखदर्पहरण । जो भवगजदारण पंचानन । जो जनकजामात मखपाळण । त्याचें ध्यान करितों मी ॥५॥ ऐकतां हांसिन्नली भवानी । तो राम हिंडत असे वनीं । सीता सीता म्हणोनी । वृक्ष पाषाण आलिंगित ॥६॥ रावणें नेली त्याची युवती । स्त्रीवियोगें भ्रंशली ज्याची मती । त्याचें ध्यान अहोरात्रीं । तुम्हीं करितां नवल हें ॥७॥ शिव म्हणे तो रघुवीर । लीलावतारी निर्विकार । वेद आणि भोगींद्र । नेणती पार जयाचा ॥८॥ तो पूर्णब्रह्मानंद निर्गुण । देवांची करावया सोडवण । सगुणलीलावेष[14] पूर्ण । भक्तांलागीं दावीतसे ॥९॥ विश्वरूप एक रघुवीर । जेवीं एक सुवर्ण बहु अलंकार । कीं बहुत सदनें एक अंबर । सीतावर व्यापक तैसा ॥११०॥

१. इंद्राला युद्धात सहाय्य करताना २. भक्तांवर दया करणारा ३. वज्राचे कवच ४. श्रीशिव ५. रूप शब्दबद्ध करता येते ६. वर्णन करता न येण्यासारखे ७. धवलांग श्रीमहादेव ८. पार्वती ९. सूर्यवंशी श्रीराम १०. राक्षसांतक श्रीराम ११. भक्तहृदयातील श्रीराम १२. अज्ञानरूपी अंधाराचा नाश करणारा १३. त्रैलोक्याचा आधार राम १४. लीलेने सगुण रूप धारण केलेला

कीं बहुत लहरिया एक सागर । लोह एक शस्त्रें अपार । पट दिसती चित्रविचित्र । परी तंतु सर्वत्र एकचि ॥११॥ बहु बिंदु एक जलधर । घृत एक कणिका अपार । कीं अनेक वाद्यांत साचार । एकचि नाद दुमदुमे ॥१२॥ एक उर्वी बहुत वनस्पती । एक वेद बहुत श्रुती । कीं एकाच नभीं झळकती । उडुगणें[1] जैशीं अपार ॥१३॥ तैसा राम व्यापक तत्त्वतां । मग बोले हिमनगदुहिता । तुम्ही एवढा महिमा वर्णितां । त्या रघुनाथा भुलवीन मी ॥१४॥ मग जानकीचें रूप धरूनी । रामासन्मुख आली भवानी । कांचनवर्णी[2] सुहास्यवदनी । पद्मनयनी सुरेख ॥१५॥ बोलतां झळकती दंतपंक्ती । तें तेज न लोपे गगनक्षितीं[3] । पदरजें हिरे होती । अतर्क्य गति तियेची ॥१६॥ अंगींचा मकरंद अपार । त्या सुवासें तृप्त कांतार । सुगंधासी वेधोनि समग्र । षट्पदचक्रें[4] धांवती ॥१७॥ विद्युत्प्राय पीतवसन । सर्वालंकारीं मंडित पूर्ण । राघव तियेतें देखोन । मुख मुरडोन चालिला ॥१८॥ तिकडे न पाहेचि सर्वथा । तंव ते पुढें ये गजास्यमाता[5] । म्हणे स्वामी रघुनाथा । आल्यें मी सीता पहा मज ॥१९॥ मागुती तियेसी टाकून । राम आलिंगी वृक्ष पाषाण । आश्चर्य करी लक्ष्मण । जानकी सुटोन आली कीं ॥१२०॥ मग म्हणे आत्मयारामा । विषकंठहृदया पूर्णब्रह्मा । जानकीलागीं पूर्णकामा । आलिंगन द्यावें जी ॥२१॥ व्याघ्राचिये कवेंतुनी । पूर्वभाग्यें वांचे कुरंगिणी[6] । अयोध्यानाथा तुझी राणी । आली सुटोनि तैशीचि ॥२२॥ सुरवर पाहती ते गगनीं । म्हणती जानकी जवळी असोनी । तिकडे न पाहे मोक्षदानी । कोप मनीं कां धरिला ॥२३॥ सौमित्र म्हणे पद्मदलाक्षा[7] । जनमोहना[8] निर्विकल्पवृक्षा[9] । सीतेसी आलिंगीं सर्वसाक्षा । पुरवीं अपेक्षा तियेची ॥२४॥ मग बोले रघुवीर । तुम्हांसी नेणवे कापट्यविचार । हे अपर्णादेवी साचार । ठकवावया आली आम्हां ॥२५॥ शिवासी करूनियां जे पण । ठकवावया आली आपण । तुम्हांस नेणवे हे खूण । अंतर्ज्ञान न कळेची ॥२६॥ कैलासींच्या खुणा समस्त । सौमित्रीसी सांगे रघुनाथ । स्कंदमाता[10] जाहली तटस्थ । म्हणे हा अजित पूर्णब्रह्म ॥२७॥ मग ते मूळपीठनायिका[11] । प्रकट रूप दावी अंबिका । विश्वजनकाचिया जनका । वर द्यावया पुढें आली ॥२८॥ श्रीराम म्हणे हो माते । ज्ञानगंगे हिमनगसुते । शिवआज्ञा मोडोनि येथें । किमर्थ केलें आगमन ॥२९॥ ऐसें बोलून कौसल्यासुत । सीते सीते म्हणोनि बाहत । तों वृक्ष पाषाण ओ देत । पाहे तटस्थ अंबिका ॥१३०॥ दुर्गा म्हणे रघुनंदना । भार्गवजिता शिवमनरंजना । नरवीरश्रेष्ठा आनंदसदना । जगद्वंद्या जगद्गुरो ॥३१॥ तूं निर्विकार ज्ञानघन । तरी कां आलिंगिसी वृक्ष पाषाण । श्रीराम म्हणे हें वर्तमान । पूस जावोनि शिवातें ॥३२॥ तुझे अंतरीं नाहीं विश्वास । नेणसी आध्यात्मज्ञानलेश[12] । मी कां आलिंगितों वृक्षांस । परमपुरुष शिव जाणे ॥३३॥ मग अंबिका[11] बोले वचन । तुम्ही एकरूप दोघे जण । एक एकाची अंतरखूण । परस्परें जाणतसां ॥३४॥ आकाशाचें थोरपण । एकची जाणे प्रभंजन[13] । कीं समीराचें[13] सर्वत्र गमन । अंबर[14] पूर्ण जाणतसे ॥३५॥ सर्व सोडून अभिमान । विरिंचिजनका[15] तुज मी शरण । कां आलिंगितां वृक्ष पाषाण । सांगा खूण एवढी ॥३६॥ मग अपर्णेचे[10] हृदयीं पूर्ण । रामें प्रकटविलें दिव्यज्ञान । म्हणे आतां वृक्ष पाषाण । पाहें निरखोनि कोण हे ॥३७॥ सावध पाहे जों भवानी[10] । तों ते महाऋषि बैसले ध्यानीं । श्रीराम त्यांसी आलिंगोनी । कैवल्यपदा पाववी ॥३८॥

१. नक्षत्रे २. सुवर्णासारखी तेजस्वी ३. आकाशातून पृथ्वीवर ४. भ्रमरांचे समुदाय ५. पार्वती ६. हरिणी ७. कमलनेत्र श्रीराम ८. जनाला मोहित करणारा ९. विकल्परहित श्रीराम १०. पार्वती ११. आदि-जननी १२. अध्यात्मज्ञानाचा कणही १३. वायू १४. आकाश १५. श्रीराम

सीतेचें करूनिया मिस[1] । उद्धरिले रामें तापस । मग म्हणे हा पुराणपुरुष । लीलावेष दावीतसे ॥३९॥ असो अंबिकेचें पूजन । स्वयें करी रविकुळभूषण[2]। मग देवीनें वरदान । रघुवीरास दीधलें ॥१४०॥ म्हणे राजीवाक्षा रघुनंदना । तूं सत्वर वधिशील दशानना । जानकी घेऊनि निजसदना । अयोध्येसी येशील ॥४१॥ अहो तेचि हे रामवरदायिनी[3] । अंबा तुळजापुरवासिनी । रघुनाथ पुढें चालिला तेथुनी । दक्षिणपंथें शोधीत ॥४२॥ तों पुढें देखिली कृष्णावेणी । दोष नुरे ज्यांचे स्मरणीं । तिचे तटीं कोदंडपाणी । क्षण एक बैसला ॥४३॥ स्नान करावया रघुनंदन । कृष्णेंत प्रवेशला जगन्मोहन । देखोन सखोल जीवन । जगज्जीवन बुडी देत ॥४४॥ विष्णुतनु[4] कृष्णा[5] साचार । देखोनियां राजीवनेत्र । क्षणें उदकमय जाहलें शरीर । कडे सौमित्री पाहतसे ॥४५॥ तनु जाहली उदकमय । तंव सौमित्री तेथें घाबरा होय । घटका एक वाट पाहे । म्हणे काय करूं आतां ॥४६॥ काय जाहली मूर्ति सांवळी । कोठें गेली अनाथाची माउली । श्रीरामा तूं जगाची साउली । माझी केली कां उपेक्षा ॥४७॥ सौमित्रें अंग घातलें धरणीं । म्हणे रामा धांव धांव ये क्षणीं । तूं माझी जनकजननी । वनीं मज सांडिलें की ॥४८॥ राघवा मज तू उबगलासी । सांडिलें मज घोर वनासी । मी आतां त्यागीन प्राणासी । निश्चयेंसीं राघवेंद्रा ॥४९॥ जानकीमाता उबगली । तीही मज टाकोन गेली । रघुपती तुझी आशा धरिली । तुवांही केली उपेक्षा ॥१५०॥ मग उठोनि सुमित्रासुत । चहूंकडे पाहे तटस्थ । धनुष्य बाण करीं घेत । क्रोध अद्भुत नावरे पैं ॥५१॥ म्हणे कृष्णे तुज उगमापासूनी । निर्जळ करीन ये क्षणीं । बाण काढिला विचारूनी । मुखीं प्रळयाग्नि जयाचे ॥५२॥ आणोनि दे माझा रघुवीर । नवमेघरंग राजीवनेत्र । हें जाणोनि अहल्योद्धार । निघे बाहेर ते काळीं ॥५३॥ सौमित्र चरणीं लागला । ते स्थळीं शंकर स्थापिला । बाहोक्षेत्र म्हणती तयाला । पुढें चालिला रामचंद्र ॥५४॥ आठ राक्षस रावणें पाठविले । रामासी वधावया सत्वर वहिले । कबंधाचे कवे सांपडले । तेणें ते गिळिले क्षणार्धे ॥५५॥ त्या कबंधाचेचि कवेआंत । सांपडले सौमित्री रघुनाथ । सांचळ[6] ऐकतां कबंध । पसरोनि हात आवरिले ॥५६॥ द्वादश योजने दोन्ही हस्त । जैसे आड पडिले महा पर्वत । शिर उतरलें हृदयांत । वज्राघातेंकरूनियां ॥५७॥ नाहीं तयासी चरण । बैसला दोन्ही हस्त पसरून । त्याचे कवेंत रामलक्ष्मण । अकस्मात सांपडले ॥५८॥ बळ जाणोनि अद्भुत । धनुष्य सज्जोनि अयोध्यानाथ । तीक्ष्ण शरें[7] दोन्ही हात । छेदोनियां पाडिले ॥५९॥ श्रीरामबाणें उद्धरला । कबंध दिव्य देह पावला । रघुपतीच्या चरणीं लागला । उभा राहिला कर जोडुनि ॥१६०॥ मी दनूचे उदरीं कश्यपसुत । मद्यपानी मदोन्मत्त । स्थूलशिरा ऋषि तप करीत । सेविलें एकांत कानन[8] ॥६१॥ त्यासी म्यां हांक फोडून । भेडसाविला तपोधन । तेणें शापशस्त्रेंकरून । मज ताडिलें ते काळीं ॥६२॥ म्हणे तूं चांडाळ पापखाणी । कबंध होऊन पडें वनीं । मग मी लागलों त्याचे चरणीं । उच्छापवाणी बोलिला ॥६३॥ दशरथसुत दंडकारण्यांत । दशमुख वधावया जातां सत्य । दशा तुझी उजळेल यथार्थ । दनुपुत्रा जाण पां ॥६४॥

१. निमित्त २. श्रीराम ३. रामाला वर देणारी ४. विष्णूचे शरीर ५. कृष्णानदी ६. चाहूल ७. बाणांनी ८. वन

इंद्रपद घ्यावयासी जाण । मी जपत होतों बहुत दिन । वज्रधरें[1] वज्र उचलोन । मस्तकीं माझे ताडिलें ॥६५॥ मस्तक उदरांत उतरलें । दोन्ही चरण छेदिले । पूर्वकर्म फळासी आलें । कष्ट भोगिले बहुवस ॥६६॥ जाहला माझा उद्धार । रामा पडिलें माझें शरीर । यासी देवोनि वैश्वानर[2] । भस्म करीं आतांचि ॥६७॥ काष्ठें मेळवून सौमित्र । अग्नींत घातलें कलेवर । मग तो पावोनि पुण्यशरीर । विमानांत बैसला ॥६८॥ परीस झगटतां जाण । होय लोहाचें सुवर्ण । तैसा कबंध उद्धरोन । वैकुंठधामा चालिला ॥६९॥ शंखचक्रादिचिन्हांकित । चतुर्भुज विष्णुभक्त । कबंध उद्धरोनि यथार्थ । तोही जाहला तैसाचि ॥१७०॥ मग विमानीं बैसोनि जातां । म्हणे अयोध्याप्रभु रघुनाथा । सुग्रीवासीं मैत्री तत्त्वतां । करीं तूं आतां येथोनि ॥७१॥ जगद्वंद्या जनकजामाता । जलदगात्रा[3] जन्मरहिता । जलजनेत्रा[4] जलजासनताता[5] । जनार्दना जगद्गुरो ॥७२॥ असो नमस्कारोनि रघूत्तमा । कबंध पावला निजधामा । पुढें शबरीचिया आश्रमा । जगदात्मा येता जाहला ॥७३॥ परम तपस्वी शबरी । तप करितां जाहली म्हातारी । तिच्या आश्रमीं रावणारी । राहता जाहला दिनत्रय ॥७४॥ तिनें फळें मुळें आणून । भावें अर्चिला रघुनंदन । म्हणे तप जाहलें संपूर्ण । राजीवनयन देखिला ॥७५॥ शबरीसी उपदेशिलें ज्ञान । ती तत्काळ गेली उद्धरोन । शरीर सांडोनि कैवल्यसदन । पावली पूर्ण तत्काळीं ॥७६॥ सौमित्री म्हणे पुराणपुरुषा । जगदुद्धारा अयोध्याधीशा । मज निजज्ञान सर्वेशा । कृपा करूनि उपदेशीं ॥७७॥ मग रामगीता जें आत्मज्ञान । सारासारविचारनिरूपण । लक्ष्मणाप्रति सांगोन । नि:संशय तो केला ॥७८॥ मायिक जगदाभास पूर्ण । सत्य शाश्वतरूप निर्वाण । ते चिन्मयवस्तु आपण । निजज्ञान या नामें ॥७९॥ असो यावरी रघुपती । आला हंपीविरूपाक्षाप्रती[6] । पुढें पंपासरोवर निश्चितीं । विश्रांतिस्थान शिवाचें ॥१८०॥ दिव्य वल्ली दिव्य द्रुम । सदा सफळ भेदीत व्योम । तेथें स्फटिकगुहा उत्तम । परम आरामस्थळ जें कां ॥८१॥ स्फटिकशिळेवरी श्रीराम । बैसला तेव्हां घनश्याम । जेवीं कैलासीं द्यावया क्षेम । बलाहक[7] उतरला ॥८२॥ सौमित्रीचे मांडीवरी । शिर ठेवून रावणारी । श्रमोनियां निद्रा करी । निर्विकारी अजित जो ॥८३॥ शेषशायी नारायण । तोचि राम इंदिरारमण[8] । सौमित्रीचे अंकीं शिर ठेवून । त्याचपरी शोभला ॥८४॥ असो ते समयीं रघुनाथा । चित्तीं आठवे जनकदुहिता । श्वासोच्छ्वास जगत्पिता । घालोन बोले ते समयीं ॥८५॥ अहा जानकी मृगांकवदने[9] । गुणसरिते पद्मनयने । सकळ लावण्यगुणनिधाने[10] । कधीं भेटसी मज आतां ॥८६॥ रामासी जाहला विरहज्वर । तंव कोकिळा बाहती सुस्वर । तयांसी म्हणे त्रिभुवनेश्वर[11] । खुंटो स्वर सदा तुमचा ॥८७॥ ते वेळीं तमालनीळा[12] । शरण आल्या सर्व कोकिळा । राम म्हणे वसंतकाळा- । माजी शब्द फुटेल ॥८८॥ मृगमृगींस म्हणे रघुनाथ । तुम्हां संघटतां पारधी वधील सत्य । तंव तीं जाहलीं शरणागत । उच्छाप देत तयांसी ॥८९॥ तो तुम्हांस रात्रीस वधील सत्य । वरकड दिवस तुम्हांस मुक्त । तंव देखिलीं गजगजी रमत । काय बोलत तयांसी ॥१९०॥ दोघांसी योग होतां यथार्थ । गज पडेल मूर्च्छागत । सात दिवसपर्यंत । अचेतन प्रेतापरी ॥९१॥ तंव तीं आलीं शरण । उच्छाप बोले राजीवनयन । जळांत करितां मैथुन । मूर्च्छा न ये सहसाही ॥९२॥ मयूरासी म्हणे रघुनायक । तुम्ही व्हारे नपुंसक । तंव तीं शरण येती देख । काय बोले जगद्गुरु ॥९३॥

१. इंद्राने २. अग्नी ३. मेघासारखे सावळे शरीर असलेला ४. कमलनेत्रा ५. ब्रह्मदेवाचा पिता ६. हंपी आणि विरूपाक्ष या स्थानावर ७. ढग ८. श्रीविष्णू ९. चंद्रमुखी १०. सौंदर्याची व सद्गुणांची ठेव ११. श्रीराम १२. श्रीरामाला

नयनीं जे अश्रु स्रवती । तेणेंचि वाढेल तुमची संतती । चक्रवाकांसी म्हणे रघुपती । सूर्योदयीं भेट तुम्हां ।।९४।। रात्रीं होय तुम्हांस वियोग । तों दृष्टीं देखे कागिणीकाग[1] । त्यांसी म्हणे जन्मांत संग । एकदांच तुम्हा संसारीं ।।९५।। मी सीतेविण भ्रमतों देख । तुम्ही भोगितां रतिसुख । यालागीं दंड हाचि नि:शंक । तुम्हांसी केला निर्धारें ।।९६।। सीतावियोगें रघुनाथ । म्हणे राक्षस येऊन बहुत । यांच्या स्त्रिया हरोनि समस्त । नेईनात सीतेऐशा ।।९७।। रतिचेष्टा मजसमोर । कां हो करिती वारंवार । माझी जानकी सुकुमार । मज भेटली नाहीं जों ।।९८।। इत्यादि भाव ते समयीं । दावी जनकाचा जांवई । ज्याचे गुणांस गणना नाहीं । कोटि वर्षे शोधितां ।।९९।। असो ऋष्यमूकपर्वतावरूनि । वानर विलोकिती चापपाणी । नळ नीळ जांबुवंत तरणि- । कुमर[2] पाहे सुग्रीव ।।२००।। आणि पांचवा तो हनुमंत । जो अवतरला उमाकांत[3] । त्याचें जन्मकर्म अद्भुत । तृतीयाध्यायीं वर्णिलें ।।१।। रामविजयग्रंथराशी । हेचि केवळ वाराणसी । रामकथा विश्वेश्वरासी[4] । प्रिय म्हणून राहिला ।।२।। कष्ट न होतां अपार । यात्रेसी धांवती मुमुक्षुनर । श्रवणीं बैसती सादर । संसार कार्य टाकूनि ।।३।। येथोनि अरण्यकांड संपलें । पुढे किष्किंधाकांड आरंभिलें । जैसें रत्नाहून रत्न आगळें । वैरागरीं[5] निपजे पैं ।।४।। याचे परीक्षक संतजन । जे ब्रह्मानंदें परिपूर्ण । श्रीधर तयांसी अनन्यशरण । अभंग अक्षय सर्वदा ।।५।। स्वति श्रीरामविजय ग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत भक्त चतुर । षोडशाध्याय गोड हा ।।२०६।। ।। श्रीरामचंद्रार्पणमस्तु ।। ।। ओव्या २०६ ।।

।। अध्याय सोळावा समाप्त ।।

## ।। अरण्यकांड समाप्त ।।

१. कावळी आणि कावळा २. सूर्यपुत्र सुग्रीव ३. उमापती महादेव ४. महादेवाला ५. खाणीमध्ये

# किष्किंधा कांड

## ।। अध्याय सतरावा ।।

# हनुमंताची भेट, सुग्रीवाशी मैत्री, वालीचा वध

।। श्रीगणेशाय नमः ।। श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः । संत आणि इतर जन । दिसती समसमान । परी संत सदा आनंदघन । ब्रह्मानंदें डोलती ।।१।। बकासंगे असतां मराळ[१] । दिसती सारिखे शुद्ध धवळ । परी क्षीर आणि जळ । करिती वेगळें हंसचि ।।२।। वायसांत[२] वसे कोकिळ । त्यांच्यासारखा दिसे केवळ । परी प्रवर्ततां वसंतकाळ । पंचमस्वरें आळवी तो ।।३।। जंबुकवनांत वाढला केसरी । परी त्याची कैसी पावेल सरी । क्षणमात्रें गज विदारी । हांकें भरी निराळ ।।४।। स्फटिकांत मुक्ताफळ जाण । दिसे सारिखें समसमान । मुक्त जोहरी काढिती निवडोन । करिती जतन जीवेंसीं ।।५।। पाषाणांत परीस असे पूर्ण । दिसे तैसाचि जड कठिण । परी तो लोहाचें करी सुवर्ण । कृष्णवर्ण लपवोनी ।।६।। कस्तूरी आणि मृत्तिका । दिसे रंग एकसारिखा । परी मृगमद[३] सुवासें सकळिकां । श्रीमंतांसी निववी पैं ।।७।। तक्र दुग्ध एकवर्ण । परी दुग्ध गोड सकळांसी मान्य । तैसीं संतांची रूपें जाण । इतरांसमान न म्हणावीं ।।८।। ऐसे संत आनंदघन । रामविजय परम पावन । करावया बैसले श्रवण । अति आदरेंकरोनियां ।।९।। आतां किष्किंधाकांडकमळावरी[४]। क्रीडेल वाग्देवीभ्रमरी[५] । तरी तो सुरस अंतरीं । सदा चतुरीं सांठविजे ।।१०।। षोडशाध्यायीं कथा परिकर । पंपासरोवरासी रघुवीर । आला सजलजलदगात्र । ध्याय त्रिनेत्र जयातें ।।११।। तों ऋष्यमूक पर्वतावरी । उभे पांच वानर ते अवसरीं । किंवा ते पंच केसरी । स्वलीला उभे ठाकले ।।१२।। कीं कनकाद्रीचीं रत्नें मंडित । पंचश्रृंगें[६] विराजत। कीं उगवले पंच आदित्य। उदयाचळीं एकदां।।१३।। कीं साह्य व्हावया रघूत्तमातें। अवतरलीं पंचमहाभूतें। कीं तें पंचायतन शोभतें । ऋष्यमूक पर्वतावरी ।।१४।। ते पंपासरोवराचे तीरीं । श्रीराम स्फटिकशिळेवरी । सौमित्रीचे मांडीवरी । शिर ठेवून पहुडला ।।१५।। देखतां सौमित्रि राघव । भयभीत जाहला सुग्रीव । म्हणे वाळीनें हे दोघे मानव । वीर येथें पाठविले ।।१६।। माझा घात करावया । शत्रूनें दिधले पाठवूनियां । म्हणोनि सुग्रीव तेथोनियां । जाता जाहला सत्वर ।।१७।। चौघांस न पुसतां तेथून । पळे वेगें मित्रनंदन । वनोपवनें लंघोन । समीरवेगें चालिला ।।१८।। मग सवेग धांवोनि हनुमंत । उभा केला सूर्यसुत[७] । म्हणे तूं कां भीतोसी येथ । काय विपरीत देखिलें ।।१९।। सुग्रीव म्हणे दोघे धनुर्धर । दिसती परम प्रचंड वीर । त्यांसी विलोकितां भय अपार । माझे हृदयीं संचरलें ।।२०।। अजि म्यां स्वप्न देखिलें । दोघे धनुर्धर साह्य जाहले । वाळीस वधोनि राज्य दिधलें । किष्किंधेचें मजलागीं ।।२१।। अरुणोदयीं देखिलें स्वप्न । सवेंचि पातले दोघेजण । परी मज धीर न धरवे जाण । भयेंकरून व्यापिलों ।।२२।। यावरी बोले वायुनंदन । आम्ही असतां चौघे प्रधान । कृतांतासी शिक्षा लावून । तुजला रक्षूं सर्वदा ।।२३।। तरी हे पंपातीरीं दोघे जण । बैसले वीर देदीप्यमान । कीं बृहस्पति आणि सहस्रनयन[८] । तैसे दोघे दीसती ।।२४।। कीं एक तपस्वी एक उदास । एक औदार्य एक धैर्यविशेष[९] । कीं एक पुण्य एक यश । तैसे दोघे दीसती ।।२५।।

---

१. हंस २. कावळ्यामध्ये ३. कस्तुरी ४. किष्किंधाकांडरूपी कमळावर ५. सरस्वतीरूपी भ्रमरी ६. पाच शिरपेच ७. सुग्रीव ८. इंद्र ९. धीरोदात्त

कीं एक ज्ञान एक विज्ञान । एक आनंद एक समाधान । कीं एक सगुण एक निर्गुण । दोन्ही स्वरूपें हरीचीं ।।२६।। एक साधक एक सिद्ध । एक वैराग्य एक बोध । एक मोक्ष एक ब्रह्मानंद । तैसे दोघे दीसती ।।२७।। यांचिया आगमनें पाहीं । आनंद दाटला माझे हृदयीं । यांचा समाचार लवलाहीं । जाऊन आतां आणितों ।।२८।। त्यांचिया बोलावरून । कळेल त्यांचे अंत:करण । स्वाद घेतां रस पूर्ण । चतुर जैसा ओळखे ।।२९।। अरुणोदयावरून । रजनी सरली कळे ज्ञान । कीं दाहकत्व निरसतां अग्न । शांत जाहला जाणिजे ।।३०।। कीं संकटसमयावरून । जाणिजे बंधु मित्रजन । कीं इंद्रियनियमनें पूर्ण । योगाचरण जाणिजे ।।३१।। कीं दयेवरून कळे शांती । कीं तर्कावरून कळे धृती[१] । कीं वेदांतश्रवणें निवृत्ती- । दशा बाणली जाणिजे ।।३२।। कीं प्रेमरसावरून भक्ती । कीं निरपेक्षेवरून[२] विरक्ती । कीं पावला अद्वयें मुक्ती । इहपरत्रीं जाणिजे ।।३३।। तैसें त्यांचें अंतर समस्त । मी आणितों तू राहें स्वस्थ । जरी तेथें असेल विपरीत । हस्तसंकेत दावीन तूतें ।।३४।। ऐसें बोलोनि हनुमंत । पंपातीरासी आला त्वरित । वटवृक्षातळीं रघुनाथ । पहुडलासे श्रमोनियां ।।३५।। स्फटिकशिळा देदीप्यमान । जेवीं शेषतल्पक[३] शुभ्रवर्ण । त्यावरी श्रावणारिनंदन[४] । विराजमान दिसतसे ।।३६।। तंव त्या वटावरी हनुमंत । कौतुकेंकरोनि उड्डाण करीत । लक्षोनियां रघुनाथ । हर्षे दावी वांकुल्या ।।३७।। ऐसा देखोनि वानर । सौमित्रासी दावी रघुवीर । पैल पाहें तो कपिवर । पंचशर तोडरीं असे ।।३८।। झळकताहे हेमकौपीन[५] । वज्रबंधनें न चळे मदन । माझे चित्त स्नेहेंकरून । यासी देखोन भरलें असे ।।३९।। मातेचें वचन हनुमंत । आठवी तेव्हां हृदयांत । जो ओळखे कौपीन गुप्त । तोचि स्वामी तुझा असे ।।४०।। तो प्रत्यय आला सकळ । परी माझें अद्‌भुत बळ । हा दिसतसे कोमळ । तमालनीळ साजिरा ।।४१।। शिष्यापरीस आगळें बळ । गुरूस असावें बहुसाल । मग वटशाखा मोडोनि सबळ । रामावरी टाकिली ।।४२।। तें देखतां ऊर्मिलाजीवन[६] । चापासी वेगें चढविला गुण । मग बोले कौसल्यानंदन । स्थिर राहें नावेक ।।४३।। बाळकौतुके पाहे साचार । त्यावरी काय टाकिसी शर । तों उताणा पहुडला रघुवीर । तंव शाखा सत्वर आली वरी ।।४४।। वरी कोदंडदंडें[७] ते अवसरीं । शाखा ताडिली वरच्यावरी । ते उडोनि गेली अंबरीं । तृणतुल्य तेधवां ।।४५।। आणिकही वृक्ष पाषाण । वरी टाकी वायुनंदन । तेही कौसल्यागर्भरत्न । कोदंडेंकरून उडवीत ।।४६।। मग गर्जोनियां हनुमंत । सोडी तेव्हां पंच पर्वत । परी न उठेचि रघुनाथ । कौतुकें हांसे ते काळीं ।।४७।। मग रघुनाथें एक बाण । चापासी लाविला न लागतां क्षण । पांच पर्वत पिष्ट करून । बाणे गगन भेदित ।।४८।। शरपिसारा लागला किंचित । तेणें उडोनि गेला हनुमंत । गगनीं गरगरां भोंवत । प्राण होय कासाविस ।।४९।। वातचक्रीं पडतां तृण । तें भूमीस न पडे मागुतेन । त्यापरी वायुनंदन । कासावीस होतसे ।।५०।। जनक पवन धांवे ते समयीं । आत्मज धरिला दृढ हृदयीं । म्हणे बा रे शरण लवलाहीं । रामचंद्रासी जाईं कां ।।५१।। हा अवतरला शेषशायी । जाण क्षीराब्धीचा जांवई । दृढ लागें त्याचे पायीं । कायावाचामानसें ।।५२।। मग श्रीरामासी हनुमंत । येवोनि लोटांगण घालित । मागुती उठोनि धरित । श्रीरामचरण सप्रेमें ।।५३।। उठोनियां रघुवीर । हृदयीं धरिला वायुकुमर । एक जाहले हरिहर[८] । जयजयकार करिताती ।।५४।।

---

१. मनाची धारणा २. अपेक्षारहित स्थिती ३. शेषरूपी मंचक ४. श्रीराम ५. सुवर्णलंगोट ६. लक्ष्मण ७. धनुष्याच्या दांडीने ८. श्रीविष्णू आणि श्रीशंकर

श्रीराम म्हणे हनुमंता । जोंवरी शशी आणि सविता । तोंवरी अक्षयी होईं तत्त्वतां । बलार्णव[1] अद्भुत तूं ॥५५॥ कैकयीहस्तींचा पूर्ण पिंड । अंजनीहातीं पडला अखंड । तो हा वीर जन्मला प्रचंड । राघवाहून पूर्वींच ॥५६॥ असो जोडोनि दोन्ही कर । हनुमंत उभा राहे समोर । म्हणे हे राम करुणासमुद्र । जगदुद्धार दीनबंधो ॥५७॥ हे राम भुवनसुंदरा । हे राम जनकजावरा । हे राम नवपंकज-नेत्रा । पुराणपुरुषा जगदात्मया ॥५८॥ परम भक्त जाणोन । हनुमंतासी भेटला लक्ष्मण । करीं धरून वायुनंदन । सीतावल्लभें बैसविला ॥५९॥ रामचरण चुरी मारुती । म्हणे रघुवीरा ऐक एक विनंती । पैल ऋष्यमूक पर्वतीं । वसे कपिपती[2] सुग्रीव ॥६०॥ अभयवर देशील त्यातें । तरी आतां भेटवीन तयातें । बहुत कार्य तयाचेनि हातें । पुढें साधेल श्रीरामा ॥६१॥ मग बोले रघुनंदन । सुग्रीव हा कोणाचा कोण । हनुमंत सांगे पूर्वकथन । सावधान परिसावें ॥६२॥ कमलोद्भव करितां ध्यान । प्रेमोदकबिंदु[3] नेत्रींहून । अंजुळींत पडतांचि पूर्ण । ऋक्षरजा जन्मला ॥६३॥ तो ब्रह्मयाचा प्रियनंदन । वानरवेष बळ गहन । हिंडतां वनोपवन । शिवलोकाप्रती गेला ॥६४॥ तंव देखिलें रम्य सरोवर । भोवते सदाफळ तरुवर । परी तेथें शाप दुर्धर । पूर्वींच होता अपर्णेचा ॥६५॥ जो नर सेवील येथींचें पाणी । तो नारी होईल तत्क्षणीं । हें ऋक्षरजें नेणोनी । उडी जीवनीं घातली ॥६६॥ स्नान करून निघतां बाहेर । जाहलें स्त्रियेचें शरीर । रंभेहून परम सुंदर । होय विचित्र ते काळीं ॥६७॥ तों मित्र इंद्र दोघेजण । आले सुंदर स्त्री वरूं म्हणोन । तंव तो ब्रह्मपुत्र लाजोन । स्त्री होऊन बैसला ॥६८॥ न घडे तयेसीं सुरत । मग दोघीं त्यागिलें रेत । आधीं शक्रवीर्य मस्तकीं पडत । वाळी तेथें जन्मला ॥६९॥ मागून सूर्यवीर्य पडलें ग्रीवेवरी । तेथें सुग्रीव जन्मला ते अवसरीं । विरिंचि पातला झडकरी । तों पुत्र नारी जाहला असे ॥७०॥ मग तेणें प्रार्थोनि पार्वती । उच्छाप मागे पुत्राप्रती । कामिनीभाव[4] हरोनि मागुती । पुत्र केला पूर्ववत ॥७१॥ दोघे पौत्र आणि सुत । घेवोनि चालिला पद्मजात[5] । मग मृत्युलोकीं अद्भुत । किष्किंधा नगर रचियेलें ॥७२॥ धाकुटा सुग्रीव वडील वाळी । ऋक्षरजा घेऊनि ते काळीं । किष्किंधाराज्य भूमंडळीं । केलें तेणें बहुकाळ ॥७३॥ वाळीसुग्रीवांसी तत्त्वतां । ऋक्षरजा मातापिता । पुढें वाळीस देऊन राज्यार्था । धरिलें छत्र सुमुहूर्ते ॥७४॥ करोनियां योगसाधन । ऋक्षरजा पावला ब्रह्मसदन । पुढें वाळी सुग्रीव दोघेजण । बंधु समान सारिखे ॥७५॥ इंद्रें वाळीस विजयमाळ । दिधली म्हणोनि तो सबळ । समरीं शत्रु होय निर्बळ । वाळीप्रताप देखतां ॥७६॥ सूर्ये सुग्रीव करीं धरिला । आणोन माझे हातीं दीधला । तूं सांभाळीं यासी दयाळा । म्हणोनियां प्रार्थिलें ॥७७॥ सुग्रीव आणि वाळीमध्यें । वैर लागलें राज्यसंबंधें[6] । पुढे वाळी सुग्रीवासी क्रोधें । वधावयासी धांविन्नला ॥७८॥ सुग्रीवाची स्त्री रुमा रूपवंत । वाळीनें घातली घरांत । सुग्रीवें धरिला ऋष्यमूक पर्वत । युद्ध होत षण्मासां[7] ॥७९॥ माझी सूर्ये घेतली भाक । तूं सुग्रीवाची पाठी राख । ऐसें ऐकतां अयोध्यानायक । काय बोलता जाहला ॥८०॥ हनुमंता भाक घे पूर्ण । मज अत्यंत प्रिय सूर्यनंदन । सत्वर आणीं बोलावून । भेटीस मन उतावीळ ॥८१॥ तयाचा शत्रु वधोन । त्यासी देईन छत्र सिंहासन । याउपरी जानकीचिद्रत्न[8] । शोधोनि कांढूं साक्षेपें ॥८२॥ ऐसें बोलतां जनकजामात[9] । तेथून उडाला हनुमंत । येऊनि सुग्रीवास सांगत । भाग्य अद्भुत उदेलें ॥८३॥

---

१. प्रचंड बळाचा सागर २. वानरांचा मुख्य ३. प्रेमाश्रू ४. स्त्रीत्व ५. ब्रह्मदेव ६. सत्तेसाठी ७. सहा महिनेपर्यंत ८. जानकीरूपी स्त्रीरत्न ९. श्रीराम

सीतावियोगें दु:खी रघुराज । रुमावियोगें दु:खी तूं सहज । तरी एकमेकांचें पूर्ण काज । करा आतां परस्परें ॥८४॥ ऐकोनि मारुतीचें वचन । आनंदें नाचे सूर्यनंदन । हनुमंतातें आलिंगून । पाठी हातें थापटी ॥८५॥ रघुनाथ प्राप्तीसी तत्त्वतां । तूं सदगुरु झालासी हनुमंता । उतराई काय होऊं आतां । उपकार तत्त्वतां न विसरें ॥८६॥ दशरथात्मज रघुपती । त्याची कीर्ति पूर्वी ऐकिली होती । पंचवटीस करोनि वस्ती । पिशिताशन[१] मारिले ॥८७॥ असो घेऊन वानरांचे भार । नळ नीळ जांबुवंत वीर । सुग्रीव आला जेथें रघुवीर । तों त्रिभुवनसुंदर देखिला ॥८८॥ कोट्यनुकोटी मीनकेतन[२] । ज्यावरून सांडावे ओंवाळून । तमालनीळ स्वरूप सगुण । सुग्रीवें नेत्रीं विलोकिलें ॥८९॥ लोटांगण घाली सुग्रीव । नळनीळादि वानर सर्व । ऐसें देखोन सीताधव । पुढें धांवत भेटावया ॥९०॥ धरोनियां दोन्ही कर । उठविला स्वयें भानुकुमर[३] । हृदयीं धरितां रघुवीर । सुख अपार सुग्रीवा ॥९१॥ अत्यंत जाहला क्षुधातुर । तया भेटला क्षीरसागर । कीं दरिद्रियासी अपार । द्रव्य घरीं सांपडले ॥९२॥ कीं आळशाचें गृह शोधीत । कल्पवृक्ष आला अकस्मात । कीं चुकलें बाळक भेटत । जननियेसी प्रीतीनें ॥९३॥ कीं तृषाक्रांत पडिला वनीं । त्यापुढें लोटे मंदाकिनी । तैसा सुग्रीवाचे मनीं । ब्रह्मानंद उचंबळला ॥९४॥ जीव शिव एक भाव । तैसें भेटीचें वैभव । तेव्हां विमानारूढ देव । सुमनसंभार वर्षती ॥९५॥ नळ नीळ जांबुवंत । आणिक वानर समस्त । तयांसी रघूत्तम आलिंगीत । आनंद गगनीं न समाये ॥९६॥ हनुमंतें तये वेळे । पसरिले वृक्षडाहाळे । मध्यें अग्नीसी साक्ष ठेविलें । दोहींकडे बैसविले दोघेजण ॥९७॥ सुग्रीव आणि रघुनाथ । उभयतांस म्हणे हनुमंत । एकमेकांचा कार्यार्थ । साह्य होवोनि साधावा ॥९८॥ रघुवीर म्हणे राज्य आणि दारा । सोडवूनि देतों रविकुमारा । हा माझा निर्धार खरा । उदयीकचि पाहाल ॥९९॥ अर्कज[४] म्हणे जेणें नेली सीता । त्यासी संहारून तत्त्वतां । अयोध्येसीं नेईन रघुनाथा । मंगळभगिनीसहित[५] पैं ॥१००॥ ऐसें ऐकतां उत्तर । भुभु:कारें गर्जती वानर । तेणें नादें अंबर । दणाणलें ते समयीं ॥१॥ सुग्रीव म्हणे रघुनंदना । कालचि एक सुंदर ललना । राक्षस घेऊन गेला जाणा । निराळमार्गे त्वरेनें ॥२॥ आम्हीं समस्तीं देखिली नयनीं । आक्रंदत करुणावचनीं । म्हणे रामा धांव निर्वाणीं । चापपाणी करुणाकरा ॥३॥ क्षणभरी म्हणे सौमित्रा । धांव धांव परम पवित्रा । मागुती म्हणे स्मरारिमित्रा । राजीवनेत्रा धांव वेगें ॥४॥ तिनें उत्तरीय वस्त्र फाडोनी । आभरणें टाकिलीं बांधोनी । आम्हीं तीं ठेविलीं जतन करूनी । राम ऐकोनि विस्मित ॥५॥ म्हणे नवल सांगती वानर । सत्वर आणवी अलंकार । घेऊनि आला वायुकुमर । देत रघुवीराकरीं तेव्हां ॥६॥ तंव लवलाहें ग्रंथि सोडीत । आभरणें ओळखिलीं समस्त । अहा प्रिये म्हणोनि रघुनाथ । शरीर टाकी धरणीवरी ॥७॥ हृदयीं धरोनि अलंकार । शोकार्णवीं पडिला रघुवीर । सद्गद होती समस्त वानर । नयनीं नीर लोटलें ॥८॥ आठवोनि सीतेचे गुण । विलाप करी रघुनंदन । धांवोनियां लक्ष्मण । धरी चरण रघुपतीचे ॥९॥ लक्ष्मणासी म्हणे रघुवीर । सखया ओळखें अलंकार । राम म्हणे निरंतर । जनकजाअंगीं[६] होते ते ॥११०॥ सौमित्री अलंकार घेउनी । सादर होऊनि पाहे नयनीं । म्हणे हीं नेपुरें[७] सीतेचे चरणीं । ओळखिलीं म्यां साच पैं ॥११॥ नेपुरें ओळखिलीं साचार । वरकड[८] नेणें मी अलंकार । राम म्हणे निरंतर । जनकात्मजा लेत होती ॥१२॥

१. राक्षस २. कामदेव ३. सुग्रीव ४. सूर्यपुत्र सुग्रीव ५. सीतेसह ६. सीतेच्या अंगावर ७. पैंजण ८. इतर

सौमित्र म्हणे सीता माउली । म्यां कधीं नाहीं विलोकिली । त्रिकाळ नमनाचे वेळीं । नेपुरें चरणीं देखिलीं म्यां ॥१३॥ ऐसें बोलतां लक्ष्मण । आनंदला रघुनंदन । म्हणे बा रे तूं दिव्य रत्न । वैराग्यवैरागरींचें[1] ॥१४॥ तूं भक्तसरोवरींचा राजहंस । कीं ज्ञानमुक्ताफलमांदुस[2] । कीं शत्रुविपिनहुताश[3] । सदा निर्दोष सूर्य जैसा ॥१५॥ सुग्रीव म्हणे रविकुळमंडणा । जरी जानकी तुज भेटवीना । तरी मी भोगीन यमयातना । कल्पपर्यंत निर्धारें ॥१६॥ नळ नीळ जांबुवंत । माझे प्रधान जगविख्यात । भूगोळ हा क्षण न लागत । उचलोनि घालिती पालथा ॥१७॥ आतां रघुपते तुझी आण । स्वर्ग मृत्यु पाताळ शोधून । जानकी आणीन हें प्रमाण । सत्य सत्य त्रिवाचा ॥१८॥ मग बोले मखपाळण । तुज तारा राज्य दिधल्यावांचून । सीताशुद्धि न करीं आण । श्रावणारीची जाण पां ॥१९॥ तुझें कार्य न होतां आधीं । कदा न करीं मी सीताशुद्धी । ही माझी प्रतिज्ञा त्रिशुद्धी[4] । ती काळत्रयीं टळेना ॥१२०॥ गुरुकृपेविणें ज्ञान । कीं आवडीविणें भजन । कीं प्रेमाविण कीर्तन । स्नानाविणें अनुष्ठान जैसें ॥२१॥ कीं अतिथीविणें भोजन । कीं वीरश्रीविणें रणांगण । कीं विप्र जैसा विद्येविण । सर्व जन निंदिती ॥२२॥ तैसें तुझें कार्य न होतां । सीताशुद्धि न करीं सर्वथा । ऐसें बोलतां रघुनाथा । वीरश्री अंगीं दाटली ॥२३॥ चढविला चापासी गुण । म्हणे बोलावी शक्रनंदन[5]। सुग्रीव धांवोनि धरी चरण । कर जोडून विनवीत ॥२४॥ म्हणे वाळीचा मार अनिवार । आपण युद्ध न करावें समोर । अकस्मात टाकाल शर । तरीच संहार होय पैं ॥२५॥ मग मंगळजननीजामात[6] । सुग्रीवासी पुसे वृत्तांत । वाळीसी इतुकें बल प्राप्त । कैसेनि पैं जाहलें ॥२६॥ सुग्रीवा तुझें वालिसी वैर । पडावयासि काय विचार । तें कथानक सविस्तर । आम्हांसि तूं सांग पां ॥२७॥ सुग्रीव सांगे पूर्ववृत्तांत । म्हैसासुर नाम दैत्य अद्भुत । त्याचे पोटी दुंदुभि सुत । परम बलिष्ठ जन्मला ॥२८॥ महा उन्मत्त मद्यपानी । कलह माजवावया हिंडे वनीं । परी त्यासी समरांगणीं । युद्धा कोणी भेटेना ॥२९॥ मग दैत्य गेला यमाजवळी । म्हणे मजसीं मांडीं हातोफळी[7] । येरू म्हणे किष्किंधेसी वाळी । त्याजवळी जाईं वेगीं ॥१३०॥ ऐकोनि आला किष्किंधेजवळी । जैसा मूषक निघे व्यालबिळीं । कीं व्याघ्राची पहावया जाळी । जंबुक जैसा पातला ॥३१॥ दैत्य हांक फोडी तये वेळीं । ऐकतां धांविन्नला वीर वाळी । जैसा मृगेंद्र कव घाली । मातंग दूरी देखतां ॥३२॥ शतयोजनें शरीर विशाळ । वाळीनें पदीं धरिला तत्काळ । भूमीवरी आपटिला सबळ । भूमंडळ दणाणलें ॥३३॥ कायेंतूनि गेला प्राण । मग प्रेत त्याचें भवंडोन । रागें दिधलें भिरकावून । ऋष्यमूक पर्वतावरी ॥३४॥ शतयोजनें कलेवर । ऋषींचे आश्रम मोडले समग्र । तेथें मुख्य मातंग ऋषीश्वर । तेणें शाप दीधला ॥३५॥ या पर्वता स्पर्शतां शक्रनंदन । तत्काळ जाईल त्याचा प्राण । दुंदुभीचें प्रेत वरी जाण । पडलें आहे अद्यापि ॥३६॥ मग मयासुर दुदुंभीचा सुत । पितृसूड[8] घ्यावया त्वरित । कीं पतंग अग्नीस सूड मागत । खांडववनाचा घ्यावया ॥३७॥ सर्पाचा सूड समूळीं । सुपर्णासी[9] मागे अळी । तैसा मयासुर ते काळीं । बाहे[10] वाळीस युद्धातें ॥३८॥ शक्रसुत[5] धांविन्नला त्वरित । जैसें पर्वतावरी वज्र पडत । तैसा मयासुर मुष्टिघात । देतां वमीत रक्तासी ॥३९॥

१. वैराग्यरूपी खाणीतील २. ज्ञानरूपी मोत्यांची पेटी ३. शत्रुरूपी अरण्याला अग्नीप्रमाणे ४. काया-वाचा-मने शुद्ध ५. वालीला ६. भूमिजापती श्रीराम ७. कुस्ती ८. पित्याच्या वधाचा सूड ९. गरुड १०. बोलावी

पाताळविवरद्वारें[१] । मयासुर पळाला त्वरें । त्याचे पाठीमागें शक्रकुमरें । धांव घेतली पाताळा ॥१४०॥ विवरद्वारीं मी रक्षण । राघवा बैसलों बहुत दिन । तों यक्ष गंधर्व मिळून । किष्किंधा घेऊं धांविन्नले ॥४१॥ रायाविण कोण राखे पुरी । धाकें दुर्ग ओलांडिलें वानरीं । प्रधान प्रजा ते अवसरीं । मज सांगती गाऱ्हाणें ॥४२॥ मग विवरमुखीं ठेवुनी पर्वत । किष्किंधेस पातलों त्वरित । शत्रु आटोनि समस्त । प्रजा सुखी राहिल्या ॥४३॥ विंशति[२] मासपर्यंत । वाळी विवरीं जाहला गुप्त । मग प्रधान प्रजा समस्त । म्हणती शक्रसुत निमाला ॥४४॥ सकळीं आग्रह करून बळें । राज्यछत्र मज दिधलें । तों मयाचें शिर ते वेळे । वाळी घेऊन पातला ॥४५॥ वीस मास तो निराहार । दृष्टीं न दिसे विवरद्वार । परम उतरला मुखचंद्र । घाबरा वीर जाहला ॥४६॥ उगवला असतां उष्णकर । किंचित दिसों लागलें द्वार । मग नखाग्रेंच नग समग्र । उलथोनियां पाडिला ॥४७॥ हर्षे गर्जना केली थोर । तेणें नादावलें अंबर । परी मजलागीं चिंता अपार । बहु जाहली ते काळीं ॥४८॥ म्हणे बंधु दैत्यांनीं मारिला । घाबरोनि किष्किंधेसी पातला । तों मज राज्यपदीं देखिलें डोळां । परम क्षोभला ते काळीं ॥४९॥ म्हणे महापर्वत घालुनी । मज कोंडिलें दाटूनी । म्यां मरावें हें तुझे मनीं । सिंहासनीं बैसावया ॥१५०॥ स्नेहाविणें बंधुवर्ग जाण । त्यागावा हें शास्त्रप्रमाण । दुर्मुख[३] स्त्रियेसि टाकून । संन्यासग्रहण करावें ॥५१॥ गुरु त्यजिजे ज्ञानहीन । प्रीतीविणें मित्रजन । ऐसें बोलोनि शक्रनंदन । शस्त्र घेवोनि धांविन्नला ॥५२॥ मग हे नळ नीळ जांबुवंत । प्राणसखा माझा हनुमंत । मज घेऊन पळाले त्वरित । ठाव निश्चित नेदी कोणी ॥५३॥ हिरोन घेतली बळेंचि दारा[४] । नित्य येऊनि करी मारा । मग ऋष्यमूकपर्वतीं सीतावरा । केला थारा आम्हीं येथें ॥५४॥ वाळीस असे येथें शाप । यालागीं राहों सुखरूप । सामासां[५] युद्ध अमूप । दोघांसि होत रघूत्तमा ॥५५॥ आम्हां दोघां समान बळ । परी त्याचे गळां विजयमाळ । तेणें त्याचा प्रताप सबळ । शत्रूसी पळ सुटतसे ॥५६॥ विकट विषम ताल सात । एकेच बाणें जो छेदी निमिषांत । त्याचे हातें वाळीस मृत्य । भविष्य पूर्वी केलें हें ॥५७॥ ऐसें बोलतां सूर्यसुत । धनुष्य योजी अवनिजाकांत[६] । अर्धचंद्र बाण त्वरित । आकर्णवरी ओढोनि ॥५८॥ मांडी दृढ देहुडे ठाण । पाठीशी उभा लक्ष्मण । त्याचा चरणांगुष्ठ रघुनंदन । पायांखालीं रगडीत ॥५९॥ दडपितां शेषचरणांगुष्ठ[७] । सप्तही ताड जाहले नीट । एकाचि बाणें ते सपाट । सातही केले राघवें ॥१६०॥ सात ताड शेषपृष्ठीवरी । यालागीं नीटावले ते झडकरी । तों दुंदुभीचें प्रेत ते अवसरीं । मित्रसुतें दाखविलें ॥६१॥ हें जो उचलील पुरुषार्थी । वाळीचा मृत्य त्याचे हातीं । चरणांगुष्ठे रघुपती । प्रेत ढकली तेधवां ॥६२॥ तेंही तृणप्राय उडोन । पडिलें दिगंतरीं जाण । अद्भुत प्रताप देखोन । सुग्रीव चरणीं लागला ॥६३॥ मग म्हणे चापपाणी । सुग्रीवा तूं किष्किंधेसी जाऊनी । वाळीतें पाचारूनि आणीं । समरांगणीं युद्धातें ॥६४॥ ऐसें ऐकोनि यथार्थ । सुग्रीवासी आवेश बहुत । म्हणे हा त्यासी वधील निश्चित । यदर्थी संशय असेना ॥६५॥ कमलदलाक्ष कृपाघन । वर्षे स्वानंदामृतजीवन[८] । तें कर्णद्वारें सेवून । सूर्यसुत तृप्त जाहला ॥६६॥

१. पाताळाच्या विवर मार्गाने २. वीस ३. भांडखोर ४. पत्नी ५. सहा महिने ६. सीतापती राम ७. लक्ष्मणाच्या पायाचा अंगठा ८. अंतरात्म्याला संजीवनीप्रमाणे

रामचंद्रे अमृतबिंदु टाकिले । तेणें सुग्रीवकर्णचकोर धाले । कीं ते कर्णयाचक[१] तृप्त जाहले । श्रीरामवचननिधानें[२] ।।१६७।। मग तो वासरमणीचा[३] सुत । दशकंठरिपूस[४] विनवीत । म्हणे विषकंठवंद्या[५] एक हेत । पूर्ण माझा करीं कां ।।१६८।। तरी अकस्मात टाकोनि बाण । घ्यावा जी वाळीचा प्राण । अवश्य म्हणे जगन्मोहन । भक्तवचनपाळक जो ।।१६९।। मग किष्किंधेसमीप सूर्यकुमार । करीत थोर भुभुःकार । तेणें दणाणलें अवघें नगर । इंद्रपुत्र[६] दचकला ।।१७०।। गळां घालोनि विजयमाळ । वेगीं धांविन्नला वाळी सबळ । म्हणे अरीचा आजि थोर कल्लोळ । कोण साह्य जाहला असे ।।७१।। तारा म्हणे स्वामी परियेसीं । अंगद गेला होता पारधीसी । तेथें बोलत होते ऋषी । राम सुग्रीवा साह्य जाहला ।।७२।। तरी राजेंद्रा अवधारा । आपण न जावें समरा । म्हणोन चरणां लागली तारा । परी शक्रकुमरा न माने तें ।।७३।। ऐकोनि कुंजराचें गर्जन । कैसा उगा राहे पंचानन । मृग बळेंचि आला चालोन । मग शार्दूळ कैसा स्थिरावे ।।७४।। शुष्क काननीं प्रळयाग्न । कैसा राहील शांति धरून । असो सहस्राक्षनंदन[७] । तारेप्रति बोलिला ।।७५।। म्हणे प्राणप्रिये परियेसी । षण्मासां हा येत युद्धासी । आजि आला तिसरे दिवसीं । उल्लासेंसी गर्जत ।।७६।। घायीं शरीर त्याचें जर्जर । तैसें माझेंही जाहलें चूर । त्यासी साह्य वायुकुमार । तेणें वीर आणिला कोणी ।।७७।। तरी तारे तूं आणि अंगद । सुखें भोगा राज्यपद । आजि सुग्रीवाचा करीन वध । तरीच येईन माघारा ।।७८।। नाहीं तरी भेट हेची । बोलोन वाळी उठे तैसाची । जैसी उडी पंचाननाची । मातंगासी लक्षोनियां ।।७९।। जैसा पर्वतावरी पर्वत पडला । तैसा सुग्रीवावरी आदळला । आवेशें झगडती ते वेळां । कांपों लागली धरित्री ।।१८०।। मल्लयुद्ध होतां अनिवार । गुप्त पाहे अवनिजावर । तों दोघे सारिखे दिसती वीर । कोणावरी शर टाकावा ।।८१।। मारूती म्हणे अयोध्यापती । हे दोघे सारखे दिसती । मग सुमनहार त्वरित गतीं । समीरसुतें गुंफिला ।।८२।। सुग्रीवाचे गळां घाली ये क्षणीं । विलोकित कैवल्यदानी । दोघे हांक देत गगनीं । प्रतिध्वनी उठताती ।।८३।। वज्राऐसे कठोर । हाणिती तेव्हां मुष्टिप्रहार । भूगोळ कांपत समग्र । दणाणत पाताळें ।।८४।। शत योजनें झाडें उपडोनी । निजबळें घालिती उचलोनी । उसळें तरू धांवती गगनीं । विमानें पळविती देव पैं ।।८५।। चक्राकार फिरविती पर्वत । न कळतां टाकिती अकस्मात । क्षणक्षणां भूकंप होत । ग्रीवा सरसावी भोगींद्र ।।८६।। हृदयीं समर्पित वज्रमुष्टी । तेणें उडुगणांची होत वृष्टी । गगनीं देवांचिया थाटी । युद्ध दृष्टीं विलोकिती ।।८७।। असो तो सहस्राक्षाचा सुत । सुग्रीवासी हाणी मुष्टिघात । कासावीस सूर्यसुत । मागें पाहात रामाकडे ।।८८।। वीर सांपडत रणमंडळीं । बंधूची वाट पाहे ते वेळीं । तैसा सुग्रीव हृदयकमळीं । दीनबंधूतें आठवी ।।८९।। म्हणे कां न सरे माझा भोग । कृपा न करी अवनिजारंग[८] । जो विषकंठहृदयपद्मभृंग[९] । दशकंठदर्पदमन[१०] जो ।।१९०।। असो इकडे कौसल्यानंदन । तूणीरांतून ओढी दिव्य बाण । जैसी कल्पांतमेघांतून[११] । चपळा बाहेर निघे पैं ।।९१।। धनुष्यासि लावून बाण । लक्ष्य साधिलें दुरोन । वाळीचे हृदयीं येऊन । अकस्मात खडतरला[१२] ।।९२।। बाण लागला सतेज । जैसी गिरीवरी पडे वीज । कीं काद्रवेय[१३] देखतां अरुणानुज[१४] । येऊन झडपी जैसा कां ।।९३।। कीं अभाग्यावरी धाड पडे । कीं राहुमुखीं शशी सांपडे । कीं तपस्वियावरी सांकडें । नसतेंचि येऊनि आदळे ।।९४।।

१. कानरूपी याचक २. रामाचे बोलणे हेच धन ३. सूर्याचा ४. श्रीरामाला ५. रामा ६. इंद्रपुत्र वाली ७. वाली ८. सीतापती राम ९. शिवहृदयकमळातील भ्रमररूपी श्रीराम १०. रावणाचा गर्व हरण करणारा राम ११. कल्पांतीच्या प्रचंड ढगातून १२. घुसला १३. साप १४. गरुड

कीं तृतीयनेत्रींचा अग्न । मन्मथावरी[१] पडे येऊन । तैसा वाळीचे हृदयीं बाण । एकाएकीं संचरला ।।९५।। महावृक्ष उन्मळिला । कीं पर्वत भूमीवरी आदळला । तैसा वाळीनें देह टाकिला । भूमंडळीं तें काळीं ।।९६।। वाळीचा देहांत जाणोनी । जवळी आला चापपाणी । इंद्रतनुज ते क्षणीं । काय बोलता जाहला ।।९७।। तूं क्षत्रिय एकपत्नीव्रती । दुसरी वरिली कां अपकीर्ती । अन्याय नसतां रघुपती । बाण व्यर्थ कां टाकिला ।।९८।। तूं सत्यवचनी यशवंत । महाप्रतापी रणपंडित । तुझी अपकीर्ति त्रिभुवनांत । जाहली सत्य राघवेशा ।।९९।। न हटकितां टाकिला शर । मग बोले जानकीवर । मर्कटा तूं केवळ वनचर । तुज कासया हटकावें ।।२००।। वीर असेल त्यासी हटकावें । वनचरांसी गुप्तचि वधावें । पारधियें मृग साधावे । पाचारावें कासया ।।२०१।। तूं परम अन्यायी वानर । बंधुस्त्रीअभिलाषी[२] अनाचार । म्यां दुष्ट दंडावया अवतार । घेतला असे मर्कटा ।।२।। ऐसें ऐकतां ते काळीं । हृदयीं सद्गद जाहला वाळी । म्हणे मी पावन जाहलों ये वेळीं । तुझेनि हस्तें राघवा ।।३।। थोर सुकृताचे पर्वत । दृष्टीभरी देखिला रघुनाथ । माझें सार्थक जाहलें यथार्थ । नाहीं अंत निजभाग्या ।।४।। येच मार्गी जनकनंदिनी । दशग्रीव गेला घेउनी । मी त्यासी आणितों बांधोनी । एक क्षण न लागतां ।।५।। कक्षेमाजी[३] दाटून । चतुःसमुद्रीं केलें स्नान । पालखावरी[४] आणून । अंगदाच्या बांधिला ।।६।। मग पौलस्तीनें भिक्षा मागोन । नेला दशकंठ सोडवून । त्या मशकाचा पाड कोण । काय उशीर आणावया ।।७।। माझें कर्म परम बळी । तुझी सेवा नाहीं घडली । मग राजीवाक्ष ते वेळीं । स्नेहाळपणें बोलिला ।।८।। तुझे हृदयींचा उपटोनि बाण । आतां तुज सावध करीन । मग म्हणे इंद्रनंदन । ऐसें मरण पुढें न ये ।।९।। तुझेनि हातें देहांत । तूं दृष्टीपुढें रघुनाथ । ऐसें बोलतां शक्रसुत । सुग्रीव जवळी पातला ।।२१०।। नेत्रीं स्रवती जळबिंदु । उचंबळला शोकसिंधु[५] । मग वाळीनें तो कनिष्ठ बंधु । प्रीतीनें जवळी बैसविला ।।११।। काढोनियां विजयमाळा । घातली सुग्रीवाचे गळां । म्हणे धन्य धन्य अनुजा वेल्हाळा । दृष्टीं दाविला श्रीराम ।।१२।। धन्य धन्य तुझें वैर । अंतीं दाविला रघुवीर । वैर नव्हे हा स्नेह थोर । मजलागीं तुवां केला ।।१३।। आतां रघुनाथसेवा प्रीतीं । तुम्हीं करावी अहोरात्रीं । साह्य होवोनि सर्वार्थी । सीतासती सोडविजे ।।१४।। ऐसें शक्रतनुजें[६] बोलोन । विलोकिलें राघवध्यान । तत्काळ देह सोडून । वाळी जाहला विदेही ।।१५।। विष्णुदूत येऊन । नेला विमानीं बैसवून । याउपरी तारेचें समाधान । रघुनंदन करी पैं ।।१६।। ते सुरस कथा अपार । संतीं परिसावी सादर । ब्रह्मानंद श्रीधरवर । अभंग चरित्र वर्णील हें ।।१७।। स्वस्ति श्रीरामविजय ग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत भक्त चतुर । सप्तदशाध्याय गोड हा ।।२१८।। श्रीरामचंद्रार्पणमस्तु ।। ओव्या २१८ ।।

## ।। अध्याय सतरावा समाप्त ।।

१. कामदेवावर २. भावाच्या पत्नीची अपेक्षा धरणारा ३. काखेत दडपून ४. पाळण्यावर ५. शोकाचा समुद्र ६. इंद्रपुत्र वालीने

## ।। अध्याय अठरावा ।।

# सीताशोधासाठी सुग्रीवाकडून वानरांना आज्ञा

।। श्रीगणेशाय नमः।। श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः। रघुनाथ अखिल गुणसमुद्र। रामउपासक तेथें जळचर। ब्रह्मानंदें क्रीडती साचार। प्रेमबळें माजोनियां ।।१।। स्वानंदाचे उमाळे देती। सारासारविचारें तळपती। जीवनावांचोनि गती। दुजी नसे तयातें ।।२।। अविद्याविपिन[1] शुष्क बहुत। कांहींच वासना न करी तेथ। नंदनवनींचा मिलिंद सत्य। अर्कीपुष्पीं बैसेना ।।३।। जो करी सुधारसपान। तो कंटाळे देखोनि वमन। जेणें आत्मशयनीं केलें शयन। तो भवकानन कां सेवी ।।४।। कल्पद्रुम ज्याचे अंगणीं। नित्य सुरभी दुभे सदनीं। तो तृणबीज काढोनी। कदाकाळीं भक्षीना ।।५।। प्रारब्धभोगें वावरे शरीर। तेविषयीं न धरिती आदर। तैसे रघुवीरभजनीं सादर। हेंही नेणती कदा ते ।।६।। सतरावे अध्यायीं गतकथार्थ। श्रीरामें मारिला शक्रसुत। सुग्रीव उशासी मांडी देत। देहांतसमयीं वाळीच्या ।।७।। तों अंगदसमवेत तारा सती। सत्वर पावली जेथें पती। मग म्हणे अयोध्यापती। काय ऐसें केलें तुवां ।।८।। आतां टाकोनि एक बाण। राघवा घेईं माझा प्राण। मी पतिसमागमें जाईन। काय वांचोनी व्यर्थ आतां ।।९।। कवळोनि वाळीचें प्रेत। तारा अत्यंत शोक करीत। ऐसें जाणोनि जनकजामात। काय बोले तें ऐका ।।१०।। कोण्या अर्थालागीं देख। तारे तूं करिसी शोक। येरी म्हणे पतिवियोगपावक[2]। तेणें दग्ध जाहल्यें मी ।।११।। ताटिकांतक म्हणे ते काळीं। कलेवराचें[3] नाम वाळी। तरी तें पडलें तुजजवळी। जैसें तैसें संचलें ।।१२।। ज्यालागीं शोक करिसी बहुत। तरी तें पडलें वाळीचें प्रेत। येरी म्हणे हृदयस्थ। आत्मा गेला निघोनियां ।।१३।। मग बोले अयोध्याविहारी। तूं काय आत्म्याची अंतुरी[4]। कीं शरीराची ते निर्धारीं। सांगें मज विचारूनि ।।१४।। शरीर तंव नाशवंत। आत्मा अविनाश शाश्वत। तरी शोक करावा किमर्थ। पाहें बरवें विचारोनि ।।१५।। जैसा घटीं आणि रांजणीं। एकचि बिंबला वासरमणी। तैसा स्त्रीपुरुष अभिधानीं। आत्मा एक अव्यंग ।।१६।। घट मठ मोडतां निःशेष। जेवीं न मोडेचि आकाश। कीं तरंग मोडतां सागरास। नाश नसे सहसाही ।।१७।। मायामय लटिका खेळ। जैसें नसतांचि दिसे मृगजळ। कीं गंधर्वनगर केवळ। मिथ्याभास आभासे ।।१८।। सुधापानी स्वर्गीं असती। तेही नाश पावती कल्पांतीं। जें जें दिसे आकाररीतीं। नाश निश्चितीं असे तेथें ।।१९।। भग्नपात्रींचें गेलें नीर। माजी बिंबला रोहिणीवर। तो न दिसे म्हणोनि अपार। शोक करी अज्ञानी ।।२०।। मळे पिकवीन अपार। यालागीं इच्छी रोहिणीनीर[5]। तें अदृश्य होतां साचार। शोक करिती मूर्खत्वें ।।२१।। सकळ पिंडांसमवेत। ब्रह्मांड अवघें मिथ्याभूत। आत्मा अक्षय शाश्वत। शोक किमर्थ करिसी तूं ।।२२।। ऐशीं रावणारीचीं वचनें। अमृताहून गोड गहनें। कीं बोधसमुद्रींचीं चिद्रत्नें। तारेलागीं दीधलीं ।।२३।। कीं तीं विश्रांतीचीं मंदिरें। कीं अनुभवनभींचीं[6] नक्षत्रें। कीं स्वानंदाची पात्रें। मुखावरी उचंबळती ।।२४।। कीं रामवचन अगस्त्य थोर। शोषिला तिचा शोकसागर। कीं वचनरूपें दिनकर। अज्ञानतिमिरनाशक पैं ।।२५।।

---

१. अज्ञानरूपी अरण्य २. पतीचा वियोगरूपी अग्नी ३. शरीराचे ४. स्त्री ५. मृगजळ ६. अनुभवरूपी आकाशातील

मदनारिमित्राचे[१] चरण । तारेनें धरिलें प्रीतीकरून । श्वासोच्छ्वास टाकून । तटस्थरूपें राहिली ॥२६॥ श्रीराम म्हणे तारेलागून । माझें वचन मानीं प्रमाण । सुग्रीवासी माळ घालून । सुखेंकरोनि वर्तावें ॥२७॥ तारा म्हणे चापपाणी । हे वेदविरुद्ध दिसे करणी । मग म्हणे कैवल्यदानी । वचन मानीं माझें हें ॥२८॥ तूं पतिव्रतांमाजी विख्यात । तारे होसी पैं यथार्थ । अघटित घडवी रघुनाथ । महिमा अद्भुत जयाचा ॥२९॥ देवाचें अघटित आचरण । तें मानव करूं म्हणती आपण । तरी तें नरकासी कारण । होईल निश्चयें जाण पां ॥३०॥ अघटित घडवी रघुनंदन । स्तंभाविण राहिलें गगन । उदकावरी पृथ्वी संपूर्ण । न बुडे जाण सहसाही ॥३१॥ त्याचें कर्तृत्व करिती इतर । तरी अनर्थासी नाहीं पार । स्वेच्छा वर्ते सर्वेश्वर । नव्हे म्हणे कोण त्यातें ॥३२॥ यावरी उत्तरक्रिया समस्त । वाळीची करी सूर्यसुत । अंगदावरी रघुनाथ । प्रीति अत्यंत करीत पैं ॥३३॥ असो ते तारा सुंदरी । रामें बोधिली ऐशियापरी । सुग्रीवासी दिधली निर्धारीं । शेंसपाट[२] भरोनियां ॥३४॥ यावरी तारेनें माळ । सुग्रीवासी घातली तत्काळ । जेणें प्रसन्न होय तमालनीळ । आचरण तेंचि उत्तम ॥३५॥ सकळ कपी जयजयकारें । गर्जना करिती लहानथोरें । नभ नादावलें भुभुःकारें । महागजरें दुमदुमित ॥३६॥ राघव म्हणे सुग्रीवास । आम्ही येथें राहतों चार मास । तुम्हीं भोगोनि राजविलास । सत्वर परतोनि येइंजे ॥३७॥ अर्कज[३] म्हणे रघुनाथा । आपण किष्किंधेसी चलावें आतां । श्रीराम म्हणे माझिया भरता- । कारणें मी व्रतस्थ ॥३८॥ माझिया जिवलगाविण । न करीं मी मंगलस्नान । आठवोनि भरताचे गुण । रघुनंदन गहिंवरला ॥३९॥ मी चित्रकूटींहूनि निघतां । भरतासी जाहली जे अवस्था । ते सुग्रीवा न ये सांगतां । धीर चित्ता न धरवे ॥४०॥ जैसें बाळक परदेशीं । माता टाकोनि जाय तयासी । मजविणें माझ्या भरतासी । तैसें जाहलें असेल ॥४१॥ सांगतां भरताचे गुण । सद्गद जाहला रघुनंदन । सुग्रीव धांवोनि धरी चरण । लक्ष्मणही गहिंवरला ॥४२॥ असो यावरी राजीवनेत्र । बोलता जाहला नीरदगात्र[४] । म्हणे सुग्रीवावरी धरीं छत्र । सौमित्रा सत्वर जाऊनियां ॥४३॥ रघुपतीचें चरणांबुज । वंदी तेव्हां सुमित्रातनुज[५] । आशीर्वाद देत भरताग्रज । विजयी होईं सर्वदा ॥४४॥ मग सौमित्रें जावोनि सत्वर । सुग्रीवावरी धरिलें छत्र । अमात्यपद[६] पवित्र । वाळिपुत्रासी दीधलें ॥४५॥ सवेंच परतोन लक्ष्मण । आला जेथें जानकीजीवन । जवळी उभा वायुनंदन[७] । कर जोडोनी सर्वदा ॥४६॥ किष्किंधेसी नित्य जाऊन । राघवापाशीं येई परतोन । तों चातुर्मास्य लोटले पूर्ण । सुग्रीवासी स्मरण[८] नव्हेचि ॥४७॥ देखोनियां शरत्काळ । बोलता जाहला तमालनीळ । म्हणे सुग्रीव जाहला सबळ । राज्यमदेंकरूनियां ॥४८॥ विषयसंगें रमलें मन । धनविद्यामदें गेला भुलोन । परी सज्जनीं त्यास दंडोन । सन्मार्गातें लावावें ॥४९॥ तरी किष्किंधेसी जाईं लक्ष्मणा । आठव देईं सूर्यनंदना[३] । तो जरी न मानी माझिया वचना । तरी वधोनि त्यासी येइंजे ॥५०॥ तारा रुमा दोघी घेऊन । नित्य करी मद्यपान । जो न करी माझें स्मरण । त्यास अवश्य दंडावें ॥५१॥ जो ब्राह्मण देखोनि उपहास[९] करी । संतभक्तांचा द्वेष धरी । सद्गुरुवचन अव्हेरी । त्यासी अवश्य दंडावें ॥५२॥ निंदी हरिहरांचीं चरित्रें । अपमानी जो सत्पात्रें । अपूज्य पूजी आदरें । त्यासी अवश्य दंडावें ॥५३॥ कायावाचामनें[१०] । ज्यासी परपीडा अगत्य करणें । आणि वेदविरुद्ध ज्यासी वर्तणें । त्यासी अवश्य दंडावें ॥५४॥ ऐश्वर्यमदें जे मातले । हिंसा करितां न कंटाळले । धर्मपंथ ज्यांनीं मोडिले । त्यांसी अवश्य दंडावें ॥५५॥

१. श्रीरामाचे २. सौभाग्यचिन्हे व वस्त्रे ३. सुग्रीव ४. मेघासमान सावळे शरीर असणारा-राम ५. लक्ष्मण ६. प्रधानपद ७. हनुमान ८. आठवण ९. अपमान १०. शरीर, वाणी आणि मनाने.

कमळा[१] आणि चक्रपाणी[२] । भेटों इच्छिती धर्मसदनीं[३] । कार्पण्यलोभें[४] विघडी दोन्ही । त्यासी अवश्य दंडावें ॥५६॥ यास्तव वीरचूडामणी[५] । किष्किंधेसी जाईं ये क्षणीं । तो जरी माझें वचन अवगणी । तरी तेचि क्षणीं वधावा ॥५७॥ वाळी निर्दाळिला ज्या बाणें । त्याच शरें त्याचा प्राण घेणें । ऐसें ऐकतां लक्ष्मणें । राघवचरण वंदिले ॥५८॥ धनुष्यासी चढवूनि गुण । वेगें चालिला उर्मिलाजीवन[६] । किष्किंधेसमीप येऊन । लाविला बाण चापासी ॥५९॥ तों इकडे सूचना मारुती । पूर्वींच जाणवीत सुग्रीवाप्रती । म्हणे एकला वनीं रघुपती । चला वेगीं दर्शना ॥६०॥ सीताशुद्धीसी त्वरित । वानर धाडावे निश्चित । तू जाहलासी उन्मत्त बहुत । रामकार्यार्थ नाठवे ॥६१॥ तारुण्यमदें आधींच उन्मत्त । त्यावरी मद्यपानीं आसक्त । उपरी धनमद दाटला बहुत । मान विशेष त्यावरी ॥६२॥ जाणें अत्यंत वाचाळपण । कोणासी बोलों नेदी वचन । जैसें मद्यपियाचें भाषण । सव्यापसव्य[७] नेणेचि ॥६३॥ तैसा तूं जाहलासी निश्चित । स्त्रियांच्या संगें उन्मत्त । विसरलासी स्वामिकार्यार्थ । सूर्यसुत मग बोले ॥६४॥ जाहले घूर्णित लोचन । बोले उदासीन वचन । म्हणे वानरसेना मेळवून । सिद्ध करा हळू हळू ॥६५॥ ऐसें बोलोनि सूर्यसुत । राणिवसामाजी[८] प्रवेशत । तों नगरद्वारीं ऊर्मिलानाथ । येवोनि उभा ठाकला ॥६६॥ धनुष्यासी लावूनि बाण । क्षोभे जैसा प्रळयाग्न । पळों लागले वानरगण । येती शरण सुग्रीवा ॥६७॥ सुग्रीव तेव्हां गजबजिला । म्हणे हनुमंता रक्षीं मला । येरू म्हणे सौमित्री कोपला । तो नाटोपे कवणातें ॥६८॥ उभयदारांसमवेत[९] । शरण येत मग सूर्यसुत । आणिक वानरभार समस्त । सांगे हनुमंत समस्तां ॥६९॥ म्हणे हो नम्रता धरून । अवघे घाला लोटांगण । तैसेंच करिती वानरगण । सुग्रीवासहित तेधवां ॥७०॥ तारा रुमा पुढें होऊन । सौमित्रीसीं मागती चुडेदान । सुग्रीव धरी दृढ चरण । उर्मिलापतीचे तेधवां ॥७१॥ सौमित्री म्हणे क्रोधायमान । ऐसे तुम्ही निर्दय पूर्ण । श्रीराम सच्चिदानंदघन । वनीं सांडोन राज्य करितां ॥७२॥ तो अनंतब्रह्मांडनायक । अयोध्यानाथ पुण्यश्लोक । त्यास वनीं सांडोनि राज्यसुख । गोड कैसें वाटलें ॥७३॥ हनुमंत बोले वचन । सर्व अपराध क्षमा करून । उठवावा सूर्यनंदन । प्रीतींकरोन ये समयीं ॥७४॥ मग उठवोनि सूर्यसुत । राघवानुज आलिंगीत । तंव वानरभार अद्भुत । चहूंकडोन धांविन्नले ॥७५॥ वानरचमूसमवेत[१०] । चालिला तेव्हां तमारिसुत[११] । जैसी नदी उचंबळोन बहुत । मिळूं जाय जलार्णवा ॥७६॥ आवेशें वानरगण धांवत । जैसें गोकुळ तृषाक्रांत । सरितापंथें जळपानार्थ । चपळत्वेंकरून लोटत ॥७७॥ कीं दात्याचें गृह लक्षून । धांवती वेगें याचकजन । कीं पहावया सद्गुरुचरण । सच्छिष्य येती त्वरेनें ॥७८॥ कीं लग्नघटिका उरली थोडी। देखोनि धांवती वऱ्हाडी। कीं मिलिंदचक्रें[१२] धांवती तांतडी। पद्ममकरंद[१३] सेवावया ॥७९॥ तैसे आले रघुपतीजवळी । लोटांगणें घालिती सकळी । रामें आलिंगिला हृदयकमळीं । मित्रतनुज[११] आदरें ॥८०॥ आणिकही सकळ वानरां । भेटला परत्रींचा सोयरा । कर जोडोनि पुढारां । किष्किंधेश स्तवीतसे ॥८१॥ जय निगमागमवंद्या रघुवीरा । भक्तकैवारिया आनंदसमुद्रा । पंचकद्वयरथपुत्रा[१४] । विश्वनेत्रा विश्वपालकी ॥८२॥ शरणागतासी तू वज्रपंजर । कदा नुपेक्षीं शारंगधर । जैसें सबळ काष्ठ तारी नीर[१५] । आपण वाढविलें म्हणोनी ॥८३॥ तिळभर पाषाण न तरे जळीं । वृक्षां तारी सर्वकाळीं । शरणागतांची माउली । तैसाचि तूं श्रीरामा ॥८४॥ पद्मासी[१६] ढका न लावी भ्रमर । काष्ठें तत्काळ करी चूर । तेवीं भक्तपालका अभक्तसंहार । सीतावल्लभा करिसी तूं ॥८५॥

१. लक्ष्मी २. श्रीविष्णू ३. धर्माच्या ठायी ४. कृपणपणाने ५. लक्ष्मणा ६. लक्ष्मण ७. चांगले व वाईट ८. राणीमहालात ९. दोन्ही पत्न्यांसह १०. वानरगणांसह ११. सुग्रीव १२. भ्रमरदले १३. कमळांतील मध १४. दाशरथी राम १५. पाणी १६. कमलपुष्पास

असो भूरत्नशुद्धीसी[१] वानर । जावया इच्छिती सर्वत्र । मग बोले विषकंठमित्र । जाऊं द्या सत्वर चहूंकडे ॥८६॥ अर्कसुतें पाठवून दूत । वानर आणविले समस्त । अष्टादश पद्में बल अद्‌भुत । समरीं कृतांता जिंकिती ॥८७॥ सुग्रीवें घालोन आण । आणिले सप्तद्वीपींचे हरिगण[२] । समस्तांसी म्हणे सूर्यनंदन । ऐका वचन सत्य माझें ॥८८॥ सीताशुद्धि करून तत्त्वतां । जानकी भेटवू रघुनाथा । हें कार्य सिद्धीस न पावतां । निजनगरासी न जावें ॥८९॥ सीता न भेटवितां रघुवीरा । तो कोणी जाईल माघारा । तो मातृगमनी अवधारा । ब्रह्महत्यारी पापिष्ठ ॥९०॥ त्यासी रासभावरी बैसवून । तत्काळ छेदीन नासिका कर्ण । पृथ्वीवरी फिरवीन । स्वामिद्रोही म्हणोनियां ॥९१॥ सीताशुद्धि नोहे म्हणोन । जो कोणी येईल परतोन । त्यासी मी स्वहस्तें दंडीन । छेदीन कर चरण तयाचे ॥९२॥ तंव द्वीपोद्वीपींचे वानर । गिरिकंदरीं जे राहणार । मेरुपाठारवासी समग्र । देत भुभुःकार पातले ॥९३॥ नाद न मायेचि गगनीं । चालतां दणाणे मंगळजननी । शेष कूर्म दचकले मनीं । भुभुःकारध्वनि ऐकोनियां ॥९४॥ एक हरी[३] पर्वत उचलोनी । कंदुकवत धाडिती गगनीं । एक वरचेवर झेलोनी । भिरकाविती दुसरीकडे ॥९५॥ एक महावृक्ष उपडोनि बळें । झोडोनियां भक्षिती फळें । पृथ्वी अंबर समग्र भरलें । ऋक्षवानरीं[४] तेथवां ॥९६॥ एक गगनपंथें उडिया घेती । खालीं पाडूं पाहती गभस्ती । खुंटली समीराची गती । वाट न फुटे चालावया ॥९७॥ एक पश्चिमसमुद्रा धांवती । तों अस्तासी गेला दिनपती । एक समुद्रीं पुच्छें बुडविती । ओढून काढिती जलचरें ॥९८॥ दश लक्ष योनी उदकांत । नानाजातींचे जीव बहुत । आणोनि राघवासी दावित । चतुःसमुद्र धुंडोनियां ॥९९॥ नानाजातींचे वानर । बहुत रंग बहुत विकार । एक उभे राघवासमोर । वांकुल्या दाविती विनोदें ॥१००॥ अति विशाळ धरोनि द्रुम । आनंदें नाचती प्लवंगम[३] । एक गायन करिती सप्रेम । डोल्लत राम ऐकोनियां ॥१॥ राग उपराग भार्येसहित । मूर्च्छना शरीर कंपित । सप्त ताल अति संगीत । गीत प्रबंध खंडरचना ॥२॥ गद्यपद्यछंदोगती । ऐकतां तटस्थ होय गभस्ती । ठायींच्या ठायीं शिळा विरती । गायन ऐकतां तयांचें ॥३॥ असो यावरी मित्रपुत्र[५] । मित्रकुलमंडनातें[६] समग्र । दावीतसे सकळ भार । पृथ्वी अंबर[७] भरलें तें ॥४॥ जैसे कां जळतरंग । सागरीं तळपती सवेग । परी तो पाहतांचि सांग । सागरचि एकला ॥५॥ तैसा ब्रह्मानंदसागर रघुवीर । तेथींच्या लहरी ते वानर । असो पृथ्वी दिशा अंबर । वानरमय दिसतसे ॥६॥ ते रघुनाथाची मनोवृत्ती । सकळ सुर[८] अवतरले क्षितीं । वानरवेषें अपार शक्ती । उचलूं भाविती भूगोळ[९] ॥७॥ नळ केला दळाधीश[१०] । अठरा पद्में वानर विशेष । बाहात्तर कोटी रीस । छप्पन्न कोटी गोलांगुल[११] ॥८॥ सीतावल्लभ म्हणे किष्किंधानाथा । मज वाटते बहुत चिंता । अन्न वस्त्रें या समस्तां । कोठून आतां पुरवावीं ॥९॥ अर्कज म्हणे जनकजावरा[६] । यांसीं फळ मूळ कंद आहारा । न मिळे तरी भक्षिती समीरा[१२] । तेणेंचि तृप्त होती हे ॥११०॥ अंबर[१३] म्हणो तरी हे दिगंबर । शस्त्रे पर्वत किंवा तरुवर । ऐकतां मंगळभगिनीचा[१४] वर । परम आश्चर्य मानीतसे ॥११॥ सुग्रीव म्हणे राजीवनेत्रा । हा खेळ तुझा कोमलगात्रा । जाणोनि पुससी विचारा । पदवी वानरां देऊनियां ॥१२॥

१. सीतेचा शोध घेण्यास २. वानरगण ३. वानर ४. वानर व अस्वले ५. सुग्रीव ६. श्रीरामाला ७. आकाश ८. देवगण ९. पृथ्वी १०. सेनापती ११. काळा वर्ण व लाल गाल असलेले वानर १२. वायु १३. वस्त्र १४. सीतापती श्रीराम

असो यावरी ताराकांत[१] । सकळ वानरां आज्ञापीत । कीं त्रिभुवन धुंडोनि समस्त । सीताशुद्धि करावी ॥१३॥ महीतळ अतळ वितळ । सुतळ तळातळ महातळ । सातवें तें रसातळ । शोधावया धाडिले ॥१४॥ विलोकावे चतुर्दश लोक । वैकुंठ कैलासादि सकळिक । धुंडोनियां आवश्यक । सीताशोध करावा ॥१५॥ कैलासादि ब्रह्मलोक । इंद्रचंद्रसूर्यलोक । जनलोक तपोलोक । सकळ शोधूं धाडिले ॥१६॥ वरुणलोक भूलोक । यमलोक पितृलोक । मृत्युलोकासी विशेष देख । लोक चतुर्दश धुंडावे ॥१७॥ भरतखंड रमणकखंड । हरित सत्य विधिविशेष प्रचंड । केतु सुवर्ण द्राक्ष वितंड । हरिखंड नववें पैं ॥१८॥ जंबुद्वीप शाकद्वीप । शाल्मली क्रौंच लक्षद्वीप । अंगवंगादि दक्षद्वीप । छप्पन्न देश धुंडावे ॥१९॥ वनें उपवनें पर्वत । ऋषिआश्रम विवरें बहुत । भक्तांचीं स्थानें मठ बहुत । शोधावया धाडिले ॥१२०॥ तीर्थें क्षेत्रें शोधिलीं नाना । परी रामांगना कोठें दिसेना । सीतेचें स्वरूप समजेना । कष्टताती बहुसाल ॥२१॥ सीता रामाची ज्ञानशक्ती । तिची कैसी आहे स्थिती । न पुसतां व्यर्थचि भ्रमती । अहंमतीं[२] भुलोनियां ॥२२॥ सद्गुरूसी न रिघतां शरण । कदापि नोहे आत्मज्ञान । नवनीत मंथनावांचून । हाता न चढे सर्वथा ॥२३॥ व्यर्थ हिंडतां भागले वानर । दृष्टी न पडे सीता सुंदर । परतोनि येती समग्र । अधोवदन लज्जित ॥२४॥ मग तयांचें समाधान । स्वयें करीत रघुनंदन । दक्षिणदिशेसी कोण कोण । गेले तेंचि ऐका हो ॥२५॥ मुख्य अंगद वाळीसुत । नळ नीळ ऋषभ जांबुवंत । पांचवा तो हनुमंत । जो उमाकांत अवतरला ॥२६॥ आणिक एक शत वानरगण । रघुपतीची आज्ञा घेऊन । आक्रमिलें सकळीं गगन । वायुवेगेंकरोनियां ॥२७॥ तंव तो कृतांतासी शिक्षा करणार । महाराज जो रुद्रावतार । अंगदासी म्हणे क्षण एक स्थिर । तुम्हीं रहावें समस्तीं ॥२८॥ कांहीं आठवलें मानसीं । पुसोनि येतों रघुपतीसी । ऐसें बोलोनि तयांसी । वायुसुत परतला ॥२९॥ एकाएकीं येऊन । दृढ धरिले रामचरण । उभा ठाकला कर जोडून । जैसा सुपर्ण विष्णूजवळी ॥१३०॥ मारुती बोले मंजुळ उत्तरीं । म्हणे भार्गवजिता[३] अवधारीं । सीताशुद्धि वानरीं । कैसी करावी तें सांगा ॥३१॥ सीतेचें स्वरूप कैसें स्वामी । केवीं ओळखिजे प्लवंगमीं[४] । रूपरेखा कैसी आम्हीं । जाणावी जी राघवा ॥३२॥ ऐसें हनुमंत बोलतां । संतोषला कमलोद्भवपिता । म्हणे तुझिया बुद्धीस तुळितां । वाचस्पति हळुवट[५] ॥३३॥ तुवां पुसिलें सीतास्वरूप । तरी तें जाण माझेंचि रूप । जैसी प्रभा आणि दीप । एकरूप दोहींचें ॥३४॥ जैसी कनक आणि कांती । कीं रत्न आणि त्याची दीप्ती । तैसी जाण सीता सती । स्वरूप माझें अभेद ॥३५॥ सीतेच्या अंगींचा सुवास । मृगमदाहूनि विशेष । अर्धयोजन आसपास । घ्राणदेवीसी[६] संघटे[७] ॥३६॥ खूण ऐकावी मारुती । मुखीं कर्पूराची वसे दीप्ती । माझें स्मरण अहोरातीं । सीता सती करीतसे ॥३७॥ द्वादशहस्तप्रमाण[८] साचार । सीतेसमीप पाषाण तरुवर । त्यांसी माझें स्मरण निरंतर । खूण साचार ओळखें ही ॥३८॥ अंतरखूण[९] सांग सीतेतें । कैकेयीगृहीं म्यां स्वहस्तें । वल्कलें नेसविली तियेतें । वनवासासी निघतां पैं ॥३९॥ मग विनवी समीरात्मज[१०] । ऐसी खूण द्यावी मज । जेणें अवनिजा[११] मानी सहज । दास मी तुमचा सत्य कीं ॥१४०॥ ऐकोनि मारुतीचें वचन । तोषलें[१२] रघुनाथाचें मन । धन्य धन्य म्हणवून । शब्दरत्नें गौरविला ॥४१॥ धन्य ते अंजनी सज्ञान । ऐसें प्रसवली निधान[१३] । ज्याच्या प्रतापाखालीं संपूर्ण । ब्रह्मांड ठेंगणें[१४] होय कीं ॥४२॥

१. सुग्रीव २. मीपणा ३. परशुरामाला जिंकणारा श्रीराम ४. वानरांनी ५. फिका ६. नाकाला ७. भिडतो ८. बारा हात अंतरापर्यंत ९. रहस्यमयखूण १०. हनुमान ११. सीता १२. संतुष्ट झाले १३. उत्तमोत्तम १४. खुजे

प्रेम नावरे रघुनाथा । हृदयीं आलिंगिलें हनुमंता । वरदहस्त ठेवोन माथां । करीं मुद्रिका घातली ॥४३॥ खूण दीधली अवतारमुद्रिका[1] । जेणें मानी जनककन्यका । मग साष्टांगें रघुनायका । हनुमंत वंदी ते काळीं ॥४४॥ पुढती विलोकी रामवदन । हृदयीं रेखिलें तैसेंचि ध्यान । श्रीराम सद्गद होऊन । बोलता जाहला ते काळीं ॥४५॥ कधी येशील परतोन । मग म्हणे वायुनंदन । एक मास सरतां पूर्ण । सीतादर्शन घेऊनि येतों ॥४६॥ ऐसें बोलून हनुमंत । यशस्वी पूर्ण अयोध्यानाथ । आनंदें गर्जोनि अकस्मात । गगनपंथें उडाला ॥४७॥ जैसा योगभ्रष्ट जन्म पावत । मागुती स्वरूपीं ऐक्य होत । तैसे कपी वाट पाहात । वायुसुत आला तेथें ॥४८॥ रामस्मरणें अवघे गर्जती । सपक्ष नग जैसे उडती । तैसे निराळमार्गें सर्व जाती । अगस्त्यदिशा लक्षोनि ॥४९॥ चपळ पाणिद्वय[2] चरण । गगनीं झेंपावती हरिगण[3] । यशस्वी अयोध्याप्रभु म्हणोन । वारंवार गर्जती ॥१५०॥ अंतरिक्षीं जाती कपिगण । तों देखिलें शापदग्ध वन । वानरांचीं किरणें[4] अडखळून । मुरकुंडी वळोन पडियेले ॥५१॥ मागुती उड्डाण घेऊं जाती । समस्तांच्या आकर्षिल्या शक्ती । एकाकडे एक पाहाती । तटस्थ मारुती जाहला ॥५२॥ ऐसें काय कारण व्हावयासी । तरी तेथें पूर्वी दंडक ऋषी । महातापसी तेजोराशी । पुत्र त्यासी एक होता ॥५३॥ अष्टादश वरुषांचा सुत । वनीं क्रीडतां अकस्मात । वनदेवता अद्भुत । भयानक धांविन्नली ॥५४॥ तिने भक्षिला ऋषिनंदन । दंडक ऋषीनें ते जाणोन । शापिले तेव्हां तें कानन । महाक्रोधेंकरूनियां ॥५५॥ जो या वनीं संचरेल प्राणी । तो मरण पावेल तेचि क्षणीं । कपी सावध रामस्मरणीं । म्हणोनि प्राण वांचले ॥५६॥ असो तो दंडकाचा नंदन । विशाळ ब्रह्मराक्षस होऊन । नित्य भक्षी जीव मारून । द्वादश योजनें भोंवते ॥५७॥ तेणें देखोन वानर । मुख पसरोन भयंकर । भक्षावया आला सत्वर । कपिवीर गजबजिले ॥५८॥ ऐसें देखोन वालिकुमार । परमप्रतापी प्रचंडवीर । निःशंक धांवोनि सत्वर । राक्षस चरणीं धरियेला ॥५९॥ गगनीं गरगरां भोवंडिला । उर्वीवरी आपटिला । शरीर चूर जाहलें ते वेळां । मृन्मय[5] घटशकलासारिखें[6] ॥१६०॥ ऐसा तो दंडकाचा पुत्र । पावला तत्काळ पूर्वशरीर । मग तेणें आपुला समाचार । वानरांसी सांगितला ॥६१॥ वंदोनियां वानरगणा । तत्काळ गेला पितृदर्शना । पुढें रामदूतां पंथ सुचेना । दिशा समजेना कोणती ते ॥६२॥ वृक्ष फळ ना कोठेही जळ । दग्ध वन दिसे सकळ । क्षुधेतृषेनें पीडोनि विकळ । वानर तेव्हां तडफडती ॥६३॥ ओढवलें दैव परम कठिण । शोधिती शुष्क विपिन । तंव देखिले विवरांतून । पक्षी फळें आणितां ॥६४॥ त्या विवरद्वारीं येऊन । थोकले तेव्हां वानरगण । एक योजन लंबायमान । तमेंकरून[7] पूर्ण तें ॥६५॥ पुढें जाहला वायुकुमार । मागें येती समस्त वानर । जैसी संतांची कांस मुमुक्षु[8] नर । धरिती आत्मसाधनार्थ ॥६६॥ कीं वेदोक्तमार्गेंकरून । वर्तती जैसे विद्वज्जन । कीं खड्गधारातीर्थस्नान[9] । करूनि स्वर्गस्थ वीर होती ॥६७॥ हनुमंताच्या आधारें समस्त । तैसे वानर विराजत । परी कासावीस जाहले तेथ । मूर्च्छा[10] येऊनि पडती पैं ॥६८॥ श्वसोच्छवास कोंडोन । आकर्षले[11] सर्वांचे प्राण । मग हनुमंतें पुच्छेंकरून । सकळ बांधोन उचलिले ॥६९॥ योजन एक क्रमोनि विवर[12] । मारुती गेला सत्वर । पुढें प्रकाश देखिला अपार । वन सुंदर सफळ[13] तें ॥१७०॥ पुष्पफळभारें द्रुम[14] । वाढिन्नले भेदीत व्योम[15] । त्या वृक्षांवरी प्लवंगम । चढावया शकती ना ॥७१॥

१. रामनामाची अंगठी २. दोन हात ३. वानरगण ४. उड्या ५. मातीच्या ६. मडक्याच्या तुकड्यासमोर ७. अंधाराने ८. मोक्षार्थी ९. रणांगणात खड्गाने मृत्यू म्हणजे मोक्ष १०. भोंवळ ११. कासावीस झाले. १२. भुयार १३. फळांनी युक्त १४. वृक्ष १५. आकाश

शरीर जाहलें परम क्षीण । यालागीं ऊर्ध्व न होय उड्डाण । तों सुप्रभा[1] खेचरी[2] येऊन । उभी ठाकली सन्निध ॥७२॥ तियेप्रती पुसे वायुनंदन । हेममय हे नगर पूर्ण । फलोदक अमृतासमान । कवणें हें स्थान निर्मिलें ॥७३॥ सुप्रभा सांगे पूर्ववृत्तांत । या स्थळीं होता मय दैत्य । तेणें तप करून अद्भुत । विष्णुसुत प्रसन्न केला ॥७४॥ मग त्याकारणें हें स्थान । विरिंचीनें निर्मून । त्यासी दिधलें वरदान । विवरामाजी चिरंजीव तूं ॥७५॥ विवराबाहेर येतां जाण । तत्काळचि पावसी मरण । तो नानाकौटिल्यविंदाण[3] । मंत्रहवन जाणतसे ॥७६॥ बहुत तप आचरोन । दैत्यांचें इच्छी कल्याण । मग इंद्रें विधीस प्रार्थून । हेमा नारी निर्मिली ॥७७॥ स्वरूपें लावण्यें आगळी । त्या विवरांत प्रवेशली । मयदैत्य देखोन ते वेळीं । आसक्त होवोनी भाळला ॥७८॥ म्हणे मज तूं वरीं वो सुंदरी । ते म्हणे चाल विवराबाहेरी । मरण विसरोन दुराचारी । उर्वीवरी पातला ॥७९॥ तों इंद्रें घालोनि वज्रप्रहार । तेथेंचि मारिला मयासुर । मग हेमेलागीं हें नगर । ब्रह्मदेवें दीधलें ॥१८०॥ मग कित्येक काळ क्रमोनि देखा । हेमा गेली सत्यलोका । मी तिची परिचारिका । वननगर रक्षीतसें ॥८१॥ देवां दुर्गम हें स्थान । मज हेमा बोलिली वचन । येथें येतील वानरगण । तुज उद्धरोनि जाती ते ॥८२॥ मग हनुमंत सांगे स्ववृत्तांत । सीताशुद्धीसी जातों समस्त । क्षुधाक्रांत तृषाक्रांत । या विवरांत प्रवेशलों ॥८३॥ मग तिनें घातला नमस्कार । फळें पुष्पें आणोनि सत्वर । वानरांसहित वायुकुमार । षोडशोपचारीं पूजिला ॥८४॥ फळें उदक सेवून । तृप्त जाहले वानरगण । मग परतले तेथून । परी विवरद्वार न सांपडे ॥८५॥ मग सुप्रभेसी म्हणे हनुमंत । माते आम्हां दावीं शुद्ध[4] पंथ । तेव्हां ते खेचरी बोलत । नेत्र समस्त झांका तुम्ही ॥८६॥ ऐसें ऐकतां वचन । समस्तीं विवरीं झांकिले नयन । सुमुहूर्तीं एक मंत्र जपोन । काय तेव्हां बोलिली ॥८७॥ मग म्हणे उघडा नेत्र । तों समुद्रतीरीं उभे वानर । सुप्रभा न दिसे साचार । नवल थोर वर्तलें ॥८८॥ कपी आश्चर्य करिती ते क्षणीं । जैसे संसारदुःखें वेष्टिले प्राणी । त्यांसी निजज्ञान उपदेशूनी । सद्गुरु काढी बाहेर ॥८९॥ कीं जळते घरींहून काढिलें । कीं पूरीं बुडतां वांचविलें । कीं शिर छेदितां सोडविलें । तैसें केलें सुप्रभेनें ॥१९०॥ कृपाळु तो रविकुळभूषण[5] । तेणेंच ते दिधली धाडोन । समुद्रतीरीं वानरगण । ब्रह्मानंदें नाचती ॥९१॥ इकडे तें विवर त्यजूनि सुप्रभा । किष्किंधेसी जाऊन सीतावल्लभा । भेटली कौसल्यागर्भा । दृष्टीभरोनि न्याहाळित ॥९२॥ म्हणे ब्रह्मानंदा आत्मयारामा । मज पावन करी मेघश्यामा । मग तीस उपदेशुनी बदरिकाश्रमा । राघवेंद्रें पाठविली ॥९३॥ काळांतरें बदरिकाश्रमीं । देह ठेवोनि कैवल्यधामीं । जैसी सुवर्णप्रभा जडे शोध[6] हेमीं[6] । तैसीच स्वरूपीं समरसली ॥९४॥ इकडे समुद्रतीरीं वानर । चिंताक्रांत करिती विचार । म्हणती शोध न लागे अणुमात्र । कैसा प्रकार करावा ॥९५॥ एक म्हणती परतोनि जावें । काय रघुवीरासी सांगावें । आमुचेनि हे कदा नोहे । सीताशुद्धि म्हणोनियां ॥९६॥ तरी आतां द्यावे जी प्राण । परी न जावें परतोन । व्यर्थ काय वांचोन । प्रेतवत संसारीं ॥९७॥ मग आणोनिया काष्ठभार[7] । ढीग रचिले पर्वताकार । तत्काळचि वैश्वानर । वानरवीरीं चेतविला ॥९८॥ तो जांबुवंत बोले वचन । मीच आधीं सेवीन कृशान[8] । यावरी अंजनीगर्भरत्न[9] । ऋक्षपतीप्रति[10] काय बोले ॥९९॥ म्हणे जांबुवंता सर्वज्ञा । मजप्रति द्यावी आधीं आज्ञा । यावरी तो ऋक्षराणा । प्रत्युत्तर देतसे ॥२००॥ मी बहु वडील तुम्हांहून । मज आधीं देइजे हा मान । मग बोले वायुनंदन[9] । वडील आयुष्यें मी असें ॥१॥

१. या नावाची २. आकाशातील परी ३. अनेक प्रकारच्या कपटविद्या ४. योग्य ५. श्रीराम ६. शुद्ध केलेले सुवर्ण ७. लाकडांचा ढीग ८. अग्नी ९. हनुमंत १०. जांबवानास

जयाचे गांठी आयुष्य फार । तोचि वृद्ध म्हणावा साचार । ज्याचें मरण जवळी निर्धार । तोच धाकुटा बोलिजे ॥२॥ तुझें अयुष्य मागें सरलें । माझें बहुत पुढें उरलें । ज्याचे गांठीचें धन वेंचलें । मग भाग्यवंत नव्हे तो ॥३॥ असो मग जांबुवंताप्रती । समस्त वानर विनविती । श्रीराममुद्रांकित मारुती । त्यासी आज्ञा देइंजे ॥४॥ मग हनुमंतें झांकून नेत्र । हृदयीं आठविला कामांतकमित्र[१] । जो जीमूतवर्ण[२] कोमलगात्र । अति पवित्र नाम ज्याचें ॥५॥ स्मरण करून हनुमंत । लोटला तेव्हां अग्निआंत । उडीसरसा अग्नि होय शांत । परम अद्भुत वर्तलें ॥६॥ वानर म्हणती कच्चें जाहले । काष्ठढीग पुढती रचिले । आकाश कवळिलें ज्वाळें । दिशा धूमें दाटल्या ॥७॥ सपक्ष नग येत अकस्मात । तैसा लोटला हनुमंत । तत्काळ जाहला अग्नि शांत । न दिसे किंचित कोठें पैं ॥८॥ ऐसेंच केलें तीन वेळ । परी न मरे अंजनीबाळ । आश्चर्य करिती कपी सकळ । वर्णिती बळ मारुतीचें ॥९॥ कपी म्हणती हनुमंता । आम्हांसी मरों दे तरी आतां । येरू म्हणे सागरी तत्त्वतां । प्राण देऊं चला हो ॥२१०॥ तेथोन निघाले वानर । तों समीप देखिला नदीश्वर[३] । चिंताक्रांत वायुकुमर । ध्यानस्थ बैसला एकीकडे ॥११॥ वरकड ते वानरगण । चिंतातुर करिती शयन । तों संपाती मुख पसरून । भक्षावया पातला ॥१२॥ अरुणपुत्र तो पक्षी थोर । जटायूचा ज्येष्ठ सहोदर[४] । मुख पसरोनि भयंकर । वानरांसी भेडसावी ॥१३॥ जवळ देखोनि संपाती । कपी एकमेकां बोलती । जटायूसारिखा निश्चितीं । दिसतसे द्विजराज[५] हा ॥१४॥ म्हणती अनायासेंकरून । आम्हांसी आलें जवळीं मरण । मग आठवून रघुनंदन । नामस्मरणें गर्जती ॥१५॥ ज्याचें नाम घेतां संकटीं । निर्विघ्न होय सकळ सृष्टी । अपाय ते उपाय शेवटीं । दु:ख तेंचि सुख होय ॥१६॥ असो नामघोषें कपी[६] गर्जती । तों पक्ष[७] फुटले संपातीप्रती । तेणें लोटांगण घातलें क्षितीं । जयजयकारेंकरूनियां ॥१७॥ म्हणे धन्य धन्य तुम्ही वानर । केला माझा अजि उद्धार । कोठें आहे रघुवीर । माझा सहोदर तेथें असे ॥१८॥ बहुत दिवस जाहले । परी त्याचा समाचार न कळे । तों कपिवीर बोलिले । जटायु मारिला रावणें ॥१९॥ पितृव्य[९] म्हणोनि रघुनाथ । जटायूसी होता मानित । त्याची उत्तरक्रिया समस्त । राघवें केली निजांगें ॥२२०॥ जटायूचें सार्थक केलें । संपातीनें अंग धरणीवरी टाकिलें । म्हणे अहा ओखटें जाहलें । दिशा शून्य बंधूविणें ॥२१॥ सूर्यमंडळ पहावयालागोनी । दोघे गेलों होतों उडोनी । तैं म्यां पक्षाखालीं घालूनी । जिवलग आपुला वांचविला ॥२२॥ माझे पक्ष दग्ध जाहले ते वेळीं । मग म्यां भयें हांक फोडिली । सूर्यरथीं अरुणें ऐकिली । स्नेहेंकरोनि कळवळला ॥२३॥ मग सूर्यासी प्रार्थून । वर दिधला मजलागून । रामदूतांचे होतां दर्शन । पक्ष संपूर्ण फुटतील ॥२४॥ जैसा पक्षहीन पर्वत । तैसा पडलों होतों येथ । अजि पक्ष आले अकस्मात । तुमच्या प्रतापेंकरूनियां ॥२५॥ हा चंद्रगिरि नाम पर्वत । एथें चंद्रनामा आहे महंत[१०] । तो सद्गुरु माझा यथार्थ । मज वेदांतज्ञान सांगतसे ॥२६॥ असो संपाती पुसे वानरांतें । कोठें जातां येणें पंथें । कपी म्हणती सीताशुद्धीतें । करूं जातों पक्षींद्रा ॥२७॥ संपाती मग बोलत । पैल ते लंका दिसत । सीता सती अशोकवनांत । बैसली असे ध्यानस्थ ॥२८॥ तरी तुम्हीं समस्त वानरीं । बैसावें माझिये पृष्ठीवरी । नेऊन घालीन पैलपारीं । लंकेमाजी येधवां ॥२९॥

१. शिवमित्र राम २. नीलवर्ण ३. समुद्र ४. एका मातेच्या उदरी जन्मलेले ५. पक्षिराज ६.वानर ७. पंख ८. जमिनीवर ९. काका १०. साधू

अथवा एकोत्तरशत[1] माझे सुत । पृथक् बैसा समस्त । मग म्हणे जांबुवंत । मार्गचि सांग आम्हांतें ॥२३०॥ संपाती बोले वचन । ऐलतीरीं[2] मलयागिरिचंदन । त्याची शाखा शतयोजन । लंकेमाजी प्रवेशली ॥३१॥ परी तेथें कृष्णसर्प असती । तुमची न चले गती । शतयोजन सरितापती [3]। लंकेसी परिघ आडवा ॥३२॥ मग नमस्कारोनि वानरांसी । संपाती गेला निजाश्रमासी । कपी बैसले विचारासी । जंबुवंतासहित सर्व ॥३३॥ सागराचें जीवन । रुंद असे शतयोजन । उडावया सामर्थ्य पूर्ण । कोणा किती सांगा तें ॥३४॥ मग परस्परें ते वानर । करिती उडावयाचा विचार । शतयोजनें समुद्र । उडवे कोणासी एकदां ॥३५॥ जांबुवंत म्हणे मी जाईन । परी भागले माझे चरण । मी आणि वैद्य सुषेण । दोघेजण श्रमलों बहु ॥३६॥ बळीचिया घरीं अद्भुत । त्रिविक्रम जाहला वैकुंठनाथ । सात प्रदक्षिणा एके दिवसांत । केल्या आम्हीं साक्षेपें ॥३७॥ तेणें भागले बहुत चरण । त्याहीवरी वृद्धपण । आणिक एकदां मेरूवरून । उडी घातली म्यां तळवटीं ॥३८॥ तेव्हां सूर्यरथींचें चक्र । मांडीस झगटलें जेवीं वज्र । तेणें व्यथा अहोरात्र । वृद्धपणीं जाचीतसे ॥३९॥ याकरितां नव जाय उड्डाण । मग बोले वालिनंदन[4] । मी तेथें जाईन उडोन । परी मी बाळ नेणतें ॥२४०॥ वानर म्हणती करावें काय । या पैलतीरा कोण जाय । जांबुवंत म्हणे वायुतनय[5] । याचे पाय धरा आतां ॥४१॥ तंव तो अंजनीचा नंदन । करीत बैसला रामध्यान । वानर घालिती लोटांगण । करिती स्तवन मारुतीचें ॥४२॥ वानर म्हणती हनुमंतासी । तूं सांग सखया किती उडसी । हंसें आलें मारुतीसी । काय तयांसी बोलिला ॥४३॥ अंजनी जैं मज प्रसवली । बाळभूक बहु लागली । तैं लक्षयोजनें उडी घातली । गभस्तीवरी अकस्मात ॥४४॥ ऐसें वचन ऐकिलें । वानर चरणांसी लागले । राघवें बळ संपूर्ण ओळखिलें । तरीच मुद्रा दीधली ॥४५॥ तरी आपुलें कार्य आतां । सत्वर साधीं हनुमंता । ऐसें म्हणतां कपिनाथा । स्फुरण आलें ते काळीं ॥४६॥ हनुमंत म्हणे वानरांसी । तुम्ही पर्वत धरा पोटाशीं । माझिया अंगवातें घुंघाटेंसीं । समुद्रांत पडाल कीं ॥४७॥ झाडें खोडें वानर कवळीत । महेंद्रपर्वतीं चढे हनुमंत । जांबुवंतादि वानर समस्त । कौतुक पाहती मारुतीचें ॥४८॥ अवघे जे कां वानर । त्यांसी पुसोन वायुकुमार । आधीं पुच्छाचा फडत्कार । गाजविला हनुमंतें ॥४९॥ हृदयी केलें श्रीरामस्मरण । शक्तिदाता तूं म्हणोन । अहंकर्ताभाव गाळून । मन निमग्न रघुनाथीं ॥२५०॥ तो परात्पर राजहंस । जो रविकुळकमळदिनेश[6] । ब्रह्मानंद पुराणपुरुष । हृदयीं आठविला मारुतीनें ॥५१॥ रामविजय ग्रंथ वरिष्ठ । षड्रसान्नांचें भरले ताट । ज्यांसी श्रवणाची क्षुधा उत्कट । ते जेवोत आदरें ॥५२॥ किष्किंधाकांड येथें संपलें । पुढें सुंदरकांड आरंभिलें । ग्रंथाचें पूर्वार्ध जाहलें । उत्तरार्ध परिसा आतां ॥५३॥ ब्रह्मानंदा जानकीजीवना[7] । श्रीधरवरदा जगद्भूषणा[8] । अज[9] अजिता[10] अव्यया[11] निर्गुणा[12] । अक्षया[13] अभंगा[14] अव्यया[15] ॥५४॥ स्वस्ति श्रीरामविजय ग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत भक्त चतुर । अष्टादशाध्याय गोड हा ॥२५५॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ओव्या २५५ ॥

॥ अध्याय अठरावा समाप्त॥

## ॥ किष्किंधाकांड समाप्त ॥

॥ श्रीरामविजय पूर्वार्ध समाप्त ॥

१. एकशेएक २. या तीरावर ३. समुद्र ४. अंगद ५. मारुती ६. सूर्यवंशी श्रीराम ७. जानकीला प्राणांपलीकडे प्रिय-राम ८. जगाचे भूषण ९. अजन्मा १०. अजिंक्य ११. अविनाशी १२. त्रिगुणातीत १३. क्षयरहित १४. भंगरहित १५. श्वाश्वत

# सुंदर कांड

## ।। अध्याय एकोणिसावा ।।

## संपातीच्या सांगण्यावरून सीताशोधासाठी हनुमान लंकेत

।। श्रीगणेशाय नमः।। श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः। अद्‌भुत रामकथेचा महिमा। देऊं गोदावरीची उपमा। स्नान करितां कर्मा अकर्मा। पासोनि मुक्त होइजे ।।१।। उभयलोकीं इच्छा अधिक। हींचि तटाकें सुरेख। मनोरम प्रवाह देख। उचंबळेल ब्रह्मानंदें ।।२।। रामकथामृतजीवन[१]। प्रेमळ तेथें जळचरें पूर्ण। देव गंधर्व मुनिजन। तटीं सघन तरू हेचि ।।३।। अनेक चरित्रें तत्त्वतां। त्याचि येथें मिळाल्या सरिता। भक्ति ज्ञान वैराग्य पाहतां। ऊर्मी येथें विलसती ।।४।। ओघ चालिला अद्‌भुत। फोडोनियां पापपर्वत। सप्तकांड सप्तमुखें मिळत। भक्तहृदयसागरीं ।।५।। जे त्रिविधतापें[२] तापले। जे तीर्थव्रतें करितां भागले। ते येथें स्नान करितां निवाले। नाहीं परतले संसारा ।।६।। या गंगेत करितां स्नान। अंगीं संचरे भक्तिज्ञान। सकळ चातुर्यें एकवटोन। पायां लागती अपार ।।७।। सुंदरकांड इंद्रभुवन[३]। प्रेमरस तो सहस्रनयन[४]। वाग्देवी[५] हे रंभा पूर्ण। नृत्य करी कुशलत्वें ।।८।। अंतरी उघडोनि श्रवण[६]। श्रवण[७] करोत पंडित जन। सप्तकांडोत्तर संपूर्ण। सुंदरकांड रसभरित ।।९।। अठरावे अध्यायीं कथा अद्‌भुत। समुद्रतीरीं उभा हनुमंत। लंकेसी जावया उद्युक्त। वानर समस्त पाहती ।।१०।। लोकप्राणेशसुत[८] ते वेळां। महेंद्रचळीं उभा ठाकला। परम भुभुःकारें गर्जिन्नला। तेणें डळमळला भूगोळ ।।११।। सुटला जातां अंगवात। म्हणोनि वानर भयभीत। पोटाशीं धरोनि पर्वत। अगोदर बैसले ।।१२।। यशस्वी रघुवीर म्हणोन। समीरात्मजें केलें उड्डाण। त्याचे अंगवातेंकरून। प्रळय वर्तला सर्वांसी ।।१३।। महातरुवर उन्मळोनी। द्विजांऐसे[९] फिरती गगनीं। अचळ चळती ठायींहूनी। भुभुःकारध्वनीसरिसेचि ।।१४।। नक्षत्रें रिचवती भूमंडळी। बैसली मेघांची दांतखिळी। कृतांतासही ते वेळीं। भय अत्यंत वाटलें ।।१५।। उचंबळलें समुद्रजळ। डळमळलें उर्वीमंडळ। हेलावती सप्तपाताळ। अंगवातेंकरूनियां ।।१६।। भोगींद्र दचकला अंतरीं। कूर्म निजपृष्ठी सांवरी। यज्ञवराह धरित्री। उचलोनि देत दाढेसी ।।१७।। दिग्गज चळचळां कांपती। मेरुमंदार डळमळती। सुधापानी[१०]परम चित्तीं। भय पावले तेधवां ।।१८।। शचीवर मनीं दचकला। अपर्णा पडे शिवाचे गळां। भयभीत जाहली कमळा। विष्णु तीतें सांवरी ।।१९।। विरिंचि सांगे सकळांप्रती। सीताशुद्धीस जातो मारुती। सुर विमानीं बैसोनि येती। अद्‌भुत कौतुक पाहावया ।।२०।। कौतुक विलोकिती सुर सकळ। प्रतापरुद्र अंजनीबाळ। कीं तो वासरमणि निर्मळ। वानरवेषें जातसे ।।२१।। कल्पांतविजूचे उमाळे भडकती। तैशीं कुंडलें कर्णीं तळपती। वज्रकौपीन निश्चितीं। कटिप्रदेशीं मुंजी झळके।।२२।। त्रिगुणरूप[११] कल्पांतचपळा। तेवीं यज्ञोपवीत[११] रुळे गळां। उणें आणिलें दिव्य प्रवाळा। मुखीं पुच्छाग्रीं रंग तैसा ।।२३।। अंगींच्या रोमावळी पिंजारत। भुभुःकारें नभ गर्जत। दिग्गजांचीं टाळीं बैसत। आंदोळत ब्रह्मांड पैं ।।२४।। गाजवी पुच्छाचा फडत्कार। प्रतिशब्द देत अंबर। दणाणत लंकानगर। दशवदन हडबडला ।।२५।। चपळ पदद्वय आणि पाणी[१२]। झेंपावत धांवे गगनीं। उड्डाणावरी उड्डाण घेऊनी। रुद्रावतार जातसे ।।२६।।

---

१. रामकथारूपी अमृत हेच पाणी २. आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक ताप ३. अलकापुरी ४. इंद्र ५. सरस्वती ६. कान ७. ऐकण्याची क्रिया ८. हनुमंत ९. पक्ष्यांसारखे १०. देवता ११. सत्त्व, रज व तम हे तीन गुण म्हणजेच तंतुमय जानवे १२. हात

अंतरिक्षीं जाय सपक्ष[१] पर्वत । कीं क्षीराब्धीप्रती[२] द्विजेंद्र[३] धांवत । कीं मानस लक्षोनियां जात । राजहंस ज्यापरी ॥२७॥ कीं चिंतामणिवारु सवेग । चपळत्वें क्रमी नभमार्ग । अंजनीहृदयारविंदभृंग[४] । जात चपळत्वें तैसाचि ॥२८॥ पितयाचें बहुत गमन । तयाहूनि सवेग कपीचें उड्डाण । किंवा रघुनाथाचा बाण । चापापासून सूटला ॥२९॥ कीं मनाचें चंचळपण । पावे जैसें चिंतिलें स्थान । तैसा लोकप्राणेशनंदन । यमदिशा[५] लक्षोनि जातसे ॥३०॥ ऐसा अंतरिक्ष जातां हनुमंत । आश्चर्य करिती देव समस्त । म्हणती पाहों याचें सामर्थ्य । रंभा त्वरित पाठविली ॥३१॥ साधितां परमार्थज्ञान । आडवें येत मायाविघ्न । कीं साधूं जातां निधान । विवशी येत आडवी ॥३२॥ तैसी रंभा देवीं धाडिली । मुख पसरोनि उभी ठाकली । तिच्या वदनांत उडी पडली । हनुमंताची अकस्मात ॥३३॥ तिच्या कर्णद्वारे मारुती । सवेंचि निघाला त्वरितगती । तिने हनुमंत स्तवोनि प्रीतीं । स्वर्गाप्रती गेली मग ॥३४॥ समुद्रें पाठविला पर्वत । मैनाकनामें अद्भुत । तो ऊर्ध्वपंथें आडवा येत । हनुमंतासी ते काळीं ॥३५॥ जों जों वाढे पर्वत । तों तों उंच जाय हनुमंत । मग तो अचळ प्रार्थीत । हनुमंतासी ते काळीं ॥३६॥ म्हणे महापुरुषा मजवरी । विश्रांति घेईं क्षणभरी । मग एकाच हस्तें भारीं[६] । नग पाताळीं घातला ॥३७॥ जो शांतिसुखें डोलत । त्यास देखोन क्रोध पळत । तैसा हस्तभारें पर्वत । सागरांत दडपिला ॥३८॥ तेथोन उड्डाण पुढें चालिलें । तों सिंहिकेनें वदन पसरिलें । छायासूत्र साधिलें । कापट्य केलें अद्भुत ॥३९॥ राहुकेतूंची जे माता । तेचि सिंहिका जाण तत्त्वतां । ती ग्रासावया हनुमंता । पूर्वींच तेथें जपत होती ॥४०॥ उताणी समुद्रांत निजोन । बारा योजनें पसरिलें वदन । छाया पडतांचि वायुनंदन । तिच्या वदनांत कोसळला ॥४१॥ स्वर्गींचा हुडा[७] अकस्मात । उर्वीवरी जेवीं पडत । सिंहिकेच्या वदनीं हनुमंत । पडिला सत्य त्यापरी ॥४२॥ ते दातांसी दांत मेळवीत । तों उदरांत गेला हनुमंत । पोट फाडून त्वरित । आला बाहेर ते काळीं ॥४३॥ विषयपाश तोडोनि समस्त । परमार्थी निघे जेवीं विरक्त । तैसा बाहेर आला हनुमंत । सिंहिका तेथेंच निमाली ॥४४॥ पुढें चालिले उड्डाण । तों लंकादेवी आली धांवोन । तिनें आडवा पाय घालून । हनुमंतासी पाडिलें ॥४५॥ करितां श्रीरामभजन । नसतीं विघ्नें येती धांवोन । परी साधक तितुकीं लोटून । सावधान स्मरण करी ॥४६॥ असो लंकादेवीस मुष्टिप्रहार । वज्रप्राय देत वायुकुमर । तिनें स्तवन केलें अपार । म्हणे मज न मारावें ॥४७॥ तूं विजयी होशील साचार । तंव पुढें उडी जात अपार । पडलंकेसी सत्वर । उडी जावोन पडियेली ॥४८॥ उडीसरसी ते वेळीं । पडलंका ते दणाणली । क्रौंचा असे तये स्थळीं । कनिष्ठ भगिनी रावणाची ॥४९॥ तिचा घर्घरनामें भ्रतार । इंद्रे मारिला तो असुर । यालागीं क्रौंचेसी दशकंधर[८] । पडलंकेसी स्थापीत ॥५०॥ असो तें दणाणलें लंकानगर । म्हणोनि क्रौंचा[९] घेत समाचार । असुरी पाठविल्या अपार । धरिला वानर ते काळीं ॥५१॥ तों हनुमंतें ते वेळे । संकीर्ण रूप धरिलें कोंवळें । क्रौचेनें डोळां देखिलें । हातीं धरिलें दृढ तेव्हां ॥५२॥ म्हणे हा चिरा[११]गे वानर । पाक करोनि आणा सत्वर । हनुमंत म्हणे माझें शरीर । उदकमय सर्वही ॥५३॥ पाक करितां नुरेचि कांही । यालागीं तूं सगळाचि खाईं । असुरीनें[१२] उचलोन लवलाहीं । मुखांत घातला हनुमंत ॥५४॥

१. पंख असणारे २. क्षीरसमुद्राकडे ३. गरुड ४. मारुती ५. दक्षिण दिशा ६. वजनाने ७. बुरुज ८. रावण ९. राक्षसीचे नाव १०. लघु ११. कापा १२. राक्षसीने

दांतांसी दांत मिळवी येरी । तंव तो प्रवेशला अंतरीं । काळिज धरोनि उभय करीं । झोळकंबा घेत मारुती ॥५५॥ तंव ते चडफडे ते वेळे । भोवंडी तेव्हां नेत्रबुबुळें । गडबडां भूमीवरी लोळे । वांचवा म्हणे मज आतां ॥५६॥ सूकरविष्ठा आणोन बहुत । असुरी क्रौंचेसी पाजीत । हनुमंत आंत कंटाळत । निघों पाहत बाहेरी ॥५७॥ तिच्या नासिकाद्वारें हनुमंत । पुच्छाग्र बाहेर दावीत । असुरी धरोनि वोढीत । रोगबीज म्हणोनियां ॥५८॥ ओढी ओढितां अपार । पुच्छरोगाचे पडले ढिगार । मग हनुमंतें असुरी समग्र । बांधोनियां आसुडिल्या ॥५९॥ हनुमंताचें अद्‌भुत बळ । क्रौंचेचीं आंतडीं तोडिलीं सकळ । उदर फाडोन तत्काळ । बाहेर आला गर्जोनियां ॥६०॥ असंख्यात राक्षसिणी । भारा बांधोनि आपटिल्या धरणीं । भिरकावीत समुद्रजीवनीं । जाहलीं पारणीं जळचरांची ॥६१॥ जैशा मनाच्या अनंत वृत्ती । मनोजयें योगी आकर्षिती । तैशा असुरी संहारूनि मारुती । विजयी जाहला पडलंके ॥६२॥ अत्यंत ज्या वृद्धा असुरी । उरल्या होत्या नगरांतरीं । तयांसी म्हणे रुद्रावतारी । लंका कोणती दावा गे ॥६३॥ नाहीं तरी तुम्हांसी भक्षीन । म्हणोन पसरिलें तेव्हां वदन । वृद्धा बोलती भिऊन । पैल ते लंका दिसतसे ॥६४॥ तों अस्ता गेला दिनकर । निकुंभिलेंत प्रवेशला वायुकुमार । शोधीत चालिला सीता सुंदर । धांडोळीत मा गोपुरें सर्वही ॥६५॥ केरामाजी पडलें मुक्त[१] । तें झारा युक्तीनें निवडीत । कीं सारासारविचार शोधीत । साधक आत्मप्राप्तीतें ॥६६॥ कीं यात्रेंत चुकली जननी । सत्पुत्र काढीते शोधूनी । कीं महावैद्य काननीं । संजीवनी शोधूं निघे ॥६७॥ कीं समुद्रांत नेले वेद । ते मत्स्यरूपी शोधी मुकुंद । तैसा राघवचरणाब्जमिलिंद[२] । निकुंभिलेंत शोधी सीता ॥६८॥ तों देखिलें शक्रजिताचें[३] मंदिर । हेमरत्नमय[४] अति सुंदर । त्यांत प्रवेशला वानर । राघवप्रिया पाहावया ॥६९॥ शक्रजित सुलोचना उभयतां । शेजे पहुडलीं होय देखता । मग म्हणे हेच होईल[५] सीता । रत जाहली परपुरुषाशीं ॥७०॥ आतां घालोनि पाषाण । घेईन दोघांचाही प्राण । मग म्हणे ऐकावें भाषण । बोलती काय परस्परें ॥७१॥ तंव ते शेषकन्या[६] स्वभावें तेथ । इंद्रजितासी बोलत । तुमचा पिता लंकानाथ । अनुचित वर्तत असे ॥७२॥ अणुमात्रहि वैर नसतां । व्यर्थ आणिली जनकदुहिता[७] । कुळक्षयास तत्त्वतां । कारण केलें गमताहे ॥७३॥ परसतीचा अभिलाष करी । साधुसंतांचा द्वेष धरी । गुरुद्रोह ज्यामाझारी । अल्पायुषी तो साच ॥७४॥ मातापित्यांचा करी तिरस्कार । ब्राह्मणांसी निंदी निरंतर । जो हिंसक दुष्ट दुराचार । अल्पायुषी तोचि पैं ॥७५॥ हरिचरित्रें उच्छेदित । निंदी महापुरुषांचे ग्रंथ । नसतेंच काढी पाखंड मत । अल्पायुषी तो साच ॥७६॥ म्हणोनि श्रावणारितनयवनिता[८] । आणोनि अनर्थ केला वृथा । आतां लंकेची गति तत्त्वतां । न दिसे पाहतां बरी कांहीं ॥७७॥ ऐकतां तेथें ऐसी मात । लंकेंत प्रवेशे हनुमंत । बिभीषणाचे मंदिरांत । वायुसुत[२] संचरला ॥७८॥ सत्त्वशील बिभीषण । करीत श्रीविष्णूचें उपासन । सदा होत हरिकीर्तन । तेणें सदन दुमदुमलें ॥७९॥ नाहीं रजतमांची वार्ता । न दिसे द्वेष हिंसा तत्त्वतां । पुराणश्रवण हरिकथा । याविण चर्चा नसेचि ॥८०॥ मननशील[९] प्रेम अद्भुत । दशेन्द्रियें हरुषें वोसंडत । जीवन्मुक्त ते भगवंत । झाले न कळती इतरांतें ॥८१॥ दया क्षमा आणि शांती । बिभीषणाचें हृदयीं नांदती । असो तेथें कीर्तनीं मारुती । निजानंदें नाचतसे ॥८२॥ कीर्तनकल्लोळरंगांत[१०] । गडबडां लोळे हनुमंत । कंठ होऊन सद्‌गदित । ब्रह्मानंदें डुल्लतसे ॥८३॥

१. मोती २. हनुमंत ३. रावणपुत्र मेघनादाचे ४. सोने व रत्ने यांनी मढविलेले ५. असेल ६. सुलोचना ७. जनककन्या सीता ८. रामपत्नी सीता ९. चिंतनमग्न १०. नामस्मरणाच्या जल्लोषात

घेऊन भक्तांचे चरणरज । कपाळीं लावी वायुतनुज । म्हणे होय राक्षसवंशज । परी भक्तराज सात्त्विक हा ॥८४॥ वायसांत कोकिळा वसत । कीं दैत्यकुळीं प्रल्हाद भक्त । कीं कागविष्ठेंत अश्वत्थ । तें वास्तव्यस्थळ[1] विष्णूचें ॥८५॥ कीं परिस जैसा पाषाणांत । कीं शुक्तीमाजी दिव्य मुक्त । तैसा राक्षसकुळीं हा भक्त । अलंकृत उत्तम गुणीं ॥८६॥ लंकेस आलिया रघुनंदन । सहपरिवारें मारूनि रावण । मग रघुपतीस प्रार्थोन । राज्य संपूर्ण देईन यासी ॥८७॥ जैसे दवडोन मत्सर काम क्रोध । साधु करिती निजबोध । तैसा बिभीषण भक्त प्रसिद्ध । अक्षय स्थापीन लंकेसी ॥८८॥ बिभीषणाचे मंदिरांत । परम संतोषला हनुमंत । जैसें तृषेनें पीडितां बहुत । गंगा अकस्मात देखिली ॥८९॥ चकोरा पावे रोहिणीवर । कीं चातकां वोळला अंबुधर[2] । तैसें देखोनि बिभीषणाचें मंदिर । वायुपुत्र आनंदला ॥९०॥ मग चालिला पुढारा । देखे कुंभकर्णाचे मंदिरा । तों दुर्गंधि आली एकसरां । कंटाळे मन मारुतीचें ॥९१॥ जैसा मेघ गडगडत । तैसा कुंभकर्ण घोरत । कुंजर म्हैसे खर बहुत । नासिकाबिळांत गुंतले ॥९२॥ श्वासासरसे बाहेरी । आरडत पडती एकसरीं । कीं तो मंदराचळ पृथ्वीवरी । निद्रित होवोन पडियेला ॥९३॥ मातेचिया उदरांतून । जेव्हां पडला कुंभकर्ण । तेव्हां पसरोनि विशाळ वदन । तीस सहस्र स्त्रिया गिळियेल्या ॥९४॥ असो देखोन कुंभकर्ण । आश्चर्य करी वायुनंदन । म्हणे हा वृथा पुष्ट जन्मोन । व्यर्थ येथें पडियेला ॥९५॥ देखोन अंत्यजाचें घर । पळे जैसा श्रोत्रिय पवित्र । तैसा अंजनीचा पुत्र । सांडोन चालिला पुढारा ॥९६॥ जो कल्पद्रुमीं द्विज राहणार । तो बाभुळेवरी न बैसे साचार । तैसें अव्हेरूनि घटश्रोत्राचें[3] घर । रामकिंकर पुढें जाय ॥९७॥ कोठें नुमगे मंगळभगिनी । मारुती विचार करी मनीं । कोणतें स्वरूप धरूनी । लंकेमाजी हिंडावें ॥९८॥ वानररूपेंकरूनी । जरी विचरावें लंकाभुवनीं । तरी राक्षस विनोदें धरूनी । नाना चेष्टा करितील ॥९९॥ राक्षसरूप धरावें क्रूर । तरी करवितील मांसाहार । द्विजमांस[4] भक्षितां साचार । पुण्य समग्र भस्म होय ॥१००॥ कीं करूं जाऊं शिष्टाई । तरी रावण न मानी काळत्रयीं । राक्षसांसीं भेद करितां पाहीं । विनोद माझा करितील ॥१॥ असो वानररूप पालटोनी । अणुप्रमाण वेष धरूनी । न खुपे मुंगीचे नयनीं । घरोघरीं हिंडतसे ॥२॥ जैसा जनीं असोनि जनार्दन । जीवांसी नव्हे दृश्यमान । तैसा निरालोद्भवनंदन[5] । व्यक्त न दिसे कोणासी ॥३॥ घरोघरीं चर्या पाहत । तों अवघे देखिले अधर्मरत । वरिवरी आचार दावीत । जैसा मैंद शांति धरी ॥४॥ घरोघरीं अग्निहोत्रें पूर्ण । मुखीं सदा वेदाध्ययन । परी दृष्टीं देखतां गोब्राह्मण । मुखीं घालोन रगडिती ॥५॥ जारकर्मरत नारी नर । रुद्राक्षमाळा घेऊन थोर । जपती सदा कौटिल्यमंत्र । जारण मारण मोहनादि ॥६॥ लटिकेचि डोळे झाकून । दाविती शांति अवलंबून । मांस रक्त मद्यपान । घूर्णितनयन डुल्लती ॥७॥ हृदयीं मद मत्सर दुमदुमती । वाचाबळें[6] जनांसी गोंविती । आम्ही कर्मातीत जाहलों म्हणती । दुराचारी क्रियाभ्रष्ट ॥८॥ आम्ही ज्ञानी सदा मुक्त । झालों लौकिककर्मविरहित[7] । मना आवडे तो भोग भोगीत । महा उन्मत्त विषयांध पैं ॥९॥ व्यर्थ राक्षसांचा आचार । जैसे स्नान करून आले कुंजर । कीं भस्मांत लोळती खर । त्यांसी योगीश्वर कोण म्हणे ॥११०॥ एक राक्षस संन्यास घेऊन । करिती गोमांसभक्षण । सवेंच संपादोनि आचमन । कर्ता कोण म्हणती पैं ॥११॥

१. निवासस्थान २. पर्जन्यमेघ ३. कुंभकर्णाचे ४. ब्राह्मणाचे मांस ५. हनुमंत ६. पांडित्याने ७. कर्मातीत

विरजाहोम करून । तीळ तूप गेलें जळोन । कामक्रोधादि साही जण । अधिकाधिक माजले ॥१२॥ नाना जीवजाती भक्षोनी । म्हणती आम्हांतें शिवूं नका कोणी । एक गोचर्म पांघरोनी । जटाधारी बैसले ॥१३॥ वनांत हिंडती वानप्रस्थ । गोहरणालागीं बैसती गुप्त । ब्राह्मणांसी मारून भक्षीत । कर्ता येथें कोण म्हणती ॥१४॥ आम्ही ब्रह्मचारी विरक्त । म्हणोन इंद्रियें ठेविली मुक्त । गृहस्थ पडले गृहगतींत[१] । पापें अमित जोडिती ॥१५॥ क्षत्रियधर्मीं सर्व वसती । परी समरीं पाठी देऊन पळती । वाढिवेच्या गोष्टी बोलती । घाय घालिती धर्मकर्मा ॥१६॥ वैश्यांचें अधर्मी चित्त । जोखोन[२] दुसऱ्यासी नाडीत । शुद्ध धर्मवाट पाडीत । विप्रसेवा सांडोनियां ॥१७॥ वाण्यांनी उदीम तळासी आणिला । सर्वत्रांचा गुंडाळा केला । सोनारीं वरकोल[३] घातला । सर्व जिरविले अलंकार ॥१८॥ सोनार ठोकठोक करिती । तेथें नाहीं सीता सती । थाळी झांतणी कांसार विकती । चिच्छक्ती[४] तेथें कैंची ॥१९॥ व्यवहारें कालांतरीं[५] प्राप्ती । लक्षूनी धन परहस्तीं समर्पिती । खत हातीं लिहून घेती । पाहोन रडती जन्मवरी ॥१२०॥ तेली भोवे घाण्याभोंवता । तेथें कैंची सती सीता । साळी कोष्टी पांजणी करितां । जन्म वृथा पैं गेला ॥२१॥ गारींत निघाले जीवें जीत । तांबोळी शायशीं पंचायशीं करीत । शिंपी अखंड तें खंडीत । सीता निश्चित तेथें कैंची ॥२२॥ रंगारी जें वस्त्र श्वेत । तें काळें करिती निश्चित । नसतेचि ठसे उठवीत । शुद्धावरी मूर्ख पैं ॥२३॥ भुसाऱ्यांनीं धान्यसंग्रह केला । मोजितां व्यर्थ जन्म गेला । तेथें नाहीं जनकबाळा । ते चित्कळा अवतरली ॥२४॥ वेद पढती वेदपाठक । तेथें निष्ठा न धरिती अभाविक । प्रतिग्रहाखालीं[६] जन्म देख । गेला निश्चित तयांचा ॥२५॥ इदं भवति इदं न भवति । पंडित हेंचि खटपटती । सदा परनिंदा जल्पती । सीता सती तेथें कैंची ॥२६॥ ताठले सदा गायक । अभिमानें हुंबती अधिक । प्रेम सांडोनि गाती श्रृंगारिक । सीता सती तेथें कैंची ॥२७॥ ज्योतिषी गोंविले ग्रहगतीं[७] । गृहांत पडले ते न निघती । आपण कोण हें नेणती । सीता सती तेथें कैंची ॥२८॥ प्रहस्तादि प्रधानघरें । शोधिलीं सर्व अंत:पुरें । पद्मिणीसम स्वरूपें सुंदरें । पदनखा भृंग रुणझुणती ॥२९॥ हनुमंत नाना तर्क करी । कोठें नुमगे जनककुमारी । म्हणे योगगतीनें निर्धारीं । प्राण दिधला जानकीनें ॥१३०॥ कीं सरितापतीमाजी[८] बुडाली । कीं रावणें सक्रोधें भक्षिली । अंतरिक्षाहूनि खालीं पडली । गेली चूर होऊनियां ॥३१॥ कीं रावणें दृढ बाहीं धरिली । कळ लागोन सुकुमार मेली । कीं रावणपत्न्यांनी मारिली । सापत्नमत्सर करोनियां ॥३२॥ हनुमंत दु:खें गडबडां लोळे । आंसुवें पूर्ण भरले डोळे । म्हणे वृथा समुद्रलंघन केलें । शून्य पडलें सर्व कार्या ॥३३॥ अहा सीते सीते करून । वृक्षा आलिंगी राजीवनयन । सीतेचें रूप म्हणोन । हृदयी पाषाण धरीतसे ॥३४॥ मी गेलिया रघुनाथ । प्राण त्यागील यथार्थ । सुग्रीव नळ नीळ जांबुवंत । सुमित्रासुत न वांचती ॥३५॥ जाईल अयोध्येसी समाचार । भक्तशिरोमणि भरत वीर । शत्रुघ्न आणि माता समग्र । प्राण देतील निर्धारें ॥३६॥ वृथा कष्ट गेले मुळींहुनी । ठायीं[९] न पडे जनकनंदिनी[४] । नव जाय मी परतोनी । चापपाणी वाट पाहेल ॥३७॥ करितां रघुपतीचें स्मरण । विघ्नें पळती मुळींहून । जैसा सुटतां अद्भुत प्रभंजन[१०] । जळदजाळ क्षणीं वितळे ॥३८॥ पडतां किंचित अग्न । तृण पर्वतींचें जाय जळोन । कीं गृहस्वामी जागा देखोन । तस्कर[११] जेवीं पळती पैं ॥३९॥

१. प्रपंचात २. वजन कमी देऊन ३. हिणकस धातू ४. सीता ५. मुदतीने (व्याज) ६. दान घेता घेता ७. कुंडलीतील ग्रहांचे गतीत ८. समुद्रांत ९. ठावठिकाणा लागत नाही १०. वारा ११ चोर

कीं उगवतां दिनपती[१] । भगणें[२] सर्व लोपती । कीं मृगेंद्र देखतां निश्चितीं । अचेतन होती वारण ।।१४०।। तैसें रघुपतीचें करितां स्मरण । विघ्नें सर्व पळती उठोन । करोनि लंकेचें कंदन । पालथी घालीन सागरीं ।।४१।। ऐसें बोलोन हनुमंत । कलह माजविला लंकेंत । घरोघरी लोकांस आकांत । ओढविला वायुसुतें ।।४२।। रत्नजडित गोपुरें देखा । विद्युत्प्राय झळकती पताका । कनककळसां नाहीं संख्या । दिव्य लंकानगर तें ।।४३।। अंजनीसुत मत्तवारण । पुच्छ हें वज्रशुंडा जाण । सकळ गोपुरें ओढून । अकस्मात पाडीत ।।४४।। मध्यरात्र जाहली पूर्ण । निद्रार्णवीं लोक निमग्न । तो अकस्मात घरें कोसळून । पडोनि जन दडपती ।।४५।। जैसे पर्वताचे कडे खचती। तैशीं गोपुरें खालीं पडती । महाद्वारें ओढूनि मारुती । झुगारीत गगनपंथें ।।४६।। गवाक्षद्वारें[३] पुच्छ घालून । गृहस्तंभ[४] पाडी आकर्षून । लत्ताप्रहारेंकरून । कपाटें फोडोन टाकीत ।।४७।। नगरतळ दणाणत । भयंकर घोषें किंकाटत । वृक्ष उन्मळी अकस्मात । भयभीत लोक जाहले ।।४८।। एकचि नगरीं कोल्हाळ झाला । एक म्हणती पळा रे पळा । ऐसें बोलतां अकस्मात शिळा । येऊन पडती मस्तकीं ।।४९।। राक्षसिणींचीं बाळें धरूनी । भिरकावून देत गगनीं । राक्षसी वक्षस्थलें बडवूनी । हांका फोडिती आक्रोशें ।।१५०।। स्त्रीपुरुष दोघे नग्न । एकांतीं केलें शयन । तीं जागीं न होतां उचलून । बिदीस शेज ठेवीत ।।५१।। भांडारगृह फोडून । नाना वस्तूंच्या मांदुसा आणोन । राजबिदीस[५] टाकी पूर्ण । एकेच ठायीं सर्वांच्या ।।५२।। पुच्छाचे चपेटे थोर । रात्रीं वाजवी वारंवार । भयभीत जाहले अवघे असुर । बोलों उत्तर न शकती ।।५३।। ऐसें नगर गांजोनि पूर्ण । मग राजद्वारावरी जाऊन । बैसला अंजनीनंदन । कलह पूर्ण माजवावया ।।५४।। हृदयीं पुच्छ धरोनि हनुमंत । वारंवार तया चुंबीत । डोळे मोडोन वांकुल्या दावीत । घुलकावीत मान पैं ।।५५।। तों नरनारी असंख्यात । कलश घेऊन उदक आणीत । पुच्छ गोंवून अकस्मात । कपी फोडीत एकदांचि ।।५६।। नारी दचकल्या समस्त । कोण गे येथें घागरी फोडीत । त्यांचे कर्णनासिकी हनुमंत । पुच्छ घालीत हळूचि ।।५७।। तेणें दुश्चित नारी दचकती । एक फडफडां शिंकती । भरला घट मारुती । जाऊं नेदी नगरांत ।।५८।। घटस्फोट[६] जाहले राजद्वारीं । शिव्या देती नगरींच्या असुरी । दशमुखा तुझी न उरे उरी । जनककुमारी क्षोभली ।।५९।। सीतेनें चेतविलें भूत । तें नगरांत हिंडे गुप्त । हें लंकेचा करील निःपात । दशकंठ यथार्थ निमेल ।।१६०।। तों राजदर्शनासी महावीर । तुरंगारूढ जाती सत्वर । ऐसें देखोनि वानर । काय करिता जाहला ।।६१।। मागिले पायीं तुरंग धरूनी । गरगरां भोवंडोनि आपटी मेदिनीं[७] । एकावरी एक उचलोनी । अश्वासहित स्वार टाकी ।।६२।। तों गजभार आले उन्मत्त । त्यांचे पुच्छें उपडोनियां दांत । वरी बैसले जे असुर समस्त । दंतघायें झोडिले ।।६३।। गुढारांसहित[८] गज उचलोनी । भिरकावीत समुद्रजीवनीं[९] । तों रथारूढ होउनी । राजकुमार पातले ।।६४।। तंत वितंत घन सुस्वर । वाजवीत वाद्यांचे गजर । देखता क्षोभला वानर । पुच्छ सत्वर सोडिलें ।।६५।।

---

१. सूर्य २. नक्षत्रे ३. खिडकीच्या दारातून ४. घराचे खांब ५. राजमार्गावर ६. मडक्यांचा आवाज ७. जमिनीवर ८. अंबारीसहित ९. समुद्राच्या पाण्यात

## ॥ अध्याय विसावा ॥

# सीता - शोध, अशोक - वनाचा विध्वंस

॥ श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः । जैसे दुर्बळाचिया गृहाप्रती । समर्थ सोयरे आदरें येती । त्यासी पाहुणेर करावया निश्चितीं । नाहीं शक्ति तयातें ॥१॥ मग तो कंदमूळें आणून । पुढें ठेवी प्रीतीकरून । तैसे हे प्राकृत बोल पूर्ण । संतांपुढें समर्पिले ॥२॥ पयोब्धीपुढें[1] ठेविलें तक्र । कीं सुरभीपुढें[2] अजाक्षीर[3] । कीं अमृतापुढें साखर । नेऊनियां समर्पिली ॥३॥ कुबेरापुढें कवडी जाण । रंकें ठेविली नेऊन । शीतळ व्हावया रोहिणीरमण[4] । नवनीत पुढें ठेविलें ॥४॥ कल्पद्रुमापुढें बदरीफळ[5] । वैरागराचे[6] कंठीं स्फटिकमाळ । मलयगिरीसी गंध शीतळ । निंबकाष्ठाचें चर्चिलें ॥५॥ जो ब्रह्मांडप्रकाशक गभस्ती[7] । त्यासी ओंवाळिजे एकारती । परी तो घेत देखोन भक्ती । ऐसेंचि करिती संत येथें ॥६॥ तैसे बोल हे हीन जाण । परी संतांसी आवडती पूर्ण । एकुणिसावे अध्यायीं कथन । काय जाहलें तें परिसा हो ॥७॥ असुरांतें देखोनि हनुमंत । सभा नागवूनि समस्त । पुरुषार्थ करोनि अद्भुत । निघोनि गेला गुप्तरूपें ॥८॥ लंकेचीं मंदिरें समस्त । सीतेलागीं शोधी हनुमंत । जैसा रत्नपरीक्षक निरीक्षीत । रत्न आपुलें हारपलें जें ॥९॥ धांडोळिली लंकानगरी । कोठें नुमगे जनककुमारी । जेथें होतीं रावण-मंदोदरी । तेथें हनुमंत पातला ॥१०॥ तंव तो शक्रारिजनक । हवन करी विघ्ननाशक । शेजेवरी निजली निःशंक । पट्टराणी मंदोदरी ॥११॥ उपरमाडिया गोपुरें । राणिवशाचीं दामोदरें । ऐशीं सहस्र अंतःपुरें । सीतेलागी शोधिलीं ॥१२॥ सकळ स्त्रियांचे मंदिरांत । रिघोन पाहे हनुमंत । जो महाराज इंद्रियजित । काम रुळत तोडरी ॥१३॥ रावणें आणिल्या बहुत नारी । नागिणी पद्मिणी किन्नरी । ज्यांचिया पदनखांवरी । भ्रमर रुंजी घालिती ॥१४॥ ऐशा सुंदरी देखत । परी काममोहित नव्हे हनुमंत । तो राघवप्रिय अतिविरक्त । ऊर्ध्वरेता वज्रदेही ॥१५॥ घटमठांमाजी व्यापून । वेगळें असे जैसे गगन । तैसाच अंजनीनंदन । लोकांत वर्तूनि वेगळा ॥१६॥ स्त्रिया शोधिल्या समस्त । मग मंदोदरी जेथे निद्रिस्त । तेथें येऊनि हनुमंत । उभा राहिला क्षणभरी ॥१७॥ सुरूप देखोनि मंदोदरी । म्हणे हेचि होय विदेहकुमारी । निजेली पवित्रपणें शेजेवरी । पतिव्रता म्हणोनियां ॥१८॥ सतींमाजी शिरोरत्न सीता सती । परमपुरुषाची चिच्छक्ती । मज आजि भेटली निश्चितीं । म्हणोन मारुती नाचत ॥१९॥ तों होमविधि संपादून । तेथें आला द्विपंचवदन । तों मंदोदरी उठोन । पाय धूत पतीचे ॥२०॥ ऐसें देखोन हनुमंत । क्षोभला जैसा प्रळयकृतांत । म्हणे जानकी होय यथार्थ । वश्य जाहली रावणातें ॥२१॥ रामवचन आठवी मारुति । सीतेचे वदनीं कर्पूरद्युती[8] । मग मुखाजवळी त्वरितगती । मंदोदरीच्या पातला ॥२२॥ मुख तिचें अवघ्राणिलें । तों दुर्गंधीनें मन विटलें । म्हणे मद्यपान आहे केलें । उभयवर्गी मिळोनियां ॥२३॥ भिंतीस लावितां कान । होत नाहीं रामस्मरण । हे रावणासी मीनली पूर्ण । तेथें स्मरण कायसें ॥२४॥ तों रावण आणि मंदोदरी । दोघें निजेलीं शेजेवरी । सुषुप्तिअवस्थेमाझारी[9] । निमग्न जाहलीं ते वेळे ॥२५॥ मनीं विचारी हनुमंत । या दोघांसी उचलोनि त्वरित । किष्किंधेसी न्यावीं यथार्थ । पाहील रघुनाथ दोघांतें ॥२६॥

---

१. क्षीरसमुद्रापुढे २. कामधेनूसमोर ३. शेळीचे दूध ४. चंद्र ५. बोर ६. खाणमालकापुढे ७. सूर्य ८. कापराचा सुगंध ९. निद्रेत

किंवा घालून चंड पाषाण । दोघांचे येथेंच घेऊं प्राण । ऐसें विचारी वायुनंदन । तंव अपूर्व वर्तले ।।२७।। अकस्मात गजबजोनी । मंदोदरी बैसली उठोनी । आक्रोशें हांक फोडोनी । वक्ष:स्थळ बडवीत ।।२८।। सवेंचि महाशंख करीत । दशकंठ धरी तिचे हात । मयजा[1] म्हणे अतित्वरित । सीता द्या हो रामाची ।।२९।। आजि विलोकिलें दुष्ट स्वप्न । माझी गळसरी गेली जळोन । एक बळिया वानर येऊन । अशोकवन विध्वंसिलें ।।३०।। तेणें वधिला अखया सुत । समरीं गांजिला इंद्रजित । घेऊन आला जनकजामात । हरिदळ[2] अद्‌भुत न वर्णवे ।।३१।। शिळांनी बुजोनियां सरितानाथ[3] । सुवेळेसी आला अवनिजाकांत[4] । रावण कुंभकर्ण शक्रजित । वधोनि विजयी जाहला ।।३२।। स्वप्न नव्हे हें ब्रह्मवचन । तरी मंगळभगिनी द्या नेऊन । मंगळदायक रघुनंदन । त्यासी शरण जाइंजे ।।३३।। करितां परदाराअभिलाष[5] । कोण पावला मागें यश । मानव नव्हे राघवेश । पुराणपुरुष अवतरला ।।३४।। उदरीं बांधोन दृढ पाषाण । केवीं तरेल अगाध जीवन । बळेंचि केलें विषप्राशन । त्यासी कल्याण मग कैंचे ।।३५।। खदिरांगाराचे शेजेवरी । कैसा प्राणी निद्रा करी । महासर्पाचे मुखाभीतरी । हस्त घालितां उरे कैसा ।।३६।। शार्दूळ करूं केला पलाटण । त्याचे जाळीमाजी जाऊन । नांदेन म्हणे क्षेमकल्याण । तो प्राणी कैसा वांचेल ।।३७।। तुम्हीं जरी सर्वांसी जिंकिलें । परी राघवेंद्रा तैसें नचले । पूर्णब्रह्म अवतरलें । भक्तजन रक्षावया ।।३८।। यालागीं द्विपंचवदना । मी शरण जात्यें रघुनंदना । देवोनि तयाची अंगना । चुडेदान मागेन पैं ।।३९।। मनीं विचारी लंकापती । इचें वचन सर्व मानिती । नेऊन देईन सीता अवचितीं । भलत्यासी आज्ञा करूनियां ।।४०।। रावण म्हणे मंदोदरी । तूं सर्वथा चिंता न करीं । उदयीक नेऊनि जनककुमरी । जनकजामात्या देईन ।।४१।। पांचकोटी राक्षसगण । अशोकवनाभोंवते रक्षण । तयांसी सांगोन पाठवी रावण । रात्रंदिवस सावध असावें ।।४२।। बिभीषण कुंभकर्ण इंद्रजित । हे मयजेसी मानिती बहुत । यांचा विश्वास न धरावा यथार्थ । नेऊनि देतील जानकीतें ।।४३।। ऐसें समस्त वर्तमान । वायुसुतें केलें श्रवण । म्हणे मंदोदरी सती धन्य । इच्या स्मरणें दोष नुरे ।।४४।। तों दूतीस म्हणे दशकंधर । अशोकवना जाऊनि सत्वर । जनकात्मजेचा समाचार । घेऊन येईं त्वरेनें ।।४५।। तत्काळ चालिली दूती । तयेमागें जाय मारुती । आला अशोकवनाप्रती । आनंद चित्तीं न समाये ।।४६।। तों अशोकवृक्षाचे तळीं । ध्यानस्थ बैसली मैथिली । दूती परतली तत्काळीं । हनुमंत तेथें राहिला ।।४७।। जय जय रघुवीर अयोध्यानाथ । म्हणोनि नाचों लागला हनुमंत । म्हणे धन्य मी आजि येथ । जगन्माता देखिली ।।४८।। पुच्छ नाचवी कडोविकडी । तोंड विटावी[6] डोळे मोडी । चक्राकार मारी उडी । रामनाम गर्जोनियां ।।४९।। चहूंकडे पाहे मारुती । तों रामनामें वृक्ष गर्जती । पंचभूतें पक्षी घुमती । रामस्मरणेंकरूनियां ।।५०।। म्हणे हेचि होय सीता सती । पुराणपुरुषाची चिच्छक्ती । सुटली कर्पूराची दृती[7] । पाषाण स्मरती रामनाम ।।५१।। मृगमदाहूनि[8] विशेष । सीतेच्या अंगींचा सुवास । अशोकवन आसमास । दुमदुमलें तेणेंचि ।।५२।। तेथें रक्षण असे त्रिजटा । तिनें राघवीं धरिली निष्ठा । सत्संगाचा महिमा मोठा । दुष्ट पापिष्ठा सद्‌भाव उपजे ।।५३।। यावरी अंजनीहृदयरत्न[9] । गुप्तरूपें जवळ येऊन । जानकीचे वंदोनि चरण । मुद्रिका[10] पुढें ठेविली ।।५४।। ध्यानस्थ बैसली सीता सती । मानसीं चिंती रघुपती । पुढें उभा असे मारुती । बद्धांजली[11] करूनियां ।।५५।।

१. मंदोदरी २. वानरसेना ३. समुद्र ४. श्रीराम ५. परस्त्रीविषयी वासना ६. वेडावत होता ७. सुगंध ८. कस्तुरीपेक्षा ९. हनुमान १०. श्रीरामांनी दिलेली अंगठी ११. हात जोडून

इंदिरेपाशी खगेंद्र । कीं अपर्णेसमीप नंदिकेश्वर[1] । कीं शचीपुढें[2] जयंत पुत्र । उभा ठाके प्रीतीनें ॥५६॥ असो कनकदंड पडे पृथ्वीवरी । तैसा जानकीसी नमस्कारी । मग त्या अशोकवृक्षावरी । राघवप्रिय वळंघला ॥५७॥ इकडे तमालनील सांवळा । ध्यानीं विलोकीत जनकबाळा । तों अवतारमुद्रिका ते वेळां । सव्यकरांगुळी दिसेना ॥५८॥ मुद्रिका न दिसे म्हणोन । श्रावणारिस्नुषा[3] उघडी नयन । तों मुद्रिका पुढेंचि जाण । देदीप्यमान पडली असे ॥५९॥ मुद्रिका देखतां ते वेळीं । हृदयीं आलिंगी जनकबाळी । विमलांबुधारा[4] नेत्रकमळीं । जानकीच्या सूटल्या ॥६०॥ म्हणे सांडोनि रघूत्तमातें । माये कैसी आलीस येथें । राम आणि सौमित्रीतें । त्यजोनि कोठें आलीस ॥६१॥ जगद्वंद्य तो श्रीराम । जो चराचरफलांकितद्रुम । त्याची वार्ता स्वस्तिक्षेम । सांग मुद्रिके मजपासीं ॥६२॥ तों तये वनीं निशाचरी । ज्या होत्या दुराचारी । विक्राळरूपें ते अवसरीं । सीतेजवळी धांविन्नल्या ॥६३॥ कां गे रडतेसी म्हणोन । पसरोनि आल्या विक्राळ वदन । तुज आम्ही भक्षूं तोडून । कुटके करोन तिळप्राय ॥६४॥ कैंचा राम तमाळनीळ । तूं रावणासीच घालीं माळ । राक्षसिणी करिती कोल्हाळ । सीतेभोवती मिळोनियां ॥६५॥ बाबरझोटी भयंकर । कपाळीं चर्चिला शेंदूर । लंब स्तनें विशाळ उदर । पर्वत माजी सांठवती ॥६६॥ असो ऐसें देखोन हनुमंत । पुच्छ सोडी अकस्मात । राक्षसिणी झोडिल्या समस्त । प्राणांसी बहुत मूकल्या ॥६७॥ राक्षसिणी फिरविती डोळे । पुच्छें आंवळिले दृढ गळे । एक म्हणती जनकबाळे । रक्षीं मातें आम्हांसी ॥६८॥ निमाल्या बहुत राक्षसिणी । उरल्या लागती सीतेचे चरणीं । कित्येक गेल्या पळोनी । दशकंठातें सांगावया ॥६९॥ हृदयीं बोध प्रकटतां जाणा । भ्रांति भुली इच्छा वासना । आशा मनशा[5] तृष्णा कल्पना । पळती जैशा क्षणार्धे ॥७०॥ तैशा पळाल्या निशाचरी । जानकी मुद्रिकेतें विचारी । शरयूतीरविहारी । कोठें सांग मुद्रिके ॥७१॥ मज आलिंगितां श्रीरामचंद्र । तेव्हां कंठी न सोसेचि हार । आतां गिरी कानन समुद्र । दोघांमध्यें पडियेले ॥७२॥ वाल्मीकीनें भविष्य कथिलें । तें काय सर्व व्यर्थ गेलें । एक कपि बळिया येऊन बळें । लंकानगर जाळील ॥७३॥ मज देऊनि समाधान । सवेंचि आणील रघुनंदन । पाषाणीं समुद्र बुजवोन । दशवदनासी मारील पैं ॥७४॥ तों मुद्रिका नेदी प्रतिवचन । म्हणे मज कळली खूण । माझ्या विरहेंकरून । देह राघवें त्यागिला ॥७५॥ कीं योगियांचे ध्यानीं गुंतला । कीं भक्तधांवण्या[6] धांवला । कीं सौमित्रें माघारा नेला । म्यां छळिलें म्हणोनियां ॥७६॥ कृपा न करवे मजवरी । तरी येऊन माझा वध करीं । मी बुडाल्यें चिंतासमुद्रीं । काढीं बाहेरी त्वरेनें ॥७७॥ अहा रामा राजीवनेत्रा । दशकंठरिपो[7] विषकंठमित्रा[8] । पुढें पाठविली कां हे मुद्रा । कोण्या विचारेंकरूनियां ॥७८॥ मृगत्वचेची कंचुकी इच्छिली । हाच अन्याय घडला मुळीं । म्यां पापिणीनें ते वेळीं । सौमित्री वीर छळियेला ॥७९॥ म्यां साधुछळण केलें । म्हणोनि राक्षसाहातीं सांपडलें । मजला वियोगदुःख जडलें । त्याच दोषेंकरूनियां ॥८०॥ जे साधूचे छलन करिती । ते मजऐसे दुःख पावती । अंतीं जाती अधोगती । महाअनर्थीं[9] पडती ते ॥८१॥ इत्यादि भाव तये क्षणीं । दावी त्रिभुवनपतीची राणी । म्हणे हा देह आतां ठेवूनी । काय कारण पैं असे ॥८२॥ सीता देखोन विव्हळ । वृक्षगर्भीं अंजनीबाळ[10] । गायन आरंभी रसाळ । राघवलीला निर्मळ जे ॥८३॥

१. नंदी २. इंद्रपत्नी ३. सीता ४. अश्रुपात ५. इच्छा ६. भक्तरक्षणास ७. रावणशत्रू रामा ८. नीळकंठमित्र रामा ९. घोर संकटात १०. हनुमंत

तो साक्षात् रुद्रावतार । रुद्रवीणा जैसा सुस्वर । तैसा कंठ अतिमधुर । कंपस्वरें गातसे ॥८४॥ कपीचें गायन रसाळ । तटस्थ जाहलें रविमंडळ । पाताळ सांडोन फणिपाळ । येऊं भावी तेथें पैं ॥८५॥ तटस्थ जाहला प्रभंजन । वेधला चंद्राचा हरिण । अशोक-वनींचे द्विजगण । चारा घेऊं विसरले ॥८६॥ अयोध्यापतीची राणी । तल्लीन होऊनि ऐके श्रवणीं । अशोकवनामधूनी । मंजुळ ध्वनि उमटत ॥८७॥ जो अज अजित निर्गुण । कमलमित्रकुलभूषण[१] । भक्तहृदयाब्जमिलिंद[२] पूर्ण । जलदवर्ण[३] जलजाक्ष[४] ॥८८॥ जो मंगलधाम मंगलकारक । जो मंगळभगिनी-प्राणनायक[५] । मंगळजननीउद्धारक । प्रतापार्क श्रीराम ॥८९॥ जो द्विपंचमुखदर्पहरण[६] । जो चंडीशकोदंडप्रभंजन[७] । भवगजविदारण[८] पंचानन । नरवीरांत श्रेष्ठ जो ॥९०॥ जानकी जयाची चित्कळा । रची अनंत ब्रह्मांडमाळा । तो रघुवीर परब्रह्मपुतळा । अतर्क्य लीला जयाची ॥९१॥ सच्चिदानंदतनु निष्कलंक । पितृआज्ञाप्रतिपालक । जो मायाचक्रचालक । जगद्वंद्य जगद्गुरु ॥९२॥ जो पंचमभूतांवेगळा साचार । तो पंचवटीवासी रघुवीर । तेथें द्विपंचवदन सत्वर । कपटमृग घेवोनि गेला ॥९३॥ तों दशकंधर दुराचार । पर्णकुटींत प्रवेशला तस्कर । भूगर्भीचें रत्न सुंदर । हरोनि नेलें क्षणामाजीं ॥९४॥ त्या तस्कराचा माग काढीत । किष्किंधेसी आला जनकजामात । शक्रसुत वधोनि अकस्मात । अर्कज राज्यीं स्थापिला ॥९५॥ त्या सीतावल्लभाचा किंकर[९]। दासानुदास एक वानर । तेणें गांजोनि लंकानगर । अशोकवना आला असे ॥९६॥ ऐसें ऐकतां तें गायन । आनंदमय भूतनयेचें[१०] मन । मग वृक्षाजवळी उभी राहून । करी नमन तयातें ॥९७॥ म्हणे धन्य तूं तरुवरा पूर्ण । कोण करी तुजमाजी कीर्तन । त्याचें पाहीन मी वदन । धरीन चरण आदरें ॥९८॥ जो करितो तुजमाजी कीर्तन । त्याची जननी धन्य धन्य । त्यासी सदा असो कल्याण । नलगे विघ्न कल्पांतीं ॥९९॥ ज्यासी रामकीर्तन आवडे । त्यासी साकडें कधीं न पडे । चारही मुक्ती तयापुढें । दासी होऊनि राबती ॥१००॥ ऐसें जगन्माता बोलत । तों उगाचि राहिला हनुमंत । न बोले कांहींच मात । पाहे तटस्थ जानकी ॥१॥ म्हणे येथें कापट्य पूर्ण । कोण करितो न कळे कीर्तन । जरी बाहेर न भेटे येऊन । तरी आतां प्राण सांडीन मी ॥२॥ अत्यंत कृश जाहली गोरटी । मुद्रिका घातली मनगटीं । म्हणे अयोध्यापते जगजेठी । नव्हे भेटी तुझी आतां ॥३॥ मग जनकात्मजेनें[११] ते वेळां । वेणीदंड वेगें काढिला । तयाचा गळां पाश घातला । प्राणत्यागाकारणें ॥४॥ म्हणे अयोध्यापते तुजविण । मी क्षण एक न ठेवीं प्राण । ऐसें बोलोनियां वचन । जनकात्मजा[११] सरसावली ॥५॥ वेणीदंड काढोनी । वृक्षडाहाळिये[१२] बांधी ते क्षणीं । राघवप्रिय तें देखोनी । बहुत मनीं गजबजला ॥६॥ जानकी त्यागील स्व-प्राणा । मग काय सांगों रघुनंदना । भरताग्रजा जगन्मोहना । धांवें लौकरी ये वेळे ॥७॥ अंतरी आठविले रामचरण । बुद्धिप्रवर्तक[१३] म्हणोन । मग तैसेंचि केलें उड्डाण । गगनपंथें ते वेळां ॥८॥ अंजनीआत्मज ते वेळां । गर्जोनि म्हणे पैल श्रीराम आला । ऐसें बोलतां जनकबाळा । ऊर्ध्वपंथें विलोकी ॥९॥

१. सूर्यवंशभूषण राम, २. भक्तहृदय कमळातील राम, ३. घनश्यामवर्ण राम ४. कमलनेत्र राम ५. सीतापती राम ६. रावणगर्व हरणारा राम ७. शिवधनुष्यभंजक राम ८. संसारकष्टनिवारक राम ९. दास १०. सीतेचे ११. जनककन्या सीता १२. झाडाच्या फांदीला १३. बुद्धिदाता

मारुती खालीं उतरून । करिता जाहला साष्टांग नमन । जगन्माता बोले वचन । हो कल्याण चंद्रार्कवरी[१] ॥११०॥ जोडोनियां दोन्ही कर । उभा राहिला समोर । म्हणे कल्याणरूप रघुवीर । किष्किंधेसी सुखी असे ॥११॥ मी श्रीरामाचा अनुचर । हनुमंतनामा वायकुमार । माते तुजकारणें लंकानगर । धांडोळिलें सर्वही ॥१२॥ सीतेसी आनंद जाहला थोर । जैसा बहुत दिवस गेला कुमार । तो भेटतां हर्ष अपार । जननीलागीं होतसे ॥१३॥ अवृष्टीं[२] वर्षे घन । कीं मृत्युसमयीं सुधारसपान[३] । कीं तृषितालागीं दर्शन । क्षीरसिंधूचें जाहलें ॥१४॥ असो पंचवटीपासोन वर्तमान । रामें लीला केली जी पूर्ण । ती सीतासतीस वायुनंदन । कथिता जाहला ते वेळीं ॥१५॥ जटायु उद्धरोनि कबंध वधिला । वाळी मारोनि सुग्रीव स्थापिला । तो अपार मेळवून हरिमेळा[४] । साह्य जाहला श्रीराम ॥१६॥ आठवोन तव गुण स्वरूप । राम सर्वदा करी विलाप । श्वापदें पाषाण पादप । सीता म्हणोनि आलिंगी ॥१७॥ तुवां जे अलंकार टाकिले । ते म्यां श्रीरामापुढें ठेविले । रामें शोक केला ते वेळे । तो मज सर्वथा न वर्णवे ॥१८॥ तुजकारणें सुमित्रापुत्र । दुःख करीत अहोरात्र । जैशी मातेची वाट निरंतर । बाळक पाहे प्रीतीनें ॥१९॥ ऐसा ऐकता समाचार । जानकीस दाटला गहिंवर । म्हणे परम कृपाळु रघुवीर । मजकारणें शिणतसे ॥१२०॥ अयोध्येहून येतां हनुमंता । मी मागें राहें चालतां । श्रीराम तरूखालीं तत्त्वतां । उभे राहती मजकारणें ॥२१॥ बहु श्रमलीस म्हणोन । राम कुरवाळी माझें वदन । बोलतां सीतेसी आलें रुदन । सद्गद होऊन स्फुंदतसे ॥२२॥ जानकीस म्हणे हनुमंत । आतां शोक करिसी किमर्थ । सत्वर येईल रघुनाथ । दशमुखासी वधावया ॥२३॥ तूं आदिपुरुषाची चिच्छक्ती । प्रणवरूपिणी मूळप्रकृती । तुझे आज्ञेनें वर्तती । विरिंची रुद्र इंद्रादि ॥२४॥ भक्त तारावया निर्धारीं । दोघें अवतरलां पृथ्वीवरी । आधीं वियोग दोघांभीतरी । जाहलाचि नाहीं तत्त्वतां ॥२५॥ यावरी भूमिजा बोले वचन । तूं श्रीरामाचा विश्वासी पूर्ण । तरी तुजप्रति अंतरखूण[५] । राघवें काय सांगितली ॥२६॥ येरू म्हणे कैकेयीगृहांतरीं[६] । ताटिकांतकें आपुले करीं । तुज वल्कलें नेसविलीं निर्धारीं । खूण साचार ओळखें ही ॥२७॥ ऐसें ऐकतां जनकदुहिता । म्हणे सखया हनुमंता । तूं श्रीरामाचा पूर्ण आवडता । कोटिगुणें अससी कीं ॥२८॥ परी तूं दिससी अति सूक्ष्म । ऐसेच असतील प्लवंगम[७] । तरी हें लंकानगर दुर्गम । तुम्हांस कैसें आटोपे ॥२९॥ ऐसें सीतेचें वचन ऐकिलें । हनुमंतें भीमरूप प्रकट केलें । मंदराचळातुल्य[८] देखिलें । विशाळरूप मारुतीचें ॥१३०॥ कीं महामेरूचि अद्भुत । कीं राक्षस वधावया समस्त । अवतरला प्रळयकृतांत । वानरवेष धरोनियां ॥३१॥ ऐसा देखोनि रुद्रावतार । सीता म्हणे हा केवळ ईश्वर । रामकार्यालागीं निर्धार । अवतरला येणें रूपें ॥३२॥ हनुमंत म्हणे महासती । हे लंका घालीन पालथी । परी कोपेल त्रिभुवनपती । आज्ञा दिधली नाहीं मज ॥३३॥ जगन्माते मंगळभगिनी । मजहूनियां प्रतापतरणी[९] । ऐसे वानर किष्किंधाभुवनीं । रामाजवळी आहेत ॥३४॥ जांबुवंत नळ नीळ रविकुमार[१०] । रणपंडित प्रतापशूर । काळासी शिक्षा करणार । राघवासवें असती पैं ॥३५॥ सीता म्हणे हनुमंतासी । एवढा सागर कैसा तरलासी । येरू म्हणे मुद्रेनें अनायासीं । आणिलें मज ऐलतीरा ॥३६॥ मार्गीं जाहले श्रम बहुत । तुझे दर्शनें हरले समस्त । परी जाहलों असें क्षुधाक्रांत[११] । फळे येथें दिसती बहु ॥३७॥ परहस्तें[१२] ज्यास स्पर्शित । तें सर्वथा नेघें मी निश्चित । आतां आज्ञा दीजे त्वरित । निजहस्तें घेईन मी ॥३८॥

१. सूर्यचंद्र असे तोवर २. अवर्षणानंतर ३. अमृताचे प्राशन ४. वानर सैन्य ५. गुप्त खूण ६. कैकयीच्या प्रासादात ७. वानर ८. मंदर पर्वताएवढे ९. प्रतापसूर्य १०. सुग्रीव ११. भुकेने व्याकूळ १२. दुसऱ्याने स्पर्श केलेले

उपरी बोले श्रीरामललना । समीर स्पर्शों न शके या वना । साठ सहस्र राक्षस रक्षणा । ठेविले येथें लंकेशें ॥३९॥ हनुमंत ऐकता ते अवसरीं । गडबडां लोळे धरणीवरी । फळआहाराविण बाहेरी । निघों पाहती प्राण माझे ॥१४०॥ अहा मध्येंच आलें मरण । अंतरले रघुपतीचे चरण । आतां सीताशुद्धि सांगेल कोण । कौसल्यात्मजासी जाऊनियां ॥४१॥ सफळ वृक्ष देखोन दृष्टीं । माझें चित्त होतसे कष्टी । ऐसें वाटतसे पोटीं । वनचि अवघें सांठवावें ॥४२॥ ऐसें बोलतां हनुमंत । क्षण एक पडला निचेष्टित । नेत्र गरगरां भोवंडीत । मुख पसरीत फळांलागीं ॥४३॥ ऐसें देखोनि ते वेळीं । जगन्माता सद्गदित जाहली । अहा म्हणोन धांविन्नली । कुरवाळीत कृपाकरें ॥४४॥ म्हणे कपींद्रा उठीं उठीं । पडलीं फळे तरुतळवटीं[१] । तीं पाहोनि घेई एक मुष्टी । उदरतृप्तीपुरतींच[२] ॥४५॥ बा रे वरी चढसी जाण । तरी तुज माझी असे आण । पडलीं फळें तीं वेंचून । उदरनिर्वाह करीं कां ॥४६॥ ऐसें सीता बोलतां वचन । मारुती उठला झडकरून । चरण धरी धांवोन । म्हणे प्रमाण आज्ञा तुझी ॥४७॥ मग जे वृक्ष करिती रामस्मरण । सीतेवरी छाया केली सघन । ते रामउपासक पूर्ण । करी वंदन कपि त्यांते ॥४८॥ जो रामउपासक निर्मळ । त्यासी विघ्न करूं न शके काळ । म्हणोनि अंजनीचा बाळ । तरू ते सकळ रक्षीत ॥४९॥ जे तरू न करिती रामस्मरण । तेच उपटिले मूळींहून । भुजाबळें त्राहाटून । उर्वीवरी झोडिले ॥१५०॥ मग पडलीं फळें एकवटोनी । हस्तद्वयें[३] टाकी वदनीं । हनुवटी हाले ते क्षणीं । फळें तांतडी चावितां ॥५१॥ चंचळ दृष्टी करून । मागें पुढें पाहे अवलोकून । तंव ते वनरक्षक संपूर्ण । निद्रार्णवीं बुडाले ॥५२॥ राक्षसांनीं मद्य प्राशिलें । हनुमंतें वन विध्वंसिलें । पुढें पुच्छें उपडोनि आणिले । वृक्ष भोंवते सर्वही ॥५३॥ हनुमंत बैसे फलाहारासी । पुच्छ पाहुणेर करी तयासी । न सोडी बैसल्या ठायासी । आसन मोडे म्हणोनि ॥५४॥ पुच्छासी हनुमंत बोले । गोड गोड आणीं कां फळें । अजि त्वां तृप्त आम्हां केलें । चिरंजीव राहें तूं ॥५५॥ नंदनवनाहून सुंदर । अशोकवनींचे तरुवर । फणस इक्षुदंड लवंग परिकर । उपडी समग्र एकदांचि ॥५६॥ केळी नारळी देवदार । जंबू कपित्थ अंजीर । ज्यांचे रस लागती मधुर । हनुमंतवीर सेवीतसे ॥५७॥ असो तरुवर लक्षकोडी । भुजाबळें उर्वीवरी झोडी । राघवस्मरणें तांतडी । फळें वदनीं टाकीतसे ॥५८॥ हनुमंत करीत यजन । रामनाममंत्रेंकरून । वदनकुंडीं[४] आहुती पूर्ण । घालोनि जठराग्नि तृप्त करी ॥५९॥ सीतेनें घातली आपुली आण । वृक्षावरी न चढावें पूर्ण । यालागीं वृक्ष झोडोन । फळें पाडी धरणीये ॥१६०॥ जैसी कां चपळा कडाडी । तैसें पुच्छ वृक्ष मोडी । तों राक्षस उठले तांतडी । भीम कोल्हाळ करीतचि ॥६१॥ चक्रें डांगा भिंडिमाळा । घेऊन धांवले एकवेळां । सीताशोकहरण कोंडिला । सकळीं मिळोन एकदांचि ॥६२॥ वृषभीं कोंडिला महाव्याघ्र । कीं बहुत विखारीं[५] खगेंद्र[६] । कीं श्रृगालीं[७] वेढिला मृगेंद्र । खद्योत[८] दिनकरा धरूं म्हणती ॥६३॥ कीं मंथूनि सागर द्विज । धरूं म्हणती प्रळयवीज । कीं आर्द्रमृत्तिकेचे[९] गज । प्राशूं म्हणती जळसिंधु ॥६४॥ कर्पूरपुतळे[१०] म्हणती एक वेळां । धरोनि आणूं वडवानळा[११] । मक्षिका मिळोन सकळा । भूगोल[१२] उचलूं भाविती ॥६५॥ उष्ट्रांनीं ब्रीद[१३] बांधोन । तुंबरापुढें[१४] मांडिलें गायन । कीं वृश्चिक पुच्छेंकरून । ताडीन म्हणे वज्रातें ॥६६॥

---

१. वृक्षाखाली २. भूक शमण्यापुरतीच ३. दोन्ही हातांनी ४. मुखरूपी कुंडात ५. सापांनी ६. गरूड ७. कोल्ह्यांनी ८. काजवे ९. चिखलाचे १०. कापराचे पुतळे ११. समुद्रातील अग्नी १२. पृथ्वी १३. पैज १४. गंधर्वापुढे

तैसे हनुमंतावरी वनरक्षक । एकदांच धांवले सकळिक । यावरी लोकप्राणेशबाळक[1] । काय करिता जाहला ।।६७।। विशाळ वृक्ष उपडोनी । सव्य करीं घेत तेच क्षणीं । जैसा पावक शुष्कवनीं । संहारी तैसा राक्षसां ।।६८।। साठी सहस्र वनपाळ । पुच्छें भारे बांधिले सकळ । फिरवूनियां तत्काळ । भूमीवरी आपटिले ।।६९।। जैसी तुंबिनीचीं ओलीं फळें । बळें आपटितां होती शकलें । तैसे वनरक्षक ते वेळे । चूर्ण जाहले सकळही ।।१७०।। सवेंच समुद्रजीवनीं । प्रेतें देत भिरकावूनी । भुभु:कारें गर्जे तो ध्वनी । गगनगर्भीं न समाये ।।७१।। घायाळें उरलीं किंचित । तीं रावणासमीप आलीं धांवत । म्हणती एक वानर अद्भुत । अशोकवनीं प्रकटला ।।७२।। सकळ वन विध्वंसून । वनरक्षक मारिले संपूर्ण । ऐसें राक्षसेंद्र परिसोन । परम विषाद पावला ।।७३।। घृतें शिंपिजे वैश्वानर । तैसा क्रोधायमान दशकंधर । म्हणे कोण तो वानर । मारा सत्वर वेगेंसी ।।७४।। तेव्हा ऐंशीं सहस्र महावीर । प्रेरित जाहला दशकंधर । म्हणे धरोनि आणा रे वानर । नानायत्नेंकरूनियां ।।७५।। जरी नाटोपे तुम्हांलागून । तरी मज दावूं नका वदन । ऐंशीं सहस्र पिशिताशन । गर्जत वना पातले ।।७६।। नाना शस्त्रें घेतलीं हातीं । हाकें निराळ गाजविती । ऐसें देखोन मारुती । विशाळरूप जाहला ।।७७।। जैसा मंदराचळ विशाळ । तैसा दिसे अंजनीबाळ । वासुकीऐसें पुच्छ सबळ । लंबायमान सोडिलें ।।७८।। लंकेचे महाद्वारींची अर्गळा । लोहबंदी वेष्टिली ते वेळां । मारुति मारीत उठिला । सिंहनादें गर्जत ।।७९।। वृक्षावरील पक्षी उडोनी । प्रात:काळीं भरती गगनीं । तैशीं अरिमस्तकें[2] तुटोनी । उसळोन धरणीं पडताती ।।१८०।। बांधोन शत्रुसमुदायभार[3] । गगनीं फिरवी वायुकुमर । आपटितां होती चूर । करचरणादि अवयव ।।८१।। तों त्यांत मुख्य जंबुमाळी । हांका देत पातला ते वेळीं । म्हणे वानरा रणमंडळीं । तुज आजि मारीन ।।८२।। शूल घेवोनि ते वेळां । बळें मारुतीवरी धांविन्नला । तों हनुमंतें लत्ताप्रहार दिधला । कोथळा फुटला तयाचा ।।८३।। जैसें शस्त्र बैसतां प्रबळ । चूर्ण होय फणसफळ । कीं वज्रघातें महाशैल । चूर्ण जैसा होय पैं ।।८४।। ऐसा जंबुमाळी पडला । चिरोन हनुमंतें भिरकाविला । दशमुखास समाचार कळला । अत्यंत कोपला ते काळीं ।।८५।। मग पाठविले लक्ष वीर । पांच सेनाधीश मुख्य थोर । मल्ल प्रतिमल्लनामें असुर । प्रचंड चंड जघन पैं ।।८६।। रावणाची आज्ञा घेऊन । वेगें पावले अशोकवन । हें देखोनि वायुनंदन । अर्गळा हातीं तुळीतसे ।।८७।। करोनि पुच्छाचें उखळ । हातीं घेऊनि लोहमुसळ । कांडीतसे लंकेशाचें दळ । साळीऐसें तेधवां ।।८८।। असुरदेह पडती अचेतन । हाचि साळींचा कोंडा झाडून । सूक्ष्मदेह तांदूळ पूर्ण । जात उद्धरोन कपिहस्तें ।।८९।। करकरां कपि दाढा खात । नेत्र गरगरां भोवंडीत । शस्त्रास्त्रें अवघे वर्षत । पिशिताशन ऊठती ।।१९०।। मरूऐसा सबळ । जातां अंजनीचा बाळ । तों तेथें देखिलें देऊळ । सहस्रस्तंभमंडित[4] ।।९१।। तेथें रावणें देवी स्थापिली । ब्राह्मणाचा देत नित्य बळी । वायुसुतें ते वेळीं । तें विदारिलें देवालय ।।९२।। पायासकट उपडोन । आकाशपंथें देत भिरकावून । दशदिशांसी गेले पाषाण । पक्ष्यांऐसे उडोनियां ।।९३।। असो यावरी हनुमंतें । लोहार्गळा[5] घेवोनि हातें । मांडिलें वीरकंदनातें । गीत रामाचें गातसे ।।९४।। अशोकवन तेंचि खळें । माजी वीरधान्य रगडिलें । हनुमंत तवडा मध्यें बळें । पुच्छ पांथी फिरवीतसे ।।९५।।

१. वायुसुत हनुमान २. शत्रूची मुंडकी ३. शत्रूचे सैन्य ४. हजार खांबांचे ५. लोखंडाची अर्गला

तया खळियाजवळी । खेचरदेवी जनकबाळी । महावीरांचे दिधले बळी । राशी केल्या शिरांच्या ।।९६।। रेणुकेच्या कैवारें फरशधरें[1] । सर्व क्षत्रियांचीं छेदिलीं शिरें । तैसे सीतेकारणें राघवकिंकरें[2] । संहारिले यामिनीचर[3] ।।९७।। असो हनुमंत ते वेळां । असुर पुच्छें करूनि गोळा । आपटोनि समुद्रजळा- । माजीं निक्षेपी[4] साक्षेपें ।।९८।। लक्ष वीर संहारिले । मग सात पुत्र पाठविले । तेही हनुमंतें चूर्ण केले । अर्गळाघातेंकरूनियां[5] ।।९९।। हांक गेली रावणापाशीं । वानरें संहारिलें समस्तांसी । मग पाठविलें अखयासी । दळभारेंसीं तेधवां ।।२००।। अखया देखोनि हनुमंत । लोहार्गळा घेऊन नाचत । गदगदां हंसूनि बोलत । लंकेशात्मजासी[6] तेधवां ।।१।। अरे अखया तुझें नाम व्यर्थ । जैसे अजागळींचे स्तन यथार्थ । कीं मूर्खासी अलंकार घातले सत्य । बधिराचे श्रोत्र[7] व्यर्थ जेवीं ।।२।। कीं गर्भांधाचे नयन । व्यर्थ काय विशाळ दिसोन । कीं नासिकाविणें वदन । नामकरण तैसें तुझें ।।३।। रासभासी भद्रासन[8] । श्वानासी अग्रपूजामान । कीं दिव्यांबर परिधान । व्यर्थ प्रेतास करविलें ।।४।। तैसें अखया नाम दशमुखें । तुज ठेविलें व्यर्थ शतमूर्खें । आतां अखया तुझा क्षणें एकें । क्षय करीन जाण पां ।।५।। मग अखया धनुष्य घेऊन । सोडी बाणांपाठीं बाण । क्षण एक वायुनंदन । उगाच उभा राहिला ।।६।। काडिया पडतां बहुत । बैसका न सांडी पर्वत । कीं सुमनवृष्टीनें[9] गज मदोन्मत्त । खेद सहसा न मानी ।।७।। तैसे अखयाचे बाण । येतां न डगमगे वायुनंदन । मग लोहार्गळा घेऊन । कृतांतवत धांविन्नला ।।८।। बैसतां लोहार्गळेचे घाय । अखयाचा जाहला प्राणक्षय । समीरात्मज पावला विजय । सुरसमुदाय आनंदला ।।९।। ऐकोनि अखयाचा समाचार । शोकार्णवीं पडला लंकेश्वर । आसाळी राक्षसी भयंकर । अशोकवना धाडिली ।।२१०।। दहा सहस्र गजांचें बळ । उदरांत सांठवी अचळ । एक योजन मुख विशाळ । पसरोनियां धाविन्नली ।।११।। कपाळीं चर्चिला शेंदूर । बाबारझोटी भयंकर । तिनें धांवोनि सत्वर । वायुसुत धरियेला ।।१२।। उचलोनि घातला मुखांत । दांतांसी दांत जों मेळवीत । तंव तो उतरला उदरांत । क्षणमात्र न लागतां ।।१३।। लंकेशासी सांगती हेर । आसाळीनें गिळिला वानर । ऐकतां आनंदला दशशिर । असुरसभेसहित पैं ।।१४।। रावण शर्करा वांटीत । तों दूत आले शंख करीत । आसाळीचा जाहला अंत । हनुमंतें पोट फोडिलें ।।१५।। तिनें चाविला नसतां वानर । सगळाचि गिळिला सत्वर । यालागीं जितचि वीर । उदर फोडोनि निघाला ।।१६।। शोकाकुलित द्विपंचवदन । म्हणे हे अद्‌भुत प्रकटलें विघ्न । यावरी शक्रजित जाऊन । युद्ध करील परिसा तें ।।१७।। रामविजय ग्रंथ सुरस । सुंदरकांडीं कौतुक विशेष । श्रवण करोत सावकाश । रघुवीरभक्त आदरें ।।१८।। रविकुळमंडणा पुराणपुरुषा । श्रीमद्‌भीमातटनिवासा[10] । ब्रह्मानंदा अविनाशा । श्रीधरवरदा जगद्‌गुरो ।।१९।। स्वस्ति श्रीरामविजयग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत भक्त चतुर । विंशतितमाध्याय गोड हा ।।२२०।। श्रीरामचंद्रार्पणमस्तु ।। ओंव्या २२० ।।

## ।। अध्याय विसावा समाप्त ।।

---

१. परशुरामाने २. हनुमंताने ३. राक्षस ४. फेकी ५. अर्गलेच्या तडाख्याने ६. 'अक्षय' नामक रावणपुत्रास ७. कान ८. सिंहासन ९. पुष्पवृष्टीने १०. भीमा नदीच्या तीरावर निवास करणाऱ्या पांडुरंगा

## ॥ अध्याय एकविसावा ॥

# लंकादहन आणि ब्रह्मदेवाचे पत्र

॥ श्रीगणेशाय नमः॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः। क्षीराब्धितटीं बैसला सर्वकाळ। त्यासी क्षुधा कासया बाधील। दीपाची चिंता कां लागेल। दिनमणि समीप असतां पैं ॥१॥ राहतां कल्पतरूतळीं। कां डंखील कामनाव्याळी[1]। गंगाजळीं शेज केली। त्यासी वणवा करील काय ॥२॥ वारणविदारकाचे[2] संगतीं। जो बैसला अहोरात्रीं। त्यासी जंबूक बाधा करिती। हे कल्पांतींही घडेना ॥३॥ जो नित्य करी सुधारसपान। त्यासी विष बाधील काय दारुण। स्वरूपीं जो सदा सावधान। दुष्कृतें कैंची त्यापाशीं ॥४॥ कामधेनु घरीं असतां। कल्पना न बाधी तत्त्वतां। हुताशनतेज[3] धडकतां। शीत कैचें उरेल ॥५॥ तैसी रघुवीरकृपा ज्यासी पूर्ण। त्यासी न बाधी विषयहुताशन[4]। रामचरित्रीं गुंतलें मन। इतर श्रवण नावडे तया ॥६॥ असो विसावा अध्याय संपतां तेथें। आसाळी विदारिली हनुमंतें। यावरी इंद्रजितासी लंकानाथें। आज्ञा केली सत्वर ॥७॥ तों नग्न कुमारी शिंके पाठीसी। रावण शकुन पुसे ब्रह्मयासी। विधि म्हणे दोघांतून एकासी। अपयश येईल दिसतसे ॥८॥ रावण पाहे क्रोधयुक्त। विधी म्हणे वानर होईल हस्तगत। तैसाचि चालला इंद्रजित। अशोकवना ते वेळे ॥९॥ सवें घेऊन चतुरंगसेना। शक्रारि[5] निघाला अशोकवना। शायशीं अयुतें गज जाणा। रथतुरंगमां गणना नाहीं ॥१०॥ देव बैसोनि विमानीं। कौतुक पाहती तेच क्षणीं। अशोकवनांत रावणी। निजभारेंसी पातला ॥११॥ तों पाठमोरा हनुमंत। बैसलासे फळें झेलीत। असुर गर्जती बहुत। परी तो तिकडे न पाहे ॥१२॥ क्षणक्षणां पाठी कुरवाळीत। मागें परतोन वांकुल्या दावीत। राक्षस शस्त्रें असंख्यात। वर्षते जाहले कपीवरी ॥१३॥ इंद्रजितें शर टाकिले। हनुमंतें वरिचेवरी झेलिले। मुष्टीमाजी जमा केले। बहुसाल तेधवां ॥१४॥ अकस्मात पुच्छ सोडिलें। रावणीचें धनुष्य हरिलें। हनुमंतें आकर्ण ओढिलें। बाण लावून ते समयीं ॥१५॥ अचुक मारुतीचें संधान। सोडिता जाहला असंख्य बाण। जैसे शब्दामागें शब्द पूर्ण। मुखांतून निघती पैं ॥१६॥ तों विमानारूढ सुधापानी[6]। पुष्पें वर्षती क्षणक्षणीं। म्हणती मारुति धन्य अंजनी। तुजचि एक प्रसवली ॥१७॥ राक्षसांची शिरें ते काळीं। हनुमंतें असंभाव्य उडविलीं। रावणीचा मुकुट तळीं। छेदोनियां पाडिला ॥१८॥ बाण सरले तये वेळां। सवेंच घेतली लोहार्गळा[7]। वायुवेगें धांविन्नला। शक्रारीचे रथापाशीं ॥१९॥ अर्गळा घालोनि ते वेळां। अश्वांसहित रथ भंगिला। इंद्रजित विरथ जाहला। भयभीत पाहतसे ॥२०॥ लोहार्गळेचे घाय सबळ। झोडिलें इंद्रजिताचें दळ। वाहती रक्ताचे खळाळ। समुद्रा जाती भेटावया ॥२१॥ जैसें अलातचक्र फिरे। तैसा हनुमंत असुरांत वावरे। रावणीस[8] अर्गळाप्रहारें। झोडिता जाहला तेधवां ॥२२॥ रावणात्मजें ते अवसरीं। पाश टाकिला हनुमंतावरी। तों मारुति होय मोहरी। उडोनि जाय एकीकडे ॥२३॥ मागुती लहान पाश करून। कपीवरी टाकी आणून। पर्वताकार सीताशोकहरण[9]। होऊन पाश तोडीतसे ॥२४॥ शस्त्रास्त्रें बहुसाल। टाकितां नाटोपे कपि[9] सबळ[10]। यावरी अंजनीचा बाळ। इंद्रजितावरी लोटला ॥२५॥

---

१. वासनारूपी सर्पीण २. सिंहाच्या ३. अग्नीचे तेज ४. विषयरूपी अग्नी ५. मेघनाद ६. देवगण ७. लोखंडाची सळी ८. इंद्रजितास ९. मारुती १०. बलवान

मल्लयुद्धासी प्रवर्तला । इंद्रजित बळें आपटिला । नग्न करून भिरकाविला । चरणीं धरून हनुमंतें ॥२६॥ इंद्रजित तेव्हां रडत । म्हणे मज आला काय मृत्य । दळही संहारिलें समस्त । न दिसे येथें कोणीही ॥२७॥ म्हणे मज निराहारियाचे[१] हातें मरण । हा तों करी फळभक्षण । परी रामापाशीं नेईल धरून । विटंबील नानापरी ॥२८॥ सुटे जों जनकनंदिनी । तों मज घालील बंदिखानीं । जैसें रावणासी धरूनी । पांच पाट काढिले ॥२९॥ मग इंद्रजित पळाला । विवरामाजी तो दडाला । कपीनें द्वारीं पाषाण लाविला । विवरीं कोंडिला राक्षस ॥३०॥ इंद्रजित कासावीस होये । म्हणे कां मरण मज न ये । शस्त्र जवळी नाहीं करूं काये । प्राणत्याग करावा ॥३१॥ विवरीं कोंडिला इंद्रजित । हें दशकंठासी जाहलें श्रुत । परम जाहला भयभीत । विनवीतसे विरिंचीतें ॥३२॥ म्हणे तुझें वचन साचार । हस्तगत नव्हे कां वानर । तरी तुवां जाऊनि सत्वर । धरून कपि देईं आम्हां ॥३३॥ तरी तूं तेथवरी जाऊन । मज द्यावें पुत्रदान । काळरूप तो वानर जाण । तुजविणें कोणा नाटोपे ॥३४॥ मग कमलोद्भव पातला तेथ । तंव तो नग्नचि इंद्रजित । दडाला असे विवरांत । भयभीत मुसमुसी[२] ॥३५॥ मग रावणी बोले करुणावचन । आतां मज सोडवीं येथून । त्या वानरासी धरिल्याविण । मी विवराबाहेर न येंचि ॥३६॥ कमळासन म्हणे ते अवसरीं । तूं आतां निघें विवराबाहेरी । ब्रह्मपाश घालोनि झडकरी । कपि बळिया धरावा ॥३७॥ रावणी देत प्रत्युत्तर । ब्रह्मपाशास नावरे वानर । विरिंचि म्हणे तूं अपवित्र । तुज अस्त्र हें न चाले ॥३८॥ मग विष्णुसुतें[३] ते वेळीं । राघवप्रियाची[४] स्तुति केली । तूं वज्रशरीरी महाबळी । निशाचर कांपती तूतें ॥३९॥ आमुचें वचन साच करावें । ब्रह्मपाशीं त्वां सांपडावें । सभेपर्यंत उगेंच यावें । मग दावावें पराक्रमा ॥४०॥ ऐसें कमलोद्भवें विनविलें । समीरात्मजें[५] मान्य केलें । मग विरिंचीनें पाश प्रेरिले । माजी बांधिलें हनुमंता ॥४१॥ हनुमंत बांधिला पाशीं । शक्रारि धांवला वेगेंसीं । दृढ बांधिता जाहला कपीसी । निजहस्तेंकरूनियां ॥४२॥ एक तृणवेंटीनें पाय बांधिती । एक वृक्षसालीनें आंवळिती । एक दोर आणावया धांवती । नगरामाजी सत्वर ॥४३॥ हनुमंत दिसे बांधिला । परी तो सर्वदाही मोकळा । जैसा ज्ञानी संसारी गुंतला । परी तो सर्वदा मुक्त असे ॥४४॥ नलिनीपत्र जळीं खेळे । परी त्यावरी बिंदु नातळे । कीं शीतोष्ण धुळीनें न मळे । निराळ[६] जैसें सर्वदा ॥४५॥ कीं समीर सर्वांवरून जात । परी कोठेंचि नव्हे लिप्त । तैसाचि वीर हनुमंत । बंधमोक्षातीत जो ॥४६॥ असो परमेष्ठी[७] आणि इंद्रजित । सभेसी आणिती हनुमंत । वाटेसी राक्षस टोंचीत । नाना शस्त्रें घेऊनियां ॥४७॥ शस्त्रें भंगलीं समग्र । वज्रशरीरी तो वानर । असुरीं उचलोनि तो सत्वर । सभेसमोर आणिला ॥४८॥ दृष्टीं देखतां हनुमंत । रावण करकरां दांत खात । याउपरी रघुनाथदूत । काय करिता जाहला ॥४९॥ बंधनें तोडूनि समस्त । पुच्छासनीं[८] बैसला हनुमंत । रावणाहून एक हस्त । उंच आसन मारुतीचें ॥५०॥ मग पुसे प्रधान प्रहस्त । तूं कोणाचा आहेस दूत । परी तो न बोले हनुमंत । पाहे चकित उगाचि ॥५१॥ मग पुसे द्विपंचवदन[९] । मर्कटा तूं कोणाचा कोण । यावरी जनकजाशोकहरण[१०] । काय वचन बोलत ॥५२॥ म्हणे रे मशका रजनीचरा । महामळिणा[११] दुर्जना[१२] पामरा । मी कोण आहें तुज तस्करा । कळलें नाहीं अद्यापि ॥५३॥ जेणें स्वयंवरीं तुज वांचविलें । उरावरोनि चाप काढिलें । त्याचा दास जाण वहिलें । शिरकमळें छेदीन तुझीं ॥५४॥

१. निराहारी व्रतस्थ २. स्फुंदत होता ३. ब्रह्मदेवाने ४. हनुमंताची ५. वायुपुत्र ६. आकाश ७. ब्रह्मदेव ८. शेपटाचे आसन करून ९. दशमुख रावण १०. सीताशोक निवारक मारुती ११. पापी १२. दुष्ट

जेणें ताटिका सुबाहू मारून । केलें कौशिकमखपाळण[1] । मूढा त्याचा दास मी आहें पूर्ण । करीन दहन लंकेचें ।।५५।। तुझे भगिनीचें नासिक छेदिलें । खर दूषण त्रिशिरा मारिले । त्याचा दूत मी आलों बळें । शिक्षा तुज लावावया ।।५६।। जैसें अन्नसदनीं रिघे श्वान । तैसा पंचवटीस येऊन । चोरिलें जानकीचित्ररत्न । महामलिना अपवित्रा ।।५७।। रामपंचाननाची वस्त । कैसा ठेवशील तूं बस्त । पाडून वासुकीचा दांत । मंडूक वांचेल कैसा पां ।।५८।। व्याघ्र असतां निद्रित । बाहेर जिव्हा लळलळित । ती तोडोनि जंबुक यथार्थ । कैसा वांचेल सांग पां ।।५९।। तुझा अखया मारून । विध्वंसिलें म्या अशोकवन । तुझें दळ अवघें मर्दून । इंद्रजित गांजिला ।।६०।। राक्षसकुळवैश्वानर[2] । अयोध्याप्रभु कौसल्याकुमार । तुझें छेदावया शिर । समरधीर येत आतां ।।६१।। तो विषकंठवंद्य रघुनंदन । तुझे दशकंठ छेदून । दशदिशांसी बळी देऊन । सीता घेऊन जाईल ।।६२।। ऐसें ऐकतां द्विपंचवदन । जाहला परम क्रोधायमान । म्हणे याचें पुच्छ नासिक कर्ण । जिव्हा छेदून टाका रे ।।६३।। ऐसें बोलतां लंकेश । चौताळले महाराक्षस । पुच्छावरी आसमास[3] । शस्त्रघाय मारिती ।।६४।। धापा दाटती हाणतां वैभवें । परी त्याचे रोमही वक्र नोव्हे । भय घेतलें दशग्रीवें । म्हणे बरवें दिसेना ।।६५।। मग विचारी निजमनीं । हा रामउपासक सत्यवचनी । तरी याचा मृत्यु कैसेनी । आण घालूनि विचारूं ।।६६।। मग म्हणे तुज रघुपतीची आण । सत्य सांग तुझें मृत्यांग कोण । येरू म्हणे मज नाहीं मरण । ऐकोन रावण हांसत ।।६७।। ब्रह्मयासही आहे मरण । तेथें तुझा कीटका पाड कोण । येरू म्हणे पुच्छ होईल दहन । तैंच मरण आम्हांसी ।।६८।। तैलें वस्त्रें भिजवून । पुच्छ गुंडाळूनि लावा अग्न । क्षणामाजी भस्म होऊन । सर्व जाईल निर्धारें ।।६९।। वस्त्रें गुंडाळा बहुत । तेणें अग्नि चेतेल अद्‌भुत । क्षणामध्यें होईल अंत । उशीर येथें न लगेचि ।।७०।। रावण म्हणे हें साचार । मग स्नेहेंसहित वस्त्रभार । पुच्छा गुंडाळिती समग्र । वायुकुमर काय बोले ।।७१।। म्हणे पुच्छ उघडें राहतां । मग मज नाटोपे हें तत्त्वतां । राक्षस भागले वस्त्रें गुंडाळितां । पुच्छ सर्वथा न सरेचि ।।७२।। वस्त्रराशी आटल्या समग्र । अधिकाधिक वाढे पुच्छाग्र । जैसा पंडितबुद्धीचा प्रसर । बोलतां बहुत न सरेचि ।।७३।। कीं महाकवीची पद्यरचना । अपार लिहितां ते सरेना । रामगुणांची वर्णना । वर्णितां शेषा नाटोपे ।।७४।। तैसें मारुतीचें पुच्छ अद्‌भुत । राक्षसांसी नव्हे गणित । जैसा अजारक्षकांसी[4] निश्चित । वेदार्थपार समजेना ।।७५।। असो सरल्या वस्त्रांच्या राशी । शेवटीं नग्न केले नगरवासी । कोठे न मिळे एक दशी । बहुत प्रयासें शोधिता ।।७६।। रणिवसा नग्न केला । तरी पुच्छभाग[5] उघडा राहिला । नि:शेष तंतुमात्र उरला । नाहीं कोठें नगरांत ।।७७।। हनुमंत म्हणे अणुमात्र रितें । राहतां बोल नाहीं मातें । एक काढूनि यज्ञोपवीतें । भयें पुच्छासी गुंडाळिती ।।७८।। तैल घृत नवनीत । शोधितां न मिळे निश्चित । विंशतिचक्षूसी[6] सांगती दूत । स्नेह वस्त्रें न मिळती कोठें ।।७९।। राजसेवक फिरती नग्न । उभय द्वारें मुक्त सोडून । नगरींचे लज्जेनें जन । कपाटें झांकून बैसले ।।८०।। एक बैसले अंधारीं । एक निघाले विवरीं । एकीं नेत्र लावून निशा थोरी । दिवस असतां केली हो ।।८१।। वृद्ध वृद्ध एक बोलती । पुढें न दिसे बरवी गती । हें लंकानगर अंती । भस्म होईल दिसतसे ।।८२।। असो वस्त्रें न मिळती निश्चित । पुच्छ उघडें एक हस्त । रावण म्हणे अशोकवनांत । वस्त्रें असती सीतेपाशीं ।।८३।। ऐकतां तयाच्या उत्तरा । हनुमंत आवरी पुच्छाग्रा । दूत सांगती दशकंधरा । अणुमात्र पुच्छ उरलें नसे ।।८४।।

१. कौशिक-यज्ञ-रक्षक राम २. राक्षसकुळदाहक राम ३. भोवती ४. मेंढपाळास ५. शेपटाचा भाग ६. वीस डोळ्यांच्या रावणास

तेथें कासया पाहिजे वस्त्र । लंकेश म्हणे लावा रे वैश्वानर । चुडी लाविती रजनीचर । अनळ साचार स्पर्शेना ॥८५॥ नाना उपाय योजिती । परी न लागेचि अग्निज्योती । रावण पुसे मारुती । अनळ कां रे स्पर्शेना ॥८६॥ मग बोले अशोकवनारी[१] । पुच्छयज्ञ होतो तुझे घरीं । तरी सेवकाहातीं निर्धारीं । मूर्खा किमर्थ फुंकविसी ॥८७॥ तरी तूं स्वमुखेंकरून । चेतवीं सत्वर कृशान । न लगतां एक क्षण । ज्वाला येथें ऊठती ॥८८॥ ऐसें बोलतां अंजनीसुतें । तें मानलें दशमुखातें । परी अंतरीं पावला भयातें । मग धैर्य धरूनि उठियेला ॥८९॥ ते वेळे निजमुखें दाहक । बळें फुंकी लंकानायक । हनुमंतें बंधु आणि जनक । अनळ अनिळ स्मरियेला ॥९०॥ तों एकाएकीं अग्नि धडकला । दाही मुखीं झोंबती ज्वाळा । दाढ्या मिशा तेव्हां सकळा । भस्म केल्या जाळूनि ॥९१॥ रावणें पाप केलें बहुत । पुढें रामबाणें यासी देहांत । यालागीं अगोदर प्रायश्चित्त । राघवप्रियें दिधलें कीं ॥९२॥ दशमुखीं पोळला दशकंधर । दिसे जैसा दग्धकांतार[२] । असो मुखासी लावूनियां वस्त्र । निजासनीं बैसला ॥९३॥ तंव धडकला पुच्छवन्ही । हनुमंत गडबडा लोळे धरणीं । काकुळती ये म्हणे सोडा कोणी । असुर मनीं आनंदले ॥९४॥ म्हणती हें बरवें जालें । अखयादिकांसी[३] येणें मारिलें । मर्कटें बहुतांसी संहारिले । विटंबिले इंद्रजिता ॥९५॥ मग विरिंचीनें धरिला युक्तीं । दशमुखें योजिली बरवी गती । अग्न लाविला पुच्छाप्रती । मरेल निश्चितीं आतांचि ॥९६॥ येरू चडफडी तडफडी । उडे पडे भूमीसी गडबडी । आपली मांडी थापटोनि दाढी । रावणाची गेला धरावया ॥९७॥ तो दाढीच नाहीं निःशेष । तेणें रावणासी बसला दचक । देखोन करी हास्यमुख । म्हणे अनर्थ दिसतो पुढें ॥९८॥ हनुमंत म्हणे असुरांप्रती । मज सोडवावें समस्तीं । ऐका माझी एक विनंती । धांवे मारुति पुढेंचि ॥९९॥ तंव ते पळती दूरदूर । पुच्छ आकर्षूनि असुर । दाढ्या जाळियेल्या समग्र । प्रळय थोर मांडला ॥१००॥ गरगरां पुच्छ तये वेळां । भवंडितां[४] झळकती प्रळयज्वाळा । राक्षस करूनियां गोळा । पुच्छाग्नींत भस्म करी ॥१॥ सभा सांडोनि पळती असुर । हनुमंत म्हणे उभा रहा क्षणभर । मज सोडवा तुम्ही समग्र । म्हणोनि भेटे तयांतें ॥२॥ शतांची शतें ते क्षणीं । यामिनीचर[५] पुच्छें बांधोनी । रावणापाशीं आणी ओढोनी । म्हणे कां हे पळताती ॥३॥ असो सीतेसी राक्षसी सांगत । तुझा वानर मेला गे यथार्थ । ऐकतां जानकी शोक करीत । म्हणे विपरीत केवीं घडे ॥४॥ मशकें सागर शोषिला । जंबुकांनीं सिंह केवी धरिला । खद्योतांनीं सूर्य पाडिला । खालीं कैसा आसडोनी ॥५॥ वज्र भंगलें लागतां कमळ । पतंगें[६] ग्रासिला वडवानळ । भोगींद्राचें फणिमंडळ । वटबीजभारें[७] दडपलें ॥६॥ मक्षिकेच्या पक्षवातेंकरूनी[८] । प्रळयमेघ गेला विदारूनी । पिपीलिकाभारें कोसळोनी । कनकाद्रि कैसा पडियेला ॥७॥ पुष्पप्रहार पडतां सृष्टीं । केवीं दणाणे कूर्मपृष्ठी । चित्रींच्या व्याळे उठाउठी । प्रळयचपळा ग्रासिली ॥८॥ असो रुद्रावतार हनुमंत । तो राक्षसीं जाळिला अग्नींत । कैसी घडली ही मात । विचारीत राघवप्रिया ॥९॥ जठराग्नीस सीता पुसत । तो म्हणे क्षेम आहे हनुमंत । नगर मी जाळीन समस्त । बंधुसाह्याकारणें[९] ॥११०॥ असो इकडे समस्त असुर । हनुमंतावरी करिती शस्त्रमार । तों पुच्छाग्नी भडकला थोर । पळती असुर चहूंकडे ॥११॥ नानाशस्त्रें बाण शक्ती । दुरोनि कपींद्रावरी[१०] टाकिती । मग मिष घेऊन मारुती । गतप्राण[११] पडियेला ॥१२॥

---

१. अशोक वन नष्ट करणारा मारुती २. जळलेल्या वनाप्रमाणे ३. अक्षय आदि वीरांस ४. गरगरा फिरविल्यावर ५. निशाचर ६. एक पंखाचा किडा ७. वडाच्या बीच्या ओझ्याने ८. पंखाच्या वाऱ्याने ९. बंधूला साहाय्य करण्यासाठी १०. हनुमंतावर ११. निचेष्ट

अश्व सारथी रथ चूर्ण । पर्वताखालीं जाहले जाण । धूम्राक्ष चपळ उड्डाण । करूनि गेला एकीकडे ॥६५॥ मग शूळ घेऊनि ते अवसरीं । धूम्राक्ष धांविन्नला मारुतीवरी । मारावया सर्पारी[1] । अळिका तैसा चपेटे ॥६६॥ वारणावरी धांवे मृगेंद्र । तैसा आवेशे निघे वायुपुत्र । मुष्टिघातें त्याचें शिर । मृत्तिकाघटवत चूर्ण केलें ॥६७॥ गजासी पर्वतपात[2] जाहला । कीं महावृक्ष उन्मळला । तैसा धूम्राक्ष पडला । गतप्राण होऊनियां ॥६८॥ धूम्राक्ष पडतांचि तत्काळ । पळों लागले सर्व घायाळ । जैसें मन आकळितां बळ । इंद्रियांचें कांहीं न चले ॥६९॥ जेथोनि मन उडे निश्चितीं । तेथें कैंची राहिली प्रीती । कीं देखणिया[3] त्रिजगती[4] । नेत्र गेलिया मावळे ॥१७०॥ तैसा धूम्राक्ष पडतां ते काळीं । घायाळीं लंकेंत प्रवेशलीं । रावणें वार्ता ऐकिली । हृदयीं वाढली परम चिंता ॥७१॥ मग दळभारेंसी वज्रदंष्ट्री । दशमुख तयासी आज्ञा करीं । तो समरभूमीसी झडकरी । येता झाला वातवेगें ॥७२॥ वानर राक्षस ते समयीं । मिसळले एके ठायीं । वानरवीरीं राक्षस महीं । प्रेतें करूनि पाडिले ॥७३॥ रथारूढ वज्रदंष्ट्री । हरिदळीं[5] मिसळला झडकरी । दोन लक्ष कपी भूमीवरी । प्रेतें होऊन पडियेले ॥७४॥ ऐसें देखोनि वाळिसुत । वेगें धांवला कृतांतवत । शतांचीं शतें पर्वत । उचलोनि टाकी अरीवरी ॥७५॥ पर्वतासरिसे ते क्षणीं । राक्षस मारिले एक अक्षौहिणी । अशुद्धेंकरूनि धरणी । पूर वाहाती भडभडां ॥७६॥ मग तारातनयें ते अवसरीं । उचलिला बहुशृंगांचा गिरी । भिरकाविला वज्रदंष्ट्रीवरी । परमावेशें तेधवां ॥७७॥ तों राक्षसे सोडोनियां बाण । क्षण न लागतां केला चूर्ण । ऐसें अंगदें देखोन । महावृक्ष उन्मळिला ॥७८॥ परम प्रतापी वाळिनंदन । भुभुःकारें गर्जवीत गगन । वृक्षघायासरसा[6] प्राण । वज्रदंष्ट्रीचा घेतला ॥७९॥ शरीर जाहलें शतचूर्ण । मही भिजली अशुद्धेंकरून । जैसा रगडितां मत्कुण । न उरेच कांही उरी ॥१८०॥ तो अकंपन दळभारेंकरून । रणासी आला न लागतां क्षण । तेणें सोडिले असंख्य बाण । कपिचक्रावरी पैं ॥८१॥ सिंहचपेटे देखोनि वारण । तेवीं पातला सीताशोकहरण[7] । वृक्षघातें झडकरून । रणीं अकंपन विदारिला ॥८२॥ राक्षसदळीं हाहाकार । शोकार्णवी मग्न दशकंधर । मग तयास शांतवी ज्येष्ठ कुमर । शक्रजित नाम जया ॥८३॥ म्हणे राया तूं चिंता न करीं । तुझे शत्रु समरभूमीवरी । आजि पहुडवीन निर्धारीं । तरी शक्रजित नाम माझें ॥८४॥ नाहीं तरी मी जैसा जंत । पोटासी आलों तुझे यथार्थ । मग असंख्य दळासहित इंद्रजित । जनका नमोनि निघाला ॥८५॥ असंभाव्य सेनासागर । रणमंडळासी आला सत्वर । तंव ते अपार वानर वीर । रणपंडित प्रतापी ॥८६॥ घेऊन शिळा तरुवर । असुरांत मिसळले वानर । जैसे वायसांमाजी सुंदर । राजहंस मिसळले ॥८७॥ किंवा गारांमाजी हिंरे । मिसळती जैसे एकसरें । तैसे वानर प्रतापें थोरें । असुरदळीं चौताळती[8] ॥८८॥ कपींचा प्रताप आगळा । देखोनि इंद्रजितें रथ लोटिला । तों वाळिपुत्र धांविन्नला । महापर्वत घेऊनियां ॥८९॥ जंबुमाळी प्रतापी वीर । त्यावरी धांवला वायुकुमर । विद्युन्माळीयावरी[9] श्वशुर[10] । सुग्रीवाचा[10] उठावला ॥१९०॥ जंघनामें असुर प्रबळ । त्यावरी धांवे वीर नळ । परम माजलें रणमंडळ । हांकें निराळ गर्जतसे ॥९१॥ वानरराक्षसांचीं प्रेतें । एके ठायीं पडलीं अगणितें । जैसे खडे आणि मुक्तें । एके ठायीं विखुरली ॥९२॥ हनुमंतें पायांतळीं । घालोनि चिरिला जंबुमाळी । विद्युन्माळी ते काळीं । सुषेणें आपटोनि मारिला ॥९३॥

---

१. गरुड २. पर्वत कोसळला ३. डोळसाला ४. त्रैलोक्याचा ५. वानरांच्या सैन्यात ६. झाडाच्या आघाताने ७. मारुती ८. त्वेषाने धावले ९. या नावाच्या राक्षसावर १०. सुग्रीवाचा सासरा सुषेण

नीळें जंघ मारिला ते क्षणीं । तों अस्ता गेला वासरमणी । अंधारें कोंदली रजनी । कोणासी कोणी न देखे ॥९४॥ कोण रे कोण असुर पुसत । कपी म्हणती आम्ही रामदूत । असुरवीर अकस्मात । घाय हाणिती सरिसाचि ॥९५॥ कोण रे कोण पुसती वानर । जे म्हणती आम्ही असुर । घायें हाणोनि कपिवर । करिती चूर राक्षसांचा ॥९६॥ सवेंच उदय पावे अत्रिपुत्र । आनंदले सकळांचे नेत्र । परी वानरवीर अनिवार । आटिले असुर पराक्रमें ॥९७॥ मग तो शक्रजित ते वेळां । रथासहित सेनेंतून उडाला । जलदजाळांत[१] लपाला । वर्षो लागला सर्पबाण ॥९८॥ राक्षसाचें कापट्य अद्भुत । बाण तेच सर्प होत । कपींचे अंगीं संचरत । विकळ पडती वीर तेणें ॥९९॥ मग रामलक्ष्मणांवरी । सर्पबाण सोडी शक्रारी । अयोध्यानाथ ते अवसरी । चहुंकडे पाहे तटस्थ ॥२००॥ म्हणे बाण येतात कोठोनी । संधानकर्ता[२] न दिसे नयनीं । जरी प्रकट दिसे समरांगणीं । तरी बाणघातें फोडीन मी ॥१॥ ओढवलें परम दुस्तर । कित्येक उडाले ऊर्ध्व वानर । शोधिलें बहुत अंबर । परी तो वीर दिसेना ॥२॥ वानर आले परतोन । अवघे पाहती म्लानवदन । रामलक्ष्मणांसी बाण । बहुसाल खडतरले[३] ॥३॥ ते समयीं मूर्च्छा येऊन । भूमीवरी पडले दोघेजण । तों इंद्रजित बोले वरून । कां निवांत राहिलां ॥४॥ मारूनियां दूषण खर । शिळीं बांधिला सागर । म्हणवितां क्षत्रिय राजकुमर । कां रे शर सोडाना ॥५॥ वरकड कपींवर बाण । शक्रजितें टाकिले वरून । तरू उन्मळती मुळींहून । हरिगण[४] तैसे पडियेले ॥६॥ किंशुक फुलतां बहुत । सिंदूरवर्ण दिसे पर्वत । तैसीं कपींचीं शरीरें आरक्त । असंख्यात पडियेलीं ॥७॥ शक्रजित खालीं उतरून । मुख्य जे पडले राक्षसगण । त्यांचीं कुणपें[५] उचलून । लंकेसी नेता जाहला ॥८॥ जयवाद्यांचा होतां घोष । परम आनंदला लंकेश । हृदयीं आलिंगोनि पुत्रास । म्हणे धन्य मी तुझेनि ॥९॥ त्रिजटेस म्हणे रावण । पुष्पकीं सीतेसी बैसवून । दृष्टीस दावीं सकळ रण । रामसौमित्रांसमवेत ॥२१०॥ त्यांचीं विलोकितां प्रेतें । मग ती वश होईल आम्हांतें । अवश्य म्हणोनि जानकीतें । विमानीं बैसवी त्रिजटा ॥११॥ सकळ मंडळ विलोकीत । तों अनुजासहित[६] रघुनाथ । दृष्टीं देखतां मूर्च्छित । जनकात्मजा पडियेली ॥१२॥ मग त्रिजटेनें सीता धरूनी । उठवोनि बैसविली सांवरूनी । म्हणे माये धैर्य धरीं मनीं । चापपाणी उठेल आतां ॥१३॥ तंव ते बिभीषणाची राणी । सरमा जवळी गुप्त येऊनी । विदेहतनयेचे कर्णीं । निजगुज सांगतसे ॥१४॥ म्हणे जगन्माते धरीं धीर । आतां उठतील रामसौमित्र । संहारतील सकळ असुर । आन विचार येथें नाहीं ॥१५॥ मी अनृत बोलेन साचार । तरी माझें खालीं पडेल शिर । माझे पूर्वज अपार । नरक भोगितील आकल्पवरी[७] ॥१६॥ त्रिजटा म्हणे जानकीसी । माते चिंता न करीं मानसीं । पुष्पक अशोकवनासी । वेगेंकरून पातलें ॥१७॥ सीतेस बैसवून स्वस्थानीं । त्रिजटा सांगे रावणालागुनी । म्हणे सीतेचिया सत्त्वा हानी । कल्पांतींही नव्हेचि ॥१८॥ मग त्रिजटा परतोनी । सीतेपासीं बैसे येउनी । जैसी चित्तवृति मुरडोनी । स्वरूपीं पावे विश्राम ॥१९॥ सरमा[८] म्हणे जनकनंदिनी । तूं चिंता कांहीं न करीं मनीं । पुराणपुरुष चापपाणी । त्याची करणी जाणसी तूं ॥२२०॥ आपुला प्रताप विशेष । वाढवावया अयोध्याधीश । आधीं शत्रूस देऊनि यश । कांहीं एक आरंभी ॥२१॥ हें ब्रह्मांड सकळिक । बाणीं जाळील रघुनायक । तेथें इंद्रजित तो मशक । उशीर काय वधावया ॥२२॥

१. ढगांत २. नेमके बाण मारणारा ३. खरचटून गेले ४. वानर ५. मृत शरीरे ६. धाकटा भाऊ लक्ष्मणासहित ७. कल्पांतापर्यंत ८. बिभीषणपत्नी

रावण कुंभकर्ण इंद्रजित । तोचि हीं बाहुलीं निर्मित । खेळ मांडिला जो अद्भुत । जाणसी समस्त तुझें तूं ॥२३॥ निशा संपतां चंडकिरण । उगवें कीं नुगवे म्हणोन । या चिंतेचें कारण । कांहीं नाहीं जाण पां ॥२४॥ करितां रामनामस्मरण । पापें जाती न जाती जळोन । या संदेहाचें कारण । कांहींच नसे जाण पां ॥२५॥ हृदयीं प्रगटतां शुद्ध ज्ञान । चुके कीं न चुके जन्ममरण । या चिंतेचें कारण । कांहींच नाहीं जाण पां ॥२६॥ क्षमा शांति धरितां जाण । कलह होय न होय म्हणोन । या चिंतेचें कारण । कांहींच नसे जाण पां ॥२७॥ अयोध्यानाथ रघुनंदन । यासी जय कीं अपजय म्हणोन । या चिंतेचें कारण । कांहींच नसे जाण पां ॥२८॥ ज्या रामाचें करितां स्मरण । भक्त पावती जयकल्याण[1] । तो जगदानंद पूर्ण । विजयी असे जानकी ॥२९॥ असो इकडे बिभीषण । सूर्यसुतासी बोले वचन । म्हणे राक्षस पर्वत आणून । रामावरी टाकितील ॥२३०॥ उदय पावे जंव गभस्ती । तंव जतन कराव्या दोन्ही मूर्ती । बोल बोलतां अश्रु स्रवती । रावणानुजाचे[2] तेधवां ॥३१॥ मग जीवंत होते जे वानर । त्यांहीं पुच्छमंडप[3] करूनि सत्वर । दोन्ही स्वरूपें सुकुमार । रक्षिलीं तेव्हां अंतरीं ॥३२॥ कीं पुच्छपेटी करून । ब्रह्मादि देवांचें देवतार्चन । वानर बैसले सांठवून । सभोंवते सद्गद ॥३३॥ सूर्यवंशमंडण दशरथ । त्याचे महत्पुण्याचा पर्वत । तो वानरीं वेष्टुनि बहुत । चिंताक्रांत बैसले ॥३४॥ मारुति बिभीषण रण शोधीत । तों महावीर पडले बहुत । एक नेत्र उघडोनि पुसत । बिभीषणाप्रती ते काळीं ॥३५॥ म्हणती या चराचराचें जीवन । तो सुखी आहे कीं रघुनंदन । सद्गद होऊन बिभीषण । म्हणे चिंता न करावी ॥३६॥ तों घायें जांबुवंत विव्हळत । बिभीषणासी जवळी बोलावीत । पुसे क्षेम आहे कीं रघुनाथ । पुराणपुरुष जगदात्मा ॥३७॥ स्फुंदस्फुंदोनि सांगे बिभीषण । नागपाशीं बांधिले दोघेजण । तों मूर्च्छना सांवरून सुषेण । नेत्र उघडोनि बोलत ॥३८॥ म्हणे द्रोणाचळीं औषधी बहुत । जरी कोणी आणील बळवंत । तरी रामसौमित्रींसहित । दळ अवघें उठवीन ॥३९॥ मग बोले बिभीषण । ऐसा बळिया आहे कोण । रात्रीमाजी जाऊन । औषधी येथें आणील ॥२४०॥ जांबुवंत बोले वचन । एक सीताशोकहरण । त्यावांचूनि गिरिद्रोण । आणूं कोणी शकेना ॥४१॥ मग सुषेण आणि जांबुवंत । बिभीषण तयांस हातीं धरीत । श्रीरामापासीं बोलत बोलत । येते जाहले तेधवां ॥४२॥ तंव रण शोधूनि हनुमंत । तोही तिकडोनि आला त्वरित । याउपरी किष्किंधानाथ[4] । बोलता जाहला ते काळीं ॥४३॥ म्हणे रामसौमित्रांसीं उचलून । जा तुम्ही किष्किंधेसीं घेऊन । मी रावणा सकुळ मारून । घेऊन येईन जानकी ॥४४॥ राज्यीं स्थापीन बिभीषण । बंदींचे सोडवीन सुरगण । राहूं मी आणि वायुनंदन[5] । सर्वी परतोन जावें आतां ॥४५॥ तेव्हां आकाशीं वदे देववाणी । आतांचि उठेल चापपाणी । नेत्र उघडिले तये क्षणीं । अयोध्याधीशें सत्वर ॥४६॥ भोंवते पाहे राघवेश । तों निकट बैसले निजदास । मानस[6] वेष्टोनि राजहंस । बैसती जैसे प्रीतीनें ॥४७॥ कीं कमळ वेष्टित भ्रमर । कीं अही[7] वेष्टीत मलयागर । कीं दिव्य मुक्ताभोंवतें चतुर । परीक्षक जेवीं मिळती ॥४८॥ असो सुग्रीवास म्हणे रघुनंदन । बा रे तूं आपुला दळभार घेऊन । किष्किंधेसी जाईं परतोन । येथें दोघे राहूं आम्ही ॥४९॥

१. यश आणि मोक्ष २. बिभीषणाचे ३. शेपटांचा मांडव ४. सुग्रीव ५. हनुमान ६. मानस सरोवर ७. सर्प

ऐसें उदास बोले रघुनाथ । सर्वांसीं आले अश्रुपात । सुग्रीव सद्गद बोलत । म्हणे विपरीत केवीं घडे ।।२५०।। सांडोनियां दिनपती । किरणें कोणीकडे जाती । कनकावेगळी[१] कांती[१]। कल्पांतींही नव्हेचि ।।५१।। घटास मृत्तिका सांडून । कोणीकडे राहील भिन्न । पटास तंतु त्यागोन । वेगळा नोहेच सर्वथा ।।५२।। लहरी सागरासी सांडूनी । काय बैसतील काननीं । तुज सांडून चापपाणी । आम्ही केवीं राहावें ।।५३।। बिभीषण म्हणे अयोध्यापती । जरी तमकूपीं[२] पडेल गभस्ती[३] । शेषही सांडील जगती । परी सामर्थ्य तुझें उणें नोहे ।।५४।। रसहीन बोलसी मात । जे न मानिती रणपंडित । तों नवल वर्तलें अद्भुत । वायु गुप्तरूपें पैं आला ।।५५।। सीतावल्लभाचे[४] कर्णीं । गरुडमंत्र गेला सांगोनी । रघुवीरें जपतांचि ते क्षणीं । सुपर्ण वेगें धांविन्नला ।।५६।। जैसे अंगीं केश अमूप । तैसे रामासी जडले सर्प । तो विष्णुवहनप्रताप[५] । देखतां सर्प पळाले ।।५७।। तत्काळ उठले रामसौमित्र । अष्टादशपद्मे वानर । उठोनि करिती भुभुःकार । तेणें लंकानगर दणाणिलें ।।५८।। निरभ्र नभीं दिसे दिनकर । तैसे देदीप्यमान रामसौमित्र । देव करिती जयजयकार । सुमनसंभार वर्षती ।।५९।। सुग्रीवादि कपी बोलती । आजि लंका घालूं पालथी । कोदंड चढवूनि सीतापती । अरिपंथ लक्षीतसे ।।२६०।। युद्धकांड रसभरित । जेथें वीररसचि अद्भुत । ते कथा ऐकतां समस्त । शत्रुक्षय[६] होय पैं ।।६१।। ब्रह्मानंदा श्रीरघुवीरा । दशमुखांतका समरधीरा । भक्तपाळका श्रीधरवरा । निर्विकारा अभंगा ।।६२।। स्वस्ति श्रीरामविजयग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत भक्त चतुर । पंचविंशतितमाध्याय गोड हा ।।२६३।। श्रीरामचंद्रार्पणमस्तु ।। ओव्या २६३ ।।

## ।। अध्याय पंचविसावा समाप्त।।

१. सुवर्णकांती सुवर्णाहून वेगळी काढता येत नाही २. अंधाऱ्या विहिरीत ३. सूर्य ४. सीतापती रामाचे ५. गरुडाचा प्रताप ६. शत्रुनाश

## ॥ अध्याय सव्विसावा ॥

# रावणाचा पराजय व गर्वहरण

॥ श्रीगणेशाय नमः॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः। जय जयसौभद्रकारके[१] भवानी। मूळपीठ अयोध्यावासिनी। आदिमायेची कुळस्वामिनी। प्रणवरूपिणी रघुनाथे ॥१॥ नारद व्यास वाल्मीक। विरिंचि अमरेंद्र सनकादिक। वेदशास्त्रें सहस्रमुख। कीर्ति गाती अंबे तुझी ॥२॥ सुग्रीव नळ नीळ जांबुवंत। बिभीषण अंगद हनुमंत। तेही दिवटे नाचती समस्त। प्रतापदीपिका[२] घेऊनी ॥३॥ अठरा पद्में वानरगण। त्या भूतावळिया संगें घेऊन। सुवेळाचळीं येऊन। गोंधळ मांडिला स्वानंदें ॥४॥ रणमंडळ हें होमकुंड। द्वेषाग्नि प्रज्वळतां प्रचंड। राक्षस बस्त उदंड। आहुतीमाजी पडताती ॥५॥ देवांतक नरांतक महोदर। प्रहस्त अतिकाय घटश्रोत्र[३]। इंद्रजित आणि दशवक्त्र। आहुती समग्र देती ह्या ॥६॥ निजदास दिवटा बिभीषण। अक्षयी लंकेसी स्थापून। निजभक्ति जानकी घेऊन। मूळपीठ अयोध्येसी जासील ॥७॥ हनुमंत दिवटा तुझा बळी। बळें पुच्छपोत[४] पाजळी। क्षणांत लंका जाळिली। केली होळी बहुसाल ॥८॥ ऐसे तुझे दिवटे अपार। त्यांमाजी दासानुदास श्रीधर। तेणें रामविजयदीपिका[५] परिकर[६]। पाजळिली यथामती ॥९॥ बाळ भोळे भक्त अज्ञान। प्रपंचरजनींत[७] पडिले जाण। त्यांस हे ग्रंथदीपिका पाजळून। मार्ग सुगम दाविला ॥१०॥ असो पूर्वाध्यायीं रामलक्ष्मण। इंद्रजितें नागपाश घालून। आकळिले मग वायुदेवें येऊन। सावध केले सवेंच ॥११॥ यावरी तो रणरंगधीर। प्रतापार्क श्रीरघुवीर। धनुष्य सजोनि सत्वर। वाट पाहे शत्रूची ॥१२॥ तों कोट्यनुकोटी वानरगण। सिंहनादें गर्जती पूर्ण। तेणें लंकेचे पिशिताशन। गजबजिले भयेंचि ॥१३॥ निर्मळ देखोनि श्रीरामचंद्र[८]। उचंबळला वानरसमुद्र[९]। भरतें[१०] लोटलें अपार। लंकादुर्गपर्यंत पैं ॥१४॥ उचलोनि पाषाण पर्वत। कपी भिरकाविती लंकेंत। राक्षसांचीं मंदिरें मोडित। प्रळय बहुत वर्तला ॥१५॥ रावणास सांगती समाचार। दुर्गासी झगटले वानर। रणीं उभे रामसौमित्र। शशिमित्र जयापरी ॥१६॥ प्रहस्तासी म्हणे लंकानाथ। पुत्रें जाळिलें समस्त। पुनरपि अंकुर तेथ। पूर्ववत फुटले पैं ॥१७॥ बीज भाजून दग्ध केलें। तें पुनरपि अंकुरलें। मृत्यूनें गिळून उगळिलें। अघटित घडलें प्रहस्ता ॥१८॥ मग तो प्रधान प्रहस्त। तोचि सेनापति प्रतापवंत। रावणासीं आज्ञा मागत। शत्रु समस्त आटीन बाणीं ॥१९॥ कायसे ते नर वानर। माझे केवीं साहाती शर। ऐसे ऐकता विंशतिनेत्र। परम संतोष पावला ॥२०॥ उत्तम वस्त्रें भूषणें। प्रहस्तासी दिधलीं रावणें। तयासी गौरवून म्हणे। विजयी होईं रणांगणीं ॥२१॥ स्वामी गौरवी स्वमुखेंकरून। धन्य धन्य तोचि दिन। असो वीस अक्षौहिणी दळ घेऊन। प्रहस्त प्रधान निघाला ॥२२॥ चतुरंग सेनासमुद्र। उत्तरद्वारें लोटला समग्र। तंव अद्भुत सुटला समीर। धुळीनें नेत्र दाटले ॥२३॥ प्रहस्तरथींचा ध्वज उन्मळला। शोणितचर्चित[११] भुज खंडला। प्रहस्तापुढें आणूनि टाकिला। निराळपंथें पक्ष्यांनीं ॥२४॥ मनांत दचकला प्रहस्त। परी वीरश्रीनें होय वेष्टित। अपशकुनांची ते खंत। टाकूनियां चालिला ॥२५॥ दृष्टीं देखोनि राक्षसभार। सिंहनादें गर्जती वानर। तेणें दुर्गाचे हुडे समग्र। येऊं पाहाती धरणीये ॥२६॥

---

१. मंगलदायक २. प्रतापरूपी दिवे ३. कुंभकर्ण ४. शेपूटरूपी मशाल ५. रामविजय ग्रंथ हाच दिवा ६. उत्तम रीतीने ७. संसाररूपी रात्रीत ८. रामरूपी चंद्र ९. वानरसेनासागर १०. भरती ११. रक्तबंबाळ झालेला

दोन्ही दळें एकवटलीं । संग्रामाची झड लागली । शस्त्रास्त्रें तये काळीं । यामिनीचर[1] वर्षती ॥२७॥ क्षणप्रभा नभोमंडळीं । तेवीं असिलता[2] झळकती ते काळीं । गदापाशशक्तिशूळीं । खोंचिती बळें कपीतें ॥२८॥ साहून वानरांचा मार । कपिसेनेवरी अपार । पिशिताशन अनिवार । येऊनियां कोसळती ॥२९॥ तंव ते प्रतापमित्र हरिगण । पर्वत वृक्ष आणि पाषाण । बळें देती भिरकावून । होती चूर्ण रजनीचर ॥३०॥ जैसा अग्नि लागे पर्वतीं । त्यावरी पतंग असंख्य झेंपावती । तैसे राक्षस मिसळती । वानरचमूंत येऊनियां ॥३१॥ वानर चतुर रणपंडित । तिहीं निशाचर आटिले बहुत । मग तो सेनापति प्रहस्त । रथ लोटी वायुवेगें ॥३२॥ जैसी पर्वतीं वीज पडत । तैसा कपींत आला अकस्मात । बाण सोडिले अद्भुत । नाहीं गणित तयांसी ॥३३॥ तंव तो बिभीषण लंकापती । बोलता जाहला रामाप्रती । म्हणे प्रहस्त सेनापती । मुख्य पट्टप्रधान रावणाचा ॥३४॥ तरी यासी सेनापति नीळ । प्रतियोद्धा धाडावा सबळ । तों इकडे प्रहस्तें वानरदळ । बहुत आटिलें ते काळीं ॥३५॥ अनिवार प्रहस्ताचा मार । साहों न शकती वानर । महा योद्धे समरधीर । माघारले ते काळीं ॥३६॥ दृष्टीं देखोनि रघुनाथ । प्रहस्तें बळें लोटिला रथ । ऐसें देखोनि जनकजामात । घालीत हस्त चापासी ॥३७॥ क्षण न लागतां चढविला गुण । तों रामापुढें नीळ येऊन । विनवीतसे कर जोडून । वानरगण ऐकती ॥३८॥ म्हणे जगद्वंद्या जगदु:खहरणा[3] । जनकजापते जगन्मोहना । मायाचक्रचाळका निरंजना[3] । मज आज्ञा देइंजे ॥३९॥ न लागतां एक क्षण । प्रहस्ताचा घेईन प्राण । अवश्य म्हणे सीतारमण । विजयी होऊन येईं पां ॥४०॥ मग घेऊनियां महापर्वत । नीळ धांवे अकस्मात । जैसा पाखंडियांसीं पंडित । सरसावला बोलावया ॥४१॥ प्रहस्तासी म्हणे नीळ वीर । तुम्ही म्हणवितां थोर झुंझार । शस्त्रें जवळी रक्षितां अपार । मिथ्यावेष कासया ॥४२॥ बाह्यवृत्ति व्याघ्राची असे । अंतरीं जंबुका भीतसे । जेवीं नट विरक्ताचें सोंग घेतसे । परी अंतरीं त्याग नोहे ॥४३॥ वरी वैराग्य मिथ्या दावीत । परी मनीं तृष्णा वाढवीत । जैसें वृंदावन भासत । रेखांकित उत्तम वरी ॥४४॥ तैसा तूं सेनापति प्रहस्त । मृत्यूनें तुज आणिलें येथ । तुझे पितृगण समस्त । काय करिती यमपुरीं ॥४५॥ त्यांचा समाचार घ्यावयासी । तुज पाठवितों यमपुरीसी । आतां परतोन लंकेसी । कैसा जासील पाहें पां ॥४६॥ शतमूर्ख दशमुख तत्त्वतां । पद्मजातजनकाची[4] कांता । ती आणूनियां वृथा । कुळक्षय केला रे ॥४७॥ प्रहस्त म्हणे मर्कटा नीळा । तुज मृत्युकाळीं फांटा[5] फुटला[5] । ऐसें बोलून लाविला । बाण चापासी प्रहस्तें ॥४८॥ नीळें हस्तींचा पर्वत । प्रहस्तावरी टाकिला अकस्मात । तेणें बाण सोडिले अद्भुत । अचळ फोडिला क्षणार्धे ॥४९॥ सवेंच शैल सबळ । प्रहस्तावरी टाकी नीळ । तेणें फोडूनि तत्काळ । पिष्टवत पैं केला ॥५०॥ एकामागें एक अद्भुत । नीळें टाकिले शत पर्वत । तितुकेही छेदी प्रहस्त । सीतानाथ पाहातसे ॥५१॥ प्रहस्ताचें बळ सबळ । सर्वांगीं खिळिला वीर नीळ । परी तो वैश्वानराचा बाळ । भिडतां मागें सरेना ॥५२॥ याउपरी तो नीळ दक्ष । शतयोजनें ताडवृक्ष । मोडूनि धांवे जेवीं विरूपाक्ष । कल्पांतकाळीं क्षोभला ॥५३॥ भुजाबळें[6] भोंवंडून । वृक्ष घातला उचलोन । रथासहित प्रहस्त चूर्ण । रणमंडळीं जाहला ॥५४॥ जाहला एकचि जयजयकार । सुमनवृष्टि करिती सुरवर । रावणापासीं सत्वर । घायाळ जाऊन सांगती ॥५५॥ पडिला ऐकतां प्रहस्त । शोक करी लंकानाथ । म्हणे व्याघ्र प्रतापवंत । गोवत्सांनीं मारियेला ॥५६॥

१. राक्षस २. तरवार ३. जगाचे दु:ख हरणारा राम ४.ब्रह्मदेवपिता श्रीराम ५. गर्व चढला ६. हाताच्या शक्तीने

कमळगर्भींचा घेऊन तंत[१] । मशकें बांधिला ऐरावत । खद्योततेजें आदित्य । आहाळला कैसा आजि तो ॥५७॥ सैनिकांसी म्हणे लंकानाथ । सेना सिद्ध करावी त्वरित । आजि मी युद्ध करीन अद्भुत । जिंकीन रघुनाथा कपींसीं ॥५८॥ घाव निशाणीं दिधले सत्वर । दणाणलें लंकानगर । कोट्यनुकोटी महावीर । सिद्ध जाहाले शस्त्रास्त्रीं ॥५९॥ तों लंकापतीची पट्टराणी । मंदोदरी विवेकखाणी । तियेचे दूत सभास्थानीं । परम धूर्त बैसले होते ॥६०॥ समय देखोनि विपरीत । स्वामिनीपासीं गेले त्वरित । वर्षाकाळीं वेगें धांवत । सरितापूर जैसे कां ॥६१॥ कीं शरासनापासोन[२] । सायक[३] धांवती त्वरेंकरून । कीं अस्ता जातां उष्णकिरण[४] । पक्षी आश्रमा धांवती ॥६२॥ तैसे स्वामिनीपासीं येऊन । पाणी जोडून करिती नमन । मग अधोदृष्टीनें वर्तमान । सांगती सकळ सभेचें ॥६३॥ रणीं पडला प्रहस्त प्रधान । म्हणोनियां दशानन । सकळ सेना सिद्ध करून । आतांचि निघे संग्रामा ॥६४॥ ऐसा समाचार ऐकोनी । मंदोदरी लावण्यखाणी । जिच्या स्वरूपावरूनी । रतिवर[५] ओंवाळिजे ॥६५॥ जिची मुखशोभा देखोनी । विधुबिंब[६] गेलें विरूनी । चंपककळिका गौरवर्णी । त्याहूनि बहुत सुकुमार ॥६६॥ अंगींची प्रभा अत्यंत । तेणें अलंकार शोभत । कीं त्रिभुवन हिंडोनि रतिकांत । श्रमोन तेथें विसांवला ॥६७॥ हास्य करितां कौतुकें । दंततेज मंदिरीं झळके । बोलतां रत्नें अनेकें । भूमीवरी विखुरती ॥६८॥ अंगींचे सुवासेंकरून । कोंदलें असे अवघें सदन । तडिदंबर[७] वेष्टिलें पूर्ण । सुवास मृदु निर्मळ ॥६९॥ चपळेचा प्रकाश पडे । तैसे झळकती हातींचे चुडे । वीस नेत्र होऊनि वेडे । रावणाचे पाहती ॥७०॥ ते लावण्यसागरींची लहरी[८] । दूतवार्ता ऐकोनि मंदोदरी । सुखासनीं बैसोन झडकरी । सभेसी तेव्हां चालिली ॥७१॥ सभोंवतें दासींचें चक्र । जाणविती नाना उपचार । सवें माल्यवंत प्रधान चतुर । बहुत वृद्ध जाणता ॥७२॥ आणि अतिकाय कुमार । जैसा पार्वतीसी स्कंद सुंदर । कीं शचीजवळी जयंत पुत्र । अतिकाय शोभे तैसा ॥७३॥ सहस्रांचे सहस्र दूत । कनकवेत्रपाणी पुढें धांवत । जन वारूनि समस्त । वाट करिती चालावया ॥७४॥ अंगींच्या प्रभा फांकती । तेणें गोपुरचर्या[९] उजळती । असो ते मंदोदरी सती । सभाद्वारीं प्रवेशली ॥७५॥ अधोवदनें[१०] तेव्हां जन । सकळ परते गेले उठोन । तेव्हां मंदोदरीनें येऊन । पतीचीं पदें नमियेलीं ॥७६॥ तैं दशमुख[११] बोले हांसोन । कां झालें आपुलें आगमन । मग क्षण एक निवांत बैसोन । मयजा[१२] वचन बोलतसे ॥७७॥ टाकोनियां शुद्ध पंथ । आडमार्गे जो गमन करीत । तया अपाय येती बहुत । यास संदेह असेना ॥७८॥ सर्वांसीं विरोध करून । आपुलें व्हावें म्हणे कल्याण । तो अनर्थी[१३] पडेल पूर्ण । यासी संदेह असेना ॥७९॥ वेदशास्त्रीं जें अनुचित । तेथें बळें घाली चित्त । तेणें आपुला केला घात । यासी संदेह असेना ॥८०॥ विवेकसद्बुद्धीचिये बळें । अनर्थ तितुके टाळावे कुशळें । वचनें संतांचीं निर्मळें । हृदयीं सदा धरावीं ॥८१॥ राया पुरुषार्थ हाचि पूर्ण । परदारा आणि परधन । तेथें जो न घाली मन । तोचि धन्य शास्त्र म्हणे ॥८२॥ नंदनवनींचा जो मिलिंद । दिव्यसुमनांचा घेत सुगंध । त्यासी पलांडुपुष्पीं[१४] लागला वेध । नवल थोर वाटे हें ॥८३॥

१. केसर २. धनुष्यापासून ३. बाण ४. सूर्य ५. कामदेव ६. चंद्रबिंब ७. विजेसारखे चमकणारे वस्त्र ८. लाट ९. गोपुराचा भाग १०. खाली तोंड करून ११. रावण १२. मंदोदरी १३. दुःखात १४. कांद्याच्या फुलाचा

सुरतरूच्या[१] सुमनांवरी[२] । जो निद्रा करी दिव्यमंदिरीं । तो निजों इच्छी खदिरांगारीं[३] । नवल परम वाटे हें ॥८४॥ ज्याची ललना सुंदर बहुत । जीतें अष्टनायिका लाजत । तो पुरुष अन्य आलिंगूं इच्छीत । नवल परम वाटे हें ॥८५॥ सुरभि[४] सुरतरु चिंतामणी । इच्छिलें तें पुरवी सदनीं । तो कोरान्न इच्छीत मनीं । नवल परम वाटे हें ॥८६॥ अंतरीं जाणूनि यथार्थ । अन्यथा बळें प्रतिपादीत । न करावें तें बळेंचि करीत । तरी अनर्थ जवळी आला ॥८७॥ मी जाणता पूर्ण सर्वज्ञ । ऐसा पोटीं वाहे अभिमान । स्वयें शतमूर्खांहूनि न्यून । कर्म आचरे बळेंचि ॥८८॥ याचिलागीं तू लंकेश्वरा । कामासी कदा नेदीं थारा । कामासंगें थोरथोरां । अनर्थी पूर्वी पाडिलें ॥८९॥ तुमचा स्वामी त्रिनेत्र । त्याचा शत्रु काम अपवित्र । तो तुम्हीं केला मित्र । तरीच उमावर क्षोभला ॥९०॥ स्मरारिमित्र रामचंद्र । त्यासीं सख्य करा साचार । मग तो संतोषूनि कर्पूरगौर । अक्षयी पद देईल ॥९१॥ सीता परम पतिव्रता । हे रामापासींच बरी गुणभरिता । कलहकल्लोळसरिता[५] । आणिकां गृहीं येतां हे ॥९२॥ हे काळानळाची[६] तीव्र ज्वाळा । क्षणें जाळील ब्रह्मांडमाळा । लंकेसी आणितां क्षय कुळा । करील आमुच्या निर्धारें ॥९३॥ सहस्रार्जुनें नेऊन बळें । राया तुम्हां बंदीं रक्षिलें । त्यास भृगुपतीनें मारिलें । त्यासही जिंकिलें राघवें ॥९४॥ ऐसा बळिया रघुनंदन । जेणें जळीं तारिले पाषाण । तरी त्यासीं सख्य करून । आपणाधीन करावा ॥९५॥ हिरण्यकश्यपा नाटोपे हरी । प्रल्हाद जन्मला त्याचे उदरीं । तेणें सख्य करून मुरारी । आपणाधीन पैं केला ॥९६॥ चिरंजीव करूनि कुळवल्ली । जगीं कीर्ति वाढविली । तैसा राम सखा ये काळीं । करून वाढवा सत्कीर्ति ॥९७॥ तुम्हांस धरिलें ज्या वाळीनें । तो जेणें निवटिला एकबाणें । त्यासीं आतां सख्य करणें । मनीं धरूनि हे गोष्टी ॥९८॥ भक्तिवेगळा रघुनाथ । तुम्हांस वश नव्हे यथार्थ । सीता देऊन सीताकांत । आपणाधीन करावा ॥९९॥ ज्यांहीं पुरुषार्थ करूनी । सुरांचे मुकुट पाडिले धरणीं । ते राक्षस पाडिले रणीं । कोट्यनुकोटी पाहें पां ॥१००॥ महाबळी भक्तराज परम । तेणें वश केला पुरुषोत्तम । तैसाच तुम्हीं श्रीराम । आपणाधीन करावा ॥१॥ यावरी म्हणे दशकंधर । प्रिये बोलसी सारांशोत्तर[७] । परी मी पुरुषार्थी राक्षसेश्वर । राम कदा न करीं मित्र ॥२॥ आतां जाऊनि समरांगणीं । नर वानर आटीन रणीं । तेव्हां तूं ऐकशील कर्णीं । पुरुषार्थ माझा कैसा तो ॥३॥ कैलास हालविला भुजबळें । बंदीस सकळ देव घातले । आतां पाहें शिरकमळें । शत्रूंचीं आजि आणीन ॥४॥ मयजा म्हणे जी उदारा । बळेंच अनर्थ आणितां घरा । हिरा सांडोनियां गारा । संग्रहीतां[८] कासया ॥५॥ कल्पवृक्ष उपडून । कां वाढवितां कंटकवन । राजहंस दवडून । दिवाभीतें कां पाळावीं ॥६॥ सुधारस सांडोनि देख । कांजी पितां काय सार्थक । सुरभि दवडूनि सुरेख । अजा कासया पाळावी ॥७॥ वृंदावन[९] दिसे सुंदर वहिलें । परी काळकूट आंत भरलें । तरी तें न सेविजे कदा काळें । विवेकियानें सहसाही ॥८॥ फणसफळासमान । कनकफळ[१०] दिसे पूर्ण । परी तें भुलीस कारण । विवेकियानें ओळखावें ॥९॥ सर्पमस्तकींचा मणी । घेऊं जातां प्राणहानी । तैसा श्रीरामाची राणी । समूळ कुळ निर्दाळील ॥११०॥ मग बोले लंकापती । तमकूपीं पडेल गभस्ती । मृगजळीं बुडेल अगस्ती[११] । कल्पांतींही घडेना ॥११॥ क्रोधें खवळला मृगनायक । तयासी केवीं मारील जंबुक । वडवानळासी मशक । विझवी घृत घेऊनियां ॥१२॥

१. कल्पवृक्षाच्या २. फुलांवर ३. निखाऱ्यांवर ४. कामधेनू ५. भांडणरूपी लाटा असलेली नदी ६. प्रलयाग्नीची ७. सारयुक्त बोलणे ८. जवळ ठेवता ९. या नावाचे एक कडू फळ १०. धोतऱ्याचे फळ ११. सूर्य

तरी आतां वल्लभे आपण । गृहाप्रती जावें उठोन । स्वस्थ असों द्यावें मन । चिंता कांहीं न करावी ॥१३॥ मंदोदरीचीं सारवचनें । जीं विवेकनभींचीं भगणें । सुबुद्धिसागरींचीं रत्नें[1] । परी तीं रावणें उपेक्षिलीं ॥१४॥ कमळसुवास परम सुंदर । परी तो काय जाणे दर्दुर । मुक्ताफळांचा आहार । बक काय घेऊं जाणे ॥१५॥ कस्तुरीचा अत्यंत सुवास । परी काय सेवूं जाणे वायस । तत्त्वविचार मद्यपियास । काय व्यर्थ सांगून ॥१६॥ जन्मांधापुढें नेऊन । व्यर्थ काय रत्नें ठेवून । कीं उत्तम सुस्वर गायन । बधिरापुढें व्यर्थ जैसें ॥१७॥ पतिव्रतेचे धर्म सकळ । जारिणीस काय सांगोनि फळ । धर्मशास्त्रश्रवण रसाळ । वाटपाड्यासी कायसे ॥१८॥ तैसीं मयजेचीं उत्तरें । उपेक्षिलीं पौलस्तिपुत्रें[2] । मग ते पतिव्रता त्वरें । निजगृहासी चालिली ॥१९॥ चित्तीं झोंबला चिंताग्न । गोड न वाटे भोजन शयन । भूषणें भोग विलास संपूर्ण । वोसंडून टाकिले ॥१२०॥ असो संग्रामसंकेतभेरी[3] । परम धडकल्या ते अवसरीं । दशकंठ सहपरिवारीं । युद्धलागीं निघाला ॥२१॥ सर्वे प्रधान आणि कुमर । अवघा लंकेंतील दळभार । निघतां जाहला अपार । सेनासमुद्र ते काळीं ॥२२॥ लंकेंचीं सकल महाद्वारें । उघडिलीं तेव्हां एकसरें । दळ चालिलें थोर गजरें । जेवीं प्रळयीं समुद्र फुटे ॥२३॥ पायदळ निघालें अपार । पर्वतासमान प्रचंड वीर । कांसा घातल्या विचित्र । अभेद्यकवचें अंगीं ब्रीदें ॥२४॥ आपादमस्तकपर्यंत । खेटकें विशाळ झळकत । असिलता शक्ति कुंत बहुत । शूल तोमर आयुधें ॥२५॥ लोहार्गळा खड्गें मुद्गल । कोयते कांबिटें गदा विशाळ । फरश यमदंष्ट्रा भिंडिमाळ । घेउनि चपळ धांवती ॥२६॥ तयांपाठीं विचित्र । लोटले तुरंगांचे भार । कीं तें अश्वरत्नांचें भांडार । एकसरें उघडिलें ॥२७॥ असंख्य अश्व श्यामसुंदर । पुच्छ पिंवळे आरक्त खुर । डोळे ताम्रवर्ण सुंदर । तीन्ही लोकीं गति जयां ॥२८॥ सूर्यरथीं जो चिंतामणी । त्याचि वेगें क्रमिती अवनी । एक नीळ पिंवळे हिंसती[4] गगनीं । प्रतिशब्द उठताती ॥२९॥ एक पारवे परम चपळ । एक माणिकाऐसे तेजाळ । सांवळे निळे शुभ्र चपळ । चांदणें पडे अंगतेजें ॥१३०॥ एक सिंहमुख सुंदर । चकोरें चंद्रवर्ण सुकुमार । क्षीर केशर कुंकुम शेंदूर । वर्णाचे एक धांवती ॥३१॥ जांबुळवर्ण परम चपळ । हें जंबुद्वीपींच निपजती सकळ । क्रौंचद्वीपींचे श्वेत वेगाळ । शशिवर्णास हांसत पैं ॥३२॥ शाल्मलिद्वीपींचे सुकुमार । शाकलद्वीपींचे चित्रविचित्र । नागद्वीपींचे परिकर । कुशद्वीपींचे सबळ पैं ॥३३॥ पुष्करींचे जे श्यामकर्ण । ते उदकावरी जाती जैसे पवन । जबडा रुंद आंखूड मान । ते बदकश्याम निघाले ॥३४॥ रणांगणीं परमधीर । ते आरबी वारू सुंदर । कपीशचंचळ[5] सुकुमार । समरीं धीर धरिती जे ॥३५॥ खगेश्वरासमान[6] गती । पक्ष्यांऐसे अंतरिक्षीं उडती । खुणावितां प्रवेशती । पवनासारिखे परदळीं ॥३६॥ जैसीं कां अलातचक्रें । तैसे राऊत फिरती त्वरें । असिलता झळकती एकसरें । चपळेऐशा तळपती ॥३७॥ अश्व खड्ग राऊत पूर्ण । तिहींचें होय एक मन । रावणाचें तैसेंचि सैन्य पूर्ण । असंख्य वारू चालिले ॥३८॥ अश्व पंजरीं पाखरिले[7] बहुत । अलंकार घातले रत्नखचित । विशाळ मुक्ताघोंस झळकत । जाती नाचत रणभूमीं ॥३९॥ नेपुरें गर्जती चरणीं । पुढील खूर न लागती अवनीं[8] । रत्नखचित मोहाळी[9] वदनीं । चपळेसमान झळकती ॥१४०॥ वज्रकवचेंसीं बळिवंत । वरी आरूढले चपळ राऊत । त्यांचे पाठीसीं उन्मत्त । गजभार खिंकाटती ॥४१॥

१. सद्बुद्धिरूपी सागरातील रत्ने २. रावणाने ३. युद्ध सुरू होण्याचे नगारे ४. खिंकाळती ५. वानराप्रमाणे चंचल ६. गरुडाप्रमाणे ७. खोगीर घातले ८. जमिनीला ९. लगाम

जैसे ऐरावतीचे सुत । चपळ श्वेत आणि चौदंत । झुली घातल्या रत्नजडित । पृष्ठ उदरीं आंवळिले ॥४२॥ वरी रत्नजडित चंवरडोल । ध्वज भेदिती निराळ । घंटा वाजती सबळ । चामरें थोर रुळती पैं ॥४३॥ वरी गजाकर्षक बैसले । सुपर्णचंचुवत[१] अंकुश घेतले । संकेत दावितां चपळ बळें । परचमूंत मिसळती ॥४४॥ त्यांचे पाठीं दिव्य रथ । चपळेऐसीं चक्रें झळकत । वरी ध्वज गगनचुंबित । नानावर्णी तळपती ॥४५॥ धनुष्यें शक्तीं नाना शस्त्रें । रथावरी रचिलीं अपारें । कुशल सूत बैसले धुरे । वाग्दोरे हातीं धरूनियां ॥४६॥ असो सुवेळपंथें अपार । चालिले चतुरंग दळभार । तेथें रणवाद्यें परम घोर । एकदांचि खोंकाती ॥४७॥ शशिवदना[२] भेरी धडकती । वाटे नादें उलेल जगती । शंख वाजतां दुमदुमती । दिशांचीं उदरें तेधवां ॥४८॥ ढोल गिडबिडी कैताळ । त्यांत सनया गर्जती रसाळ । शृंगें बुरंगें काहाळ । दौडकीं दुटाळ वाजती ॥४९॥ रामास दावी बिभीषण । आजि सकळ सेना घेऊन । युद्धासी आला जी रावण । पुत्रपौत्रांसहित पैं ॥१५०॥ एक लक्ष पुत्रसंतती । सवालक्ष पौत्रगणती । धन्य रावणाची संतती । कपी पाहती आदरें ॥५१॥ सकळ पुत्रप्रधानांचीं नामें । बिभीषण सांगे अनुक्रमें । दृष्टीं देखोन रघूत्तमें । आश्चर्य केलें ते समयीं ॥५२॥ मध्यें रावणाचा रथ । प्रभेस न्यून सहस्र आदित्य । विरिंचिहस्तें असे निर्मित । दिव्य अनुपम तेजस्वी ॥५३॥ त्या रथाचा जोडीस दुजा रथ । नसे त्रिभुवनीं कोठें यथार्थ । त्यावरी मंदोदरीकांत । दिसे मंडित वस्त्राभरणीं ॥५४॥ वरी त्राहाटिलीं दाही छत्रें । झळकती चामरें मित्रातपत्रें । ऐसें देखोनि मित्रपुत्रें । द्विजीं अधर रगडिले ॥५५॥ शत्रूचें वैभव अगाध । देखोनि सुग्रीवा नावरे क्रोध । ऐकोनि वारणाचा शब्द । जैसा मृगेंद्र हुंकारे ॥५६॥ तृणपर्वत[३] संघटतां जवळी । कैसा उगा राहे ज्वाळामाळी[४] । मृगेंद्र दृष्टीं न्याहाळी । मग गज केवीं स्थिरावे ॥५७॥ असो तैसा किष्किंधानाथ । धांवे घेऊन चंड पर्वत । रावणावरी अकस्मात । परम आवेशें टाकितसे ॥५८॥ तों दशमुखें[५] सोडोनि बाण । पिष्ट केला तो पर्वत जाण । सवेंच सोडिले दश बाण । सुग्रीव हृदयीं खिळियेला ॥५९॥ मग क्रोधावला सूर्यसुत[६] । सवेंचि उपडोनि एक पर्वत । रावणावरी अकस्मात । गगनपंथें टाकिला ॥१६०॥ तों रावणें बाणें फोडिला । मग शतबाणीं सुग्रीव खिळिला । रक्तधारा तये वेळां । भडभडां सूटल्या ॥६१॥ मूर्च्छा येऊन तये क्षणीं । सुग्रीव स्वीकारूं पाहे धरणी[७] । मग वानर अठरा अक्षौहिणी । एकदांचि उठावले ॥६२॥ शिळा वृक्ष पाषाण । कपींनीं पाडिला पर्जन्य । परी तितुक्यांसही रावण । एकलाच पुरवला ॥६३॥ जैसा पाखांडी[८] कुतर्क घेतां । नावरेच बहु पंडितां । तेवीं सकळ कपी भिडतां । लंकानाथ न गणीच ॥६४॥ असंख्यात सोडूनि शर । घायी जर्जर केले वानर । तों थोर थोर कपीश्वर[९] । उभे होते रामापाशीं ॥६५॥ त्यांमाजी सात जण । धांवती जैसे पंचानन । शरभ गवय गंधमादन । मैंद कुमुद द्विविद पैं ॥६६॥ गवाक्ष सातवा वीर । पर्वत घेऊनि सत्वर । हांकें गर्जवीत अंबर । रावणावरी टाकिती ॥६७॥ रावणें पर्वत फोडोनि समस्त । शरीं खिळिले वानर सप्त । भूमींसी पडले आक्रंदत । परम अनर्थ ओढवला ॥६८॥ अनिवार दशमुखाचा मार । देखोनि पळती कपिभार । तें पाहून राम रणरंगधीर । चाप सत्वर चढवीतसे ॥६९॥ तंव विनवी ऊर्मिलापती[१०] । माझे बाहु बहु स्फुरती । आज्ञा द्यावी मजप्रती । शिक्षा लावीन दशमुखा ॥१७०॥

१. गरुडाच्या चोचीसारखे २. चंद्रमुखी ३. गवताचा पर्वतप्राय ढीग ४. अग्नी ५. रावणाने ६. सुग्रीव ७. जमीन ८. नास्तिक ९. यूथपती वानर १०. लक्ष्मण

अवश्य म्हणे रघुनंदन । सौमित्रें सज्जोनियां धनुर्बाण । जैसा गजावरी उठे पंचानन । रावणासन्मुख लोटला ॥७१॥ म्हणे रे तस्करा दशमुखा । बुद्धिहीना शतमूर्खा । आणूनियां जनककन्यका । निज कुळक्षय केलासी ॥७२॥ कृतांताचे दाढेसी । सांपडलासी निश्चयेंसी । आतां कोणीकडे पळसी । जीव घेऊन माघारा ॥७३॥ ऐसें बोले लक्ष्मण । तों विशाळ पर्वत घेऊन । धांवे निराळोद्भवनंदन[1] । द्विदशनेत्रावरी[2] तेधवां ॥७४॥ जैसी कडकडोनी पडे चपळा । तैसा पर्वत रावणावरी टाकिला । रावणें फोडोनि ते वेळां । पिष्ट केला अंतरिक्षीं ॥७५॥ तों रथावरी चढला हनुमंत । रावणें झाडिली सबळ लाथ । मूर्च्छना सांवरून वायुसुत । उसनें घेता जाहला ॥७६॥ रावणहृदयीं ते काळीं । कपीनें वज्रमुष्टी दिधली । रावणासी गिरकी आली । मूर्च्छा सांवरी सवेंचि ॥७७॥ मग सबळ एक मुष्टिघात । मारुतीसी मारी लंकानाथ । तों विशाळ घेऊन पर्वत । नळ वानर धांविन्नला ॥७८॥ पर्वत टाकिला रावणावरी । तेणें पिष्ट केला तो अंबरीं । नळ खिळिला पंचशरीं । हृदयावरी तेधवां ॥७९॥ तों नळें केलें अद्भुत । मंत्र जपे ब्रह्मदत्त । कोट्यनुकोटी नळ तेथ । प्रकट झाले तेधवां ॥१८०॥ घेऊन पाषाण पर्वत । रावणावरी टाकिती समस्त । दोन्ही दळें झालीं विस्मित । सीतानाथ नवल करी ॥८१॥ ऐसें जाहलें एक मुहूर्त । मग ब्रह्मास्त्र प्रेरी लंकानाथ । नळ मावळले समस्त । जेवीं नक्षत्रें सूर्योदयीं ॥८२॥ कीं पारदाची[3] रवा फुटली । एकत्र येऊनि गोटी जाहली । तेवीं मुख्य नळ ते वेळीं । रणांगणीं उरलासे ॥८३॥ असो सिंहनादें गर्जोन । पुढें धांवे लक्ष्मण । तयाप्रती रावण । बोलता जाहला अतिगर्वें ॥८४॥ म्हणे तूं बाळ मनुष्याचा कुमर । अजून माथांचा ओला जार । तुवां संग्राम तरी निर्धार । कोठें केला सांग पां ॥८५॥ सौमित्र म्हणे रे मशका । माझा संग्राम पाहें कीटका । तुझें आयुष्य सरलें मूर्खा । लंका दिधली बिभीषणासी ॥८६॥ सिंहदरींतें आला कुंजर[4] । तो केवीं जिवंत जाईल बाहेर । सुपर्णे[5] धरिला फणिवर । तो केवीं प्रवेशे वारुळीं ॥८७॥ भुजंगें धरिला मूषक दांतीं । तो कैसा सुटेल पुढती । समुद्रतीरीं ऋषि अगस्ती । उगाचि कैसा बैसेल ॥८८॥ तृतीयनेत्रींचा[6] प्रळयाग्न । चालिला रतिपतीस लक्षून । तो राहिला शांत होऊन । हें काळत्रयीं घडेना ॥८९॥ तैसा श्रीराम लावण्यराशी । चालोन आला लंकेसी । आतां तूं पुत्रपौत्रें नांदसी । हें काळत्रयीं घडेना ॥१९०॥ ऐसें बोलोनियां लक्ष्मण । सोडी बाणांपाठीं बाण । शब्दामागें शब्द पूर्ण । वदनींहून जेवीं निघती पैं ॥९१॥ चपळ लेखकापासाव एकसरें । निघती अक्षरांपाठीं अक्षरें । तैसे बाण सुमित्राकुमरें । रावणावरी सोडिले ॥९२॥ रावणाचे अंगीं ते वेळे । बळें सपक्ष बाण रुतले । पांच बाण रावणें सोडिले । सौमित्रीवरी तेधवां ॥९३॥ जैशा पंच विद्युल्लता । तैसे सौमित्रे शर येतां । मग ते वरचेवरी देखिले तत्त्वतां । निजशरें पिष्ट केले ॥९४॥ परमक्रोधें दशमौळी[7] । ब्रह्मशक्ति[8] बाहेर काढिली । अभिमंत्रून सोडिली । राघवानुजा लक्षूनियां ॥९५॥ ते अनिवार शक्ति देखून । सुमित्रासुतें सोडिला बाण । अर्ध टाकिली खंडोन । अर्ध हृदयीं बैसली ॥९६॥ तेणें निचेष्टित[9] सौमित्रि पडिला । श्वासोछ्वास मंद जाहला । ऐसें देखोनि रावण धांविन्नला । रथाखालीं उतरूनियां ॥९७॥ निचेष्टित असतां सौमित्र । वरी हाणी मुष्टिप्रहार । जैसे निजेल्यावरी तस्कर[10] । बहुत घाय घालिती ॥९८॥

---

१. वायुपुत्र हनुमान २. रावणावर ३. पाऱ्याची ४. हत्ती ५. गरुडाने ६. महादेवाच्या तिसऱ्या डोळ्यातील ७. रावण ८. ब्रह्मास्त्र ९. चलनवलनरहित १०. चोर

तें मारुतीनें देखोन डोळां । कृतांतापरी धांविन्नला । मग लत्ताप्रहार ते वेळां । सबळ दिधला रावणा ॥९९॥ पादरक्षेचे[१] घायीं देख । लोक ताडिती जैसा वृश्चिक । कीं दंदशूकाचें मुख । पाषाणें चूर्ण करिती पैं ॥२००॥ तैसें लत्ताप्रहारेंकरून । असुरहृदय[२] केलें चूर्ण । अशुद्ध[३] वमीत[३] रावण । रथावर गेला आपुल्या ॥१॥ तों सावध जाहला लक्ष्मण । वेगें सोडी निर्वाण बाण । रावणाचें हृदय फोडून । पलीकडे शर गेला ॥२॥ सौमित्रीची व्यथा देखोन । क्षोभे जैसा प्रळयाग्न । अनुज पाठीसीं घालून । पुढें जाहला रघुवीर ॥३॥ रावण आरूढला रथावरी । जैसा जलद नगशिखरीं । तयासि देखतां रावणारी । काय करिता जाहला ॥४॥ हनुमंतस्कंधावरी[४] रघुवीर । उभा ठाके रावणासमोर । जैसा उदयाचळीं दिनकर । किंवा श्रीधर गरुडावरी ॥५॥ ऐरावतारूढ शचीनायक । कीं नंदीवरी मदनांतक[५] । तयापरी अयोध्यानायक । हनुमंतस्कंधीं शोभला ॥६॥ क्रोधायमान रघुनंदन । प्रथम सोडीत एक बाण । रावणाचीं दाही छत्रें छेदून । अकस्मात पाडिलीं ॥७॥ मित्रातपत्रें आणि चामरें । सर्वेचि छेदिलीं दुज्या शरें । मुकुट भूमीसी एकसरें । चूर करून पाडिले ॥८॥ सवेंच भाते दाही धनुष्यें । छेदोनि पाडिलीं अयोध्याधीशें । विचित्र केलें परमपुरुषें । प्रथमारंभीं ते काळीं ॥९॥ मग राघव बोले गर्जोनी । दशमुखा तुज सोडिलें आज रणीं । बहुत श्रमलासी रणांगणीं । जाईं सत्वर माघारा ॥२१०॥ आपली सर्व संपत्ति भोगून । सकळ स्त्रियांस येई पुसोन[६] । पुत्र पौत्र जे आप्तजन । निरोप घेऊनि येईं त्यांचा ॥११॥ मग झुंजतां समरांगणीं । तुझा देह खंडविखंड करूनी । तत्काळ पाडीन धरणीं । निश्चय मनीं जाण पां ॥१२॥ इतुकी जवळी असतां सेना । तूं कां आलासी समरांगणा । दुर्जना बुद्धिहीना मलिना । मुख येथें न दाखवीं ॥१३॥ ऐसें बोलतां जानकीजीवन । दशमुख जाहला दर्पभग्न[७] । अजासर्पन्यायें[८] करून । उगाचि तटस्थ पाहतसे ॥१४॥ जो पीडे दरिद्रेंकरून । तो देश त्यागून जाय उठोन । तैसा रावण रण सांडून । लंकेमाजी प्रवेशला ॥१५॥ कीं जो यातींतून[९] भ्रष्ट जाहला । तो जेवीं ब्राह्मणीं दवडिला । कीं दिव्य[१०] देतां खोटा जाहला । तो लाजोनि जाय परता पैं ॥१६॥ असो आतां नानाप्रयत्न करून । कुंभकर्णास उठवील रावण । ती कौतुककथा पुढें गहन । श्रवण करोत पंडित ॥१७॥ स्वस्ति श्रीरामविजयग्रंथ अंबर । नानादृष्टांत भगणें सुंदर । तेथें उदय पावला रामचंद्र । निष्कलंक अक्षयी ॥१८॥ ब्रह्मानंद श्रीरामचंद्र । जो निर्मळशीतळ उदार । तेथें अनन्य श्रीधर चकोर । स्वानंदामृत सेवीतसे ॥१९॥ स्वस्ति श्रीरामविजयग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत भक्त चुतर । षड्विंशतितमाध्याय गोड हा ॥२२०॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ओव्या २२० ॥

## ॥ अध्याय सव्विसावा समाप्त ॥

१. पादत्राणाचे २. रावणाचे हृदय ३. रक्त ओकीत ४. मारुतीच्या खांद्यावर ५. श्रीशंकर ६. विचारून ७. गर्वरहित ८. सापासमोर शेळी त्याप्रमाणे ९. जातीतून १०. कसोटी दाखवताना

## ॥ अध्याय सत्ताविसावा ॥

# कुंभकर्णास जागविणे

॥ श्रीगणेशाय नमः॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः। आळसी कदा उदीम न करी। नव जाय मंदिराबाहेरी। तों जगन्निवास साहाकारी[1]। घरींच निर्धारीं भाग्यें आला ॥१॥ मृत्तिका खणावया जात। तों मांदुस[2] सांपडे अकस्मात। तैसें आम्हांसी जाहलें यथार्थ। सद्गुरुनाथप्रसादें ॥२॥ अभ्यास न करितां बहुवस। सांपडली रामविजयमांदुस। मग गगनीं न माय हर्ष। उपरती[3] सहज जाहली ॥३॥ मांदुस उघडोनि जों न्याहाळीं। तों आंत होतीं सात कोहळीं। तीं हीं सप्तकांडें रसाळीं। एकाहूनि एक विशेष ॥४॥ कोहळीं न्याहाळून जंव पाहात। तंव दिव्य नाणीं दीप्तिमंत। भक्ति ज्ञान वैराग्ययुक्त। घवघवीत विराजती ॥५॥ चतुर श्रोते ज्ञानसंपन्न। ते बघूं आले जवळी धांवोन। म्हणती आम्हांस वांटा दे समान। मांडलें भांडण प्रेमभरें ॥६॥ म्हणती हीं वाल्मीकीचीं कोहळीं। तुज पूर्वभाग्यें लाधलीं। तरी वाटा आम्हांस ये वेळीं। देईं सर्वांसी सारिखा ॥७॥ मग चतुर जे संतजन। श्रवणपंक्तीस बैसले समान। कोहळीं त्यांपुढें नेऊन। एकसरें रचियेलीं ॥८॥ मग त्यांहीं कर्णद्वारें उघडोन। हृदयभांडारीं सांठविलें धन। श्रोते वक्ते सावधान। निजसुख पूर्ण पावले ॥९॥ पांच कोहळीं दाविलीं फोडून। साहावें युद्धकांड विशाळ गहन। असो गताध्यायीं कथानिरूपण। राघवें रावण निर्भर्त्सिला ॥१०॥ छत्र मुकुट टाकिले छेदून। अपमान पावला रावण। मग ये लंकेंत परतोन। चिंतार्णवीं[4] बुडाला ॥११॥ जैसा राहुग्रस्त निशाकर। कीं काळवंडे दग्धकांतार[5]। कपाळशूळें महाव्याघ्र। तैसा दशकंठ उतरला ॥१२॥ नावडे छत्र सिंहासन। जें जें पाहूं जाय रावण। तें तें रामरूप दिसे पूर्ण। नाठवे आन पदार्थ पैं ॥१३॥ सभेसी बैसला रावण। अत्यंत दिसे कळाहीन। महोदराप्रती वचन। बोलता जाहला ते वेळां ॥१४॥ म्हणे कैसा विपरीत आला काळ। मक्षिकेनें हालविला भूगोळ। चित्रींच्या सर्पे खगपाळ[6]। गिळिला नवल वाटतें ॥१५॥ खद्योततेजेंकरून। आहाळोनि गेला चंडकिरण। तैसा मी ही आजि प्रतापी पूर्ण। युद्धीं पावलों पराजय ॥१६॥ मग बोलती प्रधान। आतां उठवावा कुंभकर्ण। तो रामसौमित्रांसहित सैन्य। गिळील क्षण न लागतां ॥१७॥ ती रावणासी मानली मात। म्हणे घटश्रोत्रासी उठवा त्वरित। मग विरूपाक्ष[7] महोदर निघत। सहस्र राक्षस घेऊनियां ॥१८॥ मद्यपखाला[8] चार सहस्र। कुंजरीं घातल्या सत्वर। तैसेच पशू घेतले अपार। अन्नाचे पर्वत घेऊनियां ॥१९॥ वाद्यें वाजविती भयासुर। गजर करित पावले सत्वर। देखोनि भयानक शरीर। कंप सुटला राक्षसां ॥२०॥ वनगज म्हैसे तरस। नासिकांत गुंतले बहुवस। टाकितां श्वासोच्छ्वास। निर्गम नव्हे तयांसी ॥२१॥ सवालक्ष गांवें खोल। सरितापतीचें तुंबळ जळ। तें नाभिप्रमाण[9] केवळ। कुंभकर्णासी होय पैं ॥२२॥ असो राक्षस सर्व मिळती। द्वारीं एकदांचि हांका फोडिती। सकळ वापी[10] कूप[10] आटती। महागजरेंकरूनिया ॥२३॥

---

१. सहाय्यकर्ता २. रत्न पेटी ३. वैराग्य ४. चिंतेच्या समुद्रात ५. जळलेले अरण्य ६. गरुड ७. राक्षसाचे नाव ८. दारू भरलेल्या पखाली ९. बेंबीच्या खोली एवढे १०. विहिरी

स्वर्गापर्यंत ऐकों जाती । ऐशा कर्णी भेरी त्राहाटिती[१] । उरावरी गज चालविती । परी जागा नोहे सर्वथा ॥२४॥ एक गगनचुंबित वृक्ष घेऊन । नासिकीं चढविती पूर्ण । एक नाकपुडी अवरोधून[२] । श्वासोच्छ्वास कोंडिती ॥२५॥ एक वृक्ष पाषाण घेती । वर्मस्थळीं बळें ताडिती । कडू तीक्ष्ण औषधें ओतिती । नासिकपुटीं नेऊनियां ॥२६॥ उपाय केले बहुत पूर्ण । परी जागा नोहेच कुंभकर्ण । मग विरूपाक्षें किन्नरी आणून । कर्णामाजी बैसविल्या ॥२७॥ त्यांचें परम सुस्वर गायन । ऐकतां शेष येई धांवोन । मग जागा होऊन कुंभकर्ण । सावधान बैसला ॥२८॥ जांभई दिधली भयानक । मद्य प्राशिलें सकळिक । दाढेखालीं पशू देख । अपार घालून रगडिले ॥२९॥ अन्नमांसांचे पर्वत । गिळिले राक्षसें तेव्हां बहुत । मग नेत्र पुसोन पाहात । प्रधानांकडे ते काळीं ॥३०॥ तंव ते प्रणिपात करून । सांगते झाले सर्व वर्तमान । अनुजें सीता आणिली हिरून । तेथून सर्व कथियेलें ॥३१॥ हनुमंत लंका जाळून । रामसौमित्रां आला घेऊन । कालचे युद्धीं रावण । पूर्ण पराजय पावला ॥३२॥ रावण परम चिंताक्रांत । यालागीं तुम्हां उठविलें त्वरित । मांडला बहुत कल्पांत । आटले समस्त राक्षस ॥३३॥ उभा ठाकला कुंभकर्ण । म्हणे ऐसाचि रणासि जाईन । मग विनविती प्रधान । राजदर्शन घेइंजे ॥३४॥ सभेसी चालिला कुंभकर्ण । लंकादुर्ग त्यासी गुल्फप्रमाण[३] । वाटे आकाशासी लाविलें टेंकण । विमानें सुरगण पळविती ॥३५॥ लंकावेष्टित जे वानर । ते तेथून पळाले समग्र । देखोनि कुंभकर्णाचें शरीर । कपी मूर्च्छित पडियेले ॥३६॥ रामासी म्हणे बिभीषण । स्वामी हा उठविला कुंभकर्ण । आश्चर्य करी रघुनंदन । शरीर देखोन तयाचें ॥३७॥ बिभीषण म्हणे ते काळीं । रामा याचिया जन्मकाळीं । प्रळय वर्तला भूमंडळीं । हांक वाजली चहूंकडे ॥३८॥ हा मातेचिया उदरांतून । भूमीसी पडला कुंभकर्ण । तीस सहस्र स्त्रिया जाण । वदन पसरून गिळियेल्या ॥३९॥ इंद्राचा ऐरावत धरूनी । येणें आपटिला धरणीं । ऐरावताचे दांत मोडूनी । इंद्रासी येणें ताडिलें ॥४०॥ शक्रें वज्र उचलोनि घातलें । याचें रोम[४] नाहीं तुटले । यासी निद्राआवरण पडलें । म्हणोनि लोक वांचले हे ॥४१॥ असो कुंभकर्ण दृष्टीं देखोन । हिमज्वरें[५] व्यापले वानरगण । एकां मुरकुंडी वळून । दांतखिळिया बैसल्या ॥४२॥ भोंवतें पाहे चापपाणी । तों भयभीत वानरवाहिनी[६] । सर्वांचें अंतर जाणोनी । मारुतीकडे पाहिलें ॥४३॥ तों निमिषांत हनुमंत । अकस्मात गेला लंकेंत । कुंभकर्ण सभेसी जात । तंव अद्भुत केलें वायुसुतें ॥४४॥ कुंभकर्ण तये वेळां । कटीपर्यंत उचलिला । श्रीराम आणि कपी डोळां । तटस्थ होऊन पाहाती ॥४५॥ मद्यपानें कुंभकर्ण । अत्यंत गेलासे भुलून[७] । आपणास उचलितो कोण । हेही त्यासी नेणवे ॥४६॥ मग तो सीताशोकहरण । पुढती उचलून कुंभकर्ण । भुजाबळें भोवंडून । टाकीत होता सुवेळेसी ॥४७॥ मागुती केलें अनुमान । म्हणे गगनीं देऊं भिरकावून । कीं लंकेवरी आपटून । चूर्ण करूं सकलांही ॥४८॥ मग म्हणे नव्हे हा सुविचार । लंका होईल चूर्ण समग्र । मग तो बिभीषण नृपवर । नांदेल कैसा ये स्थळीं ॥४९॥ सुवेळेसी द्यावा टाकून । तरी वानर होतील बहुत चूर्ण । भूमंडळीं आपटूं धरून । तरी धरा जाईल पाताळीं ॥५०॥ ऊर्ध्वपंथींचि[८] ठेवून । भुजाबळें भोवंडून । वृक्षावरी घातला नेऊन । मग राघवापासीं परतला ॥५१॥ तेव्हा भय आणि शाहारे पूर्ण । गेलें कपींचें निघोन । जैसा उगवतां सहस्रकिरण । तम जाय निरसोनि ॥५२॥

१. वाजविती २. बंद करून ३. पायाच्या घोट्याएवढे ४. केस ५. भीतीने हुडहुडी भरली ६. वानरसेना ७. बेभान झाला होता ८. वरच्यावर

कीं हनुमंतें बळ दावून । वानरांसी दिधलें रसायन[१] । हिमज्वरभय दारुण । निघोन गेलें सर्वही ॥५३॥ असो श्रीरामचरणीं भाळ । ठेवी अंजनीचा बाळ । मग सुग्रीवादि कपी सकळ । धांवोन भेटती हनुमंता ॥५४॥ शब्दसुमनांच्या स्तुतिमाळा[२] । कपि घालिती मारुतीच्या गळां । म्हणती कुंभकर्ण कवेंत सांपडला । तरी कां सोडिला कळेना ॥५५॥ मारुतीचा अंतरार्थ । कपीतें सांगे रघुनाथ । त्यास माझे हातीं मृत्य । हें हनुमंत जाणतसे ॥५६॥ सिंहावलोकनें निश्चितीं । मागील कथा परिसावी श्रोतीं । कुंभकर्ण जात सभेप्रती । रावणासी भेटावया ॥५७॥ बंधु सन्मुख देखोन । हरुषें[३] कोंदला[३] दशानन । कुंभकर्ण प्रणिपात करून । निजस्थानीं बैसला ॥५८॥ जेवीं मेघ करी घोर गर्जन । तेवीं बोले कुंभकर्ण । काय संकट पडलें येऊन । म्हणोनि मज जागविलें ॥५९॥ महाप्रलय मांडला । कीं उर्वी जात होती रसातळा । किंवा कृतांत चालून आला । म्हणोनि मज जागविलें ॥६०॥ मग सांगे रावण वर्तमान । जानकी आणिली हिरून । यालागीं वानरदळ घेऊन । राम सुवेळेसी पातला ॥६१॥ धूम्राक्ष आणि वज्रदंष्ट्री । प्रहस्त प्रधान पडला समरीं । मग मी युद्धा गेलों झडकरी । परी पावलों पराजय ॥६२॥ मज परम संकट पडलें । म्हणोनि बंधो तुज जागविलें । मज चिंताव्याधीनें[४] पीडिलें । त्यासी औषध देई तूं ॥६३॥ संकटीं बंधु पाहावा साचार । दरिद्रकाळीं जाणिजे मित्र । संशय निरसावया समग्र । सद्‌गुरुचरण धरावे ॥६४॥ तम दाटलें जरी घोर । तरी दीपिका पाजळाव्या सत्वर । येतां वैरियाचें शस्त्र । वोडण[५] पुढें करावें ॥६५॥ दुष्काळ पडतां अत्यंत । दात्यापासीं जावें त्वरित । संकट आम्हां पडलें बहुत । म्हणोंनि तुज जागविलें ॥६६॥ यावरी बोले कुंभकर्ण । बुद्धि कर्मानुसारिणी पूर्ण । जानकी व्यर्थ आणून । कुळक्षय आरंभिला ॥६७॥ राम हा वैकुंठवासी नारायण । सुरांचे अवतार वानर पूर्ण । हें नारदें वर्तमान । पूर्वीच मज सांगितलें ॥६८॥ असो जें शुभाशुभ कर्म होत । तें भोगिल्याविण न चुकत । पुढील होणार भविष्यार्थ । तो न चुके कदाही ॥६९॥ करूं नये तें त्वां राया केलें । शेवटीं सीतेस तरी भोगिलें । येरू म्हणे बहुत यत्न केले । परी वश न होय जानकी ॥७०॥ ती रामावेगळी तत्त्वतां । आणिकां वश नव्हे सर्वथा । कुंभकर्ण म्हणे लंकानाथा । राघवरूप धरीं तूं ॥७१॥ जपोनियां कापट्यमंत्र । होईं सुंदर रघुवीर । सीता होईल वश साचार । क्षणमात्र न लागतां ॥७२॥ मग बोले लंकेश्वर । मी जैं निजांगें होईन रघुवीर । माझी दुर्वासना दुर्वार । मावळेल अवघी समूळीं ॥७३॥ घरासी येतां वासरमणी । तम न उरे ते क्षणीं । कीं गरुड येतां सर्पश्रेणी[६] । पळती उठोनि जीवभयें ॥७४॥ तैसा मी राम होतांचि जाण । वाटे परनारी मातेसमान । एकवचन एकबाण । एकपत्नीव्रती तो ॥७५॥ याचिलागीं बंधु जाण । राम सौमित्र वानरगण । यांसी संहारिल्याविण[७] । वश नोहे जानकी ॥७६॥ यावरी बोले कुंभकर्ण । आतां गिळीन सकळ सैन्य । क्षणांत राम लक्ष्मण । धरून आणीन पुरुषार्थे ॥७७॥ मग अपार सैन्यसमुद्र । सवें देत दशकंधर । रावणासी नमून सत्वर । कुंभकर्ण निघाला ॥७८॥ रणा येतां कुंभकर्ण । तेथें होते वानरगण । ते अवघे गेले पळोन । रामचंद्रासी सांगावया ॥७९॥ कुंभकर्ण विचारी अंतरीं । मी काय लोटूं वानरांवरी । जंबुकांवरी जैसा केसरी[८] । धांवतां पुरुषार्थ दिसेना ॥८०॥ पिपीलिकांवरी[९] धांवे गज । कीं अळिकेवरी द्विजराज । मूर्खसभेंत तेज:पुंज । पंडित शोभा न पावे ॥८१॥

१. औषधी २. स्तुतिरूपी शब्दहार ३. आनंदला ४. चिंतारूपी रोगाने ५. ढाल ६. सापांचा समूह ७. मारल्याशिवाय ८. सिंह ९. मुंग्यावर

आरंभीं राक्षसदळ तुंबळ । वानरांवरी धावलें चपळ । कपी उठावले सकळ । शिळा वृक्ष घेऊनियां ।।८२।। युद्ध झालें अपार । लोटले अशुद्धाचे पूर । परी ते न मानी घटश्रोत्र । म्हणे हें युद्ध कायसें ।।८३।। मूढ अपार बोलती । परी तें न भरे पंडिताचे चित्तीं । जैसे वृषभ परस्परें भांडती । महाव्याघ्रासी न माने तें ।।८४।। असो तेव्हा मुद्‌गर घेऊन । रामावरी लोटला कुंभकर्ण । अठरा पद्में वानरगण । पर्वत पाषाण भिरकाविती ।।८५।। पर्वतावरी पर्जन्य पडत । परी तो व्यथा न मानी किंचित । कीं कूर्मपृष्ठावरी बहुत । सुमनें वर्षतां न ढळेचि ।।८६।। तों शतशृंगमंडित पर्वत । घेऊन भिरकावी हनुमंत । तो मुष्टिघातें त्वरित । फोडून टाकी कुंभकर्ण ।।८७।। म्हणे रे मर्कटा धरीं धीर । तुवां जाळिलें माझें नगर । म्हणोनि धांवे घटश्रोत्र । हनुमंतावरी तेधवां ।।८८।। स्वबळें शूळ भोवंडोनी । मारुतीवरी घाली उचलूनी । ते वेळे वायुसुत धरणीं । मूर्च्छा येऊन पडियेला ।।८९।। तें देखोन वाहिनीपती[1] । नीळ धांवे समीरगती । कुंभकर्णाची युद्धगती । देव पाहाती विमानीं ।।९०।। नीळें पर्वत वरी टाकिला । तो मुष्टिघातें चूर्ण केला । नीळासी मुष्टिघात दीधला । मूर्च्छित पाडिला धरणीये ।।९१।। तों धांवले चौघे वानर । जे काळासही शिक्षा करणार । ऋषभ शरभ गवाक्ष वीर । गंधमादन चवथा तो ।।९२।। चौघांजणीं चार पर्वत । टाकिले पैं अकस्मात । ते मुष्टिघातें पिष्टवत । करूनियां टाकिले ।।९३।। शरभ गवाक्ष धरणीवरी । कुंभकर्णें आपटिले स्वकरीं । दोघे भिरकाविले अंबरीं । जगतीवरी पडियेले ।।९४।। मग अट्टहासें गर्जे कुंभकर्ण । वाटे ब्रह्मांड जाय उलोन । मग वानरांतें देखोन । ग्रासावया धांवला ।।९५।। कव घालोनि अकस्मात । एकदांच वानर धरी बहुत । मुखीं घालूनि चावीत । गिळिले गणित ऐका तें ।।९६।। ऐंशीं सहस्र द्रुमपाणी[2] । असुरें गिळिलें मुख पसरूनी । कित्येक कर्णरंध्रांतून[3] निघोनी । पळते जाहले एकसरें ।।९७।। उरले वानर ते वेळे । रण सांडोनि पळाले । गिरिकंदरीं दडाले । जीवभयेंकरूनियां ।।९८।। कित्येक तेव्हां वानरगण । सूर्यसुतासी गेले शरण । ते वेळीं पर्वत घेऊन । सुग्रीववीर धांविन्नला ।।९९।। तेणें विशाळ पर्वत टाकिला । येरें मुद्‌गरेंचूर्ण केला । सुग्रीव म्हणे अमंगळा । वृथा पुष्ट राक्षसा ।।१००।। तुझें नासिक आणि कर्ण । क्षण न लागतां छेदीन । विमानीं वृंदारकगण[4] । जेणेंकरून तोषती ।।१।। तुझा अग्रज दशकंधर । पंचवटीस येऊनि तस्कर । जानकी चिद्रत्न सुंदर । घेऊनि आला चोरूनियां ।।२।। तरी तस्करातें दंड हाचि पूर्ण । छेदावें नासिक आणि कर्ण । तूं रावणानुज कुंभकर्ण । शिक्षा लावीन तुज आतां ।।३।। कुंभकर्ण म्हणे सुग्रीवासी । मशक आगळें बहुत बोलसी । जैसा पतंग वडवानळासी । विझवावया धांवत ।।४।। मूषक जाहला क्रोधायमान । म्हणे सगळा पर्वत गिळीन । कीं वृश्चिक स्वपुच्छेंकरून । ताडीन म्हणे खदिरांगारा ।।५।। ऊर्णनाभीचा[5] उदरतंतु[5] । तेणें केवीं बांधिजे ऐरावतु । सूर्यमंडळ धगधगितु । खद्योत केवीं गिळील पां ।।६।। तैसा तूं बळहीन वानर । रागें आलासी मजसमोर । मत्कुणप्राय शरीर । चूर्ण करीन तुझें आतां ।।७।। ऐसें बोलतां रावणानुज[6] । पर्वत घेऊनि धांवे अर्कज[7] । कुंभकर्णाचे हृदयीं सहज । येऊनियां आदळला ।।८।। पर्वत गेला चूर्ण होऊन । क्रोधें धांवे कुंभकर्ण । सुग्रीवासी चरणीं धरून । भोंवडिला गरगरां ।।९।।

१. सेनापती २. वानर ३. कानाच्या छिद्रातून ४. देवगण ५. कोळ्याच्या पोटातून निघणारा धागा ६. कुंभकर्ण ७. सुग्रीव

पृथ्वीवरी आपटूं पाहत । तंव तो प्रतापी सूर्यसुत । पिळूनि कुंभकर्णाचा हात । ऊर्ध्वपंथें उडाला ॥११०॥ ग्रहमंडळपर्यंत । उडोनि गेला कपिनाथ । त्याहून कुंभकर्णाचा हात । उंचावला ते काळीं ॥११॥ मागुती वानरेश्वर[1] धरिला । बळेंच कक्षेंत दाटिला । कक्षेमाजी तो गुंडाळला । कंटाळला दुर्गंधीनें ॥१२॥ मनीं म्हणे वाळीनें रावण । कक्षेंत घालोनि केलें स्नान । तो सूड आजि घेतला जाण । टाकीन रगडोनी मर्कटा ॥१३॥ जयवाद्यांचा गजर । होता जाहला अपार । रणीं साधिला वानरेश्वर । मग घटश्रोत्र परतला ॥१४॥ संसारजाळें परम थोर । त्यांत गुंतला साधक नर । तो पळावया पाहे बाहेर । तेवीं वानरेश्वर निघों इच्छी ॥१५॥ दुर्गंधींत पडलें मुक्ताफळ । कीं पंकगर्तेत[2] मराळ । कीं ब्राह्मण श्रोत्री निर्मळ । हिंसकगृहीं कोंडिला ॥१६॥ असो मस्त जाहला कुंभकर्ण । नसे तया देहस्मरण । तों कक्षेंतून सूर्यनंदन । न लागतां क्षण निसटला ॥१७॥ नेत्रपातें जंव हेलावत । इतुक्यांत साधिलें तेणें कृत्य । कुंभकर्णस्कंधीं उभा ठाकत । तारानाथ[3] तेधवां ॥१८॥ दोन्ही विशाळ कर्ण ते वेळे । दोन्ही करीं दृढ धरिले । दंतसंधींत सांपडविलें । कुंभकर्णाचें नासिक ॥१९॥ मग कर्ण नासिक उपटोनी । सुग्रीव उडाला गगनीं । रामचरणांवरी येऊनी । मस्तक ठेवी सप्रेम ॥१२०॥ एकचि जाहला जयजयकार । देव वर्षती सुमनसंभार । यशस्वी जाहला सूर्यकुमर । आलिंगी रघुवीर तयातें ॥२१॥ घ्राण कर्ण नेले सूर्यसुतें । परी शुद्धि नाहीं कुंभकर्णातें । वर्तमान कळलें रावणातें । घटश्रोत्रातें विटंबिलें ॥२२॥ परम चिंताक्रांत रावण । नापिक[4] दीधला पाठवून । गगनचुंबित वंश घेऊन । तयासी दर्पण बांधिला ॥२३॥ सप्तखणी[5] महाद्वार देख । त्यावरी उभा ठाके नापिक । कुंभकर्णाचे संमुख । आदर्श तेव्हां दाविला ॥२४॥ छेदोनि नेले नासिका कर्ण । दर्पणीं देखे कुंभकर्ण । सुग्रीव गेला कक्षेंतून । झालें स्मरण ते काळीं ॥२५॥ जैसा किंशुकीं फुलला पर्वत । तैसा दिसे कुंभकर्ण आरक्त । परम विटला[6] मनांत । स्वरूप आपलें देखतां ॥२६॥ मनांत म्हणे कुंभकर्ण । आतां व्यर्थ काय वांचून । दशग्रीवास परतोन । काय हें वदन दाखवूं ॥२७॥ कपींसहित रामलक्ष्मण । गिळीन रणीं न लागतां क्षण । पृथ्वी पालथी घालीन । निर्दाळीन देव सर्व ॥२८॥ कुंभकर्ण परतला दळीं । दांतें रगडी अधरपाळी[7] । कृतांतवत हांक दीधली । डळमळली उर्वी तैं ॥२९॥ परतला देखोनि कुंभकर्ण । पळों लागले वानरगण । आले रघुपतीस शरण । रक्षीं रक्षीं म्हणूनियां ॥१३०॥ दृष्टीं लक्षूनि राघव । कुंभकर्णे घेतली धांव । तंव तो सौमित्री बलार्णव[8] । पाचारीत तयातें ॥३१॥ म्हणे उभा राहें एक क्षण । पाहें माझें शरसंधान । परी तो न मानी कुंभकर्ण । रामाकडे धांविन्नला ॥३२॥ परम कोपें सुमित्राकुमर । कुंभकर्णावरी टाकी सप्त शर । ते सपक्ष[9] बुडाले समग्र । मध्येंच गुप्त जाहले ॥३३॥ सौमित्रें टाकिले बहुत बाण । परी ते न मानी कुंभकर्ण । जेवीं पर्वतावरी पुष्पें येऊन । पडतां आसन न चळेचि ॥३४॥ पंडितवचनें रसाळीं । पाखांडी[10] न मानी कदाकाळीं । तैसा कुंभकर्ण ते वेळीं । न गणी शर सौमित्रीचे ॥३५॥ तों गदा घेऊनि बिभीषण । बंधूवरी आला धांवोन । म्हणे निर्नासिका[11] एक क्षण । मजसीं आतां युद्ध करीं ॥३६॥ म्यां पूर्वी बोधिला दशवक्त्र । त्यासी झोंबला कामविखार । तेणें भुलला तो समग्र । शुद्धि अणुमात्र नसेचि ॥३७॥

१. सुग्रीव २. चिखलाच्या खड्ड्यात ३. तारापती सुग्रीव ४. न्हावी ५. सात खणांचे ६. खजील झाला ७. खालचा ओठ ८. बळाचा सागर ९. पुच्छासह १०. नास्तिक ११. नकट्या

पांच आवर्तनें करितां पूर्ण । जाती महाव्याधी निरसोन । संतति संपत्ति संपूर्ण । पावेल सत्य निर्धारीं ॥३८॥ होऊनियां शुचिर्भूत । दहा आवर्तनें करितां सत्य । पोटीं होईल दिव्य सुत । रघुनाथभक्त प्रतापी ॥३९॥ जरी नव्हे श्रवण पठण । नित्य करितां ग्रंथपूजन । तरी ते घरींचें संकट पूर्ण । हनुमंत येऊनि निवारीत ॥१४०॥ अद्यापि चिरंजीव हनुमंत । जे रघुनाथकथा वाचिती भक्त । त्यांस अंतर्बाह्य[१] रक्षीत । उभा तिष्ठत त्यांजवळी ॥४१॥ करितां रामकथा श्रवण । सप्रेम सदा वायुनंदन । ग्रंथ वाची त्यापुढें येऊन । कर जोडोनि उभा राहे ॥४२॥ सुस्नात[२] शुचिर्भूत होऊनी । रामविजय उसां घेऊनी । निद्रा करितां रात्रीं स्वप्नीं । मारुति दर्शन देतसे ॥४३॥ ऐसा या ग्रंथाचा चमत्कार । जाणती रामउपासक नर । आधि व्याधी दु:ख दरिद्र । जाय सर्वत्र संग्रहें ॥४४॥ बालकांड आठ अध्यायवरी । अयोध्याकांड अध्याय चारी । चार अध्याय निर्धारीं । अरण्यकांड प्रचंड ॥४५॥ दोन अध्याय किष्किंधाकांड । तेथोनि पांच अध्याय रस वितंड । तें सुंदरकांड प्रचंड । लीलाचरित्र मारुतीचें ॥४६॥ दहा अध्याय संपूर्ण । युद्धकांड रसाळ गहन । सात अध्याय परम पावन । उत्तरकांड जाणिजे ॥४७॥ ऐसे अवघे अध्याय चाळीस । मिळून रामविजय जाहला सुरस । श्रवण करितां आसमास[३] । ब्रह्मानंद उचंबळे ॥४८॥ प्रथमाध्यायीं मंगलाचरण । गणेशसरस्वतीगुरुस्तवन । वाल्मीकीची उत्पत्ति सांगोन । प्रथमाध्याय संपविला ॥४९॥ बंधूसमवेत निश्चितीं । सांगीतली रावणाची उत्पत्ती । दशरथलग्नाची स्थिती । द्वितीयाध्यायीं निरूपिली ॥१५०॥ श्रावणवध शृंगीचें आगमन । दशरथें याग केला पूर्ण । त्यावरी हनुमंतजन्मकथन । तृतीयाध्यायीं हेचि कथा ॥५१॥ कौसल्या सुमित्रा कैकेयींप्रती । डोहळे पुसों गेला नृपती । श्रीरामध्यान जन्मस्थिती । चतुर्थाध्यायीं कथियेली ॥५२॥ श्रीरामाचें मौंजीबंधन । ब्रह्मचर्य तीर्थाटण । विश्वामित्र मागे रघुनंदन । हें निरूपण पंचमाध्यायीं ॥५३॥ योगवासिष्ठकथन । मायेनें गाधि केला दीन । वेदांतभागनिरूपण[४] । सहावा संपूर्ण जाणावा ॥५४॥ ताटिका मर्दूनि याग रक्षिला । अहल्योद्धार पुढें केला । सीतेचा जन्म सांगितला । सातव्यामाजी संपूर्ण ॥५५॥ आठव्यामाजीं सीतास्वयंवर । अपमानिला दशकंधर । लग्न लागलें जिंकिला परशुधर । आला रघुवीर अयोध्येसी ॥५६॥ राज्यीं बैसतां रघुनाथ । कैकयीनें केला अनर्थ । त्याकरितां दु:खी दशरथ । नवमाध्यायीं हे कथा ॥५७॥ श्रीराम वनासी निघाला । कौसल्येनें शोक केला । जाह्नवीतीरा[५] श्रीराम आला । दशमाध्यायीं हेचि कथा ॥५८॥ मग दशरथें त्यागिला प्राण । भरत आला मातुलगृहाहून[६] । भक्तिरस दिव्य निरूपण । गोड बहुत अकरावा ॥५९॥ चित्रकूटीं भेटला रघुनंदन । भरतें बहुत केलें स्तवन । नंदिग्रामीं भरत स्थापन । हें निरूपण बाराव्यांत ॥१६०॥ बहुत ऋषींचे दर्शन । घेता जाहला रघुनंदन । अगस्तीचा महिमा पूर्ण । तेराव्यांत कथियेला ॥६१॥ शूर्पणखा विटंबून । वधिले त्रिशिरा खर दूषण । दशमुखासी कळलें वर्तमान । चवदाव्यांत हेंचि कथा ॥६२॥ मृग वधूं गेला रघुनंदन । सीता घेऊनि गेला रावण । जटायु वधिला कपटेंकरून । पंधराव्यांत कथा हेचि ॥६३॥ सीताविरहें राम व्यापिला । त्यावरी जटायु उद्धरिला । पंपासरोवरीं आला । सोळाव्यांत हेचि कथा ॥६४॥ वालिसुग्रीवांची उत्पत्ती । मग शक्रसुत[७] वधी रघुपती । सत्रावे अध्यायीं निश्चितीं । कथा हेचि सविस्तर ॥६५॥

१. मानसिक व भौतिक संकटांपासून २. स्नान करून ३. पूर्णपणे ४. वेदांततत्त्वज्ञान – विवरण ५. गंगेच्या तीरावर ६. मामाच्या घराहून ७. वालीस

तारेप्रती बोध करून । शुद्धीस गेले वानरगण । समुद्रतीरीं संपातीदर्शन । हें निरूपण अठराव्यांत ॥६६॥ समुद्र उल्लंघून लंका शोधून । रावणसभा विटंबून । विजयी जाहला वायुनंदन । हें चरित्र एकोणिसावीं ॥६७॥ हनुमंतास होय सीतादर्शन । मग विध्वंसिलें अशोकवन । वधिला अखया आणि राक्षस संपूर्ण । हेचि कथा विसाव्यांत ॥६८॥ इंद्रजिताचें विटंबन । रावणछलन[1] लंकादहन । किष्किंधे आला अंजनीनंदन[2] । हेचि कथा एकविसाव्यांत ॥६९॥ ब्रह्मपाशबंधन । मिष[3] घेऊनि वायुनंदन । सागरीं पुच्छ विझवून । सुवेळेसी पातला ॥१७०॥ मग ब्रह्मपत्र[4] वाचून । समुद्रतीरीं आला रघुनंदन । मग बिभीषणें बोधिला रावण । हेचि कथा बाविसाव्यांत ॥७१॥ तैं बिभीषण भेटे रामास येऊन । सागरदर्शन सेतुबंधन । सुवेळेसी आला सीतारमण । हें निरूपण तेविसाव्यात ॥७२॥ कापट्य दाविलें सीतेसी । मंदोदरी भेटली जानकीसी । मग सुग्रीवें त्रासिले रावणासी । कथा हेच चोविसाव्यांत ॥७३॥ अंगदें बोधिला रावण । मग युद्ध जाहलें दारुण । नागपाशीं बांधिले रामलक्ष्मण । हे लीला पंचविसाव्यांत ॥७४॥ प्रहस्तवध मंदोदरीनीती । मग युद्धा आला लंकापती । तो पराभविला निश्चितीं । हे चरित्र सव्विसाव्यांत ॥७५॥ जागा केला कुंभकर्ण । त्यावरी युद्ध जाहलें दारुण । समरीं घटश्रोत्रें दिधला प्राण । हें निरूपण सत्ताविसाव्यांत ॥७६॥ नरांतकादि[5] षड्वीर पाडिले । शक्रजितें शरजाल सोडिलें । मारुती द्रोणाचळ आणी ते वेळे । अठ्ठाविसाव्यांत हेचि कथा ॥७७॥ निकुंभिलेसी जाऊन । वानरीं विध्वंसिले होमसदन[6] । शक्रजितासी मारी लक्ष्मण । एकुणतिसाव्यांत हेचि कथा ॥७८॥ तिसाव्यांत सुलोचनागहिंवर[7] । एकतिसाव्यांत अहिमहीसंहार । शक्तिभेदनें निर्धार । बत्तिसावा संपूर्ण पैं ॥७९॥ रावणाचा होम विध्वंसन । होता अपार माजविलें रण । रावण वधोनि स्थापिला बिभीषण । हें चरित्र तेतिसाव्यांत ॥१८०॥ जानकीचें दिव्य गहन । होतां इंद्र वर्षला अमृत पूर्ण । देव स्वस्थाना गेले स्तवून । कथा हेचि चौतिसाव्यांत ॥८१॥ पुष्पकीं बैसोन रघुनंदन । घेतलें अगस्तीचें दर्शन । त्यावरी भरतभेट पूर्ण । पस्तिसाव्यांत हें वृत्त ॥८२॥ नंदिग्रामीं राहिला राघवेश । मग केला अयोध्याप्रवेश । राज्यीं स्थापून रामास । वानर गेले स्वस्थाना ॥८३॥ छत्तिसावे अध्यायीं जाण । हेचि कथा असे पूर्ण । त्यावरी तीन अध्यायीं कौतुक गहन । लहूकुशाख्यान गोड पैं ॥८४॥ चालिसाव्यांत रघुवीरें । मृत्यु पावलीं ऋषींची कुमरें । तीं किरात वधोनियां त्वरें । माघारीं आणिलीं सवेग ॥८५॥ चालीस अध्यायपर्यंत । रामविजय संपूर्ण ग्रंथ । श्रवणमननें पुरती अर्थ । जाणती पंडित विवेकी ॥८६॥ रामविजय ग्रंथ नृपती । चालीस अध्याय वीर निश्चितीं । दोष[8] पर-दल[8] संहारिती । प्रचंड प्रतापी महाशूर ॥८७॥ कीं रामविजय ग्रंथ सुंदर । हें चालीस खणांचें दिव्य मंदिर । सीतेसह रघुवीर । क्रीडा करीत तेथें पैं ॥८८॥ कीं हें चालीस खणांचें वृंदावन[9] । रघुनाथकथा तुलसी पूर्ण । नाना दृष्टांत तीं पत्रें जाण । आवर्तन प्रदक्षिणा भक्त करिती ॥८९॥

१. रावणाला उपद्रव २. हनुमान ३. निमित्त ४. ब्रह्मदेवाने लिहिलेले पत्र ५. सहा वीर ६. यज्ञशाळा ७. सुलोचनेचा शोक ८. शत्रूचे सैन्य ९. रामविजयग्रंथरूपी तुळशीचे वृंदावन

रामविजय ग्रंथ भव्यमंदिर । चालीस कोठड्या अति सुंदर । साहित्य द्रव्य अपार । माजी भरलें न गणवे ।।१९०।। कीं हा ग्रंथ वासरमणी । वेष्टिला असे दृष्टांतकिरणीं[1] । कीं साहित्यतारांगणीं[2] । ग्रंथचंद्र[3] वेष्टिला ।।९१।। कीं ग्रंथ हाचि रघुवीर । दृष्टांत हे त्याचे वानर । मारूनि अहंदशकंधर[4] । विजयरूप सर्वदा ।।९२।। रामविजय मांदुस आगळी । आंत असती चाळीस कोहळीं । नवरत्नद्रव्यें पूर्ण भरलीं । मज दीधली ब्रह्मानंदें ।।९३।। पळालें भवदुःखदरिद्र । भाग्य घरा आलें अपार । कीं ग्रंथ हा पंढरीनगर[5] । दृष्टांत अपार यात्रा तेथें ।।९४।। रामविजय रत्नखाणी । वर्णितां धन्य जाहली वाणी । ब्रह्मानंदकृपेंकरूनी । ग्रंथ सिद्धीस पावला ।।९५।। आनंदसंप्रदाय पूर्ण । वाढत आलें मुळींचें ज्ञान । सृष्टीचे आदिकाळीं कमलासन[6] । उपदेशिला नारायणें ।।९६।। पद्मोद्भवें तेंचि ज्ञान । अत्रीस दिधलें असे संपूर्ण । त्याचे पोटीं आदिपुरुष जाण । दत्तात्रेय अवतरला ।।९७।। दत्तात्रेयें ज्ञान शुद्ध । सांगूनि बोधिला सदानंद । तेथूनि रामानंद प्रसिद्ध । यतीश्वर अगाध पैं ।।९८।। तेथोनि मंगलानंद यतीश्वर । गंभीर ज्ञानानंद दिवाकर । सहजानंद योगेश्वर । कल्याणधामवासी जो ।।९९।। तेथूनि पूर्णानंद महायतिराज । जो तपोज्ञाने[7] तेजःपुंज । तेथोनि दत्तानंद यति सहज । पूर्ण दत्तात्रेय अवतार ।।२००।। त्या दत्तात्रेयाचे उदरीं शुद्ध । पूर्ण अवतरला ब्रह्मानंद । पिता आणि गुरु प्रसिद्ध । तोचि माझा जाणिजे ।।१।। पंढरीहूनि चार योजनें दूरी । नैर्ऋत्यकोनीं नाझरें नगरीं । तेथील देशलेखक[8] निर्धारीं । ब्रह्मानंद पूर्वाश्रमीं ।।२।। मग पंढरीस येऊन । विधिपूर्वक केलें संन्यासग्रहण । भीमातीरीं समाधिस्थ पूर्ण । ब्रह्मानंद यतिराव ।।३।। तो ब्रह्मानंद माझा पिता । सावित्री नामें माझी माता । श्रीधरें वंदोनियां उभयतां । रामविजय ग्रंथ संपविला ।।४।। शके सोळाशें पंचवीस । सुभानु नाम संवत्सरास । भानुसप्तमी शुद्ध विशेष । श्रावण मास विख्यात पैं ।।५।। पंढरीक्षेत्रीं निश्चयेंसीं । ग्रंथ संपविला ते दिवशीं । लेखक आणि श्रोतयांसी । कल्याण असो सर्वथा ।।६।। सुभानु संवत्सर भानुवार । भानुवंशीं जन्मला रघुवीर । भानु[9] आणि रोहिणीवर[9] । तोंवरी ग्रंथ असो हा ।।७।। ब्रह्मानंदा पांडुरंगा । श्रीधरवरदा पूर्ण अभंगा । पुराणपुरुषा भक्तभवभंगा । श्रोता वक्ता तूंचि पैं ।।८।। स्वस्ति श्रीरामविजयग्रंथ सुंदर । संमत वाल्मीकिनाटकाधार । सदा परिसोत भक्त चतुर । चत्वारिंशत्तमाध्याय गोड हा ।।२०९।। श्रीरामचंद्रार्पणमस्तु ।। ।। ओव्या २०९ ।।

।। अध्याय चाळिसावा समाप्त।।

## ।। उत्तरकांड समाप्त ।।

# ।। श्रीरामविजयग्रंथ समाप्त ।।

१. दृष्टांतरूपी किरणांनी २. साहित्यरूप ताऱ्यांमध्ये ३. ग्रंथरूपी चंद्र ४. अहंकारूपी रावण ५. पंढरपूर ६. ब्रह्मदेव ७. तप आणि ज्ञान ८. मराठी लेखक ९. सूर्यचंद्र

॥ श्रीराम समर्थ॥

श्री समर्थ - रामदासस्वामि - विरचित

## ॥ श्रीराम प्रार्थना ॥

अनुदिन अनुतापें तापलों रामराया ।
परमदिनदयाळा नीरसीं मोहमाया ।
अचपळ मन माझें नावरे आवरीतां ।
तुजविण शिण होतो, धाव रे धाव आतां ॥१॥

भजनरहित रामा सर्वही जन्म गेला ।
स्वजनजनधनाचा व्यर्थ म्यां स्वार्थ केला ।
रघुपति मति माझी आपुलीशी करावी ।
सकळ त्यजुनि भावें कास तूझी धरावी ॥२॥

विषयजनितसूखें सौख्य होणार नाहीं ।
तुजविण रघुनाथा वोखटें सर्व कांहीं ।
रविकुळटिळका रे हीत माझें करावें ।
दुरित दुरि हरावें, स्वस्वरूपीं भरावें ॥३॥

तनु मन धन माझें राघवा रूप तुझें ।
तुजविण मज वाटे सर्व संसार वोझें ।
प्रचलित न करावी सर्वथा बुद्धि माझी ।
अचळभजनलीळा लागली आस तूझी ॥४॥

चपळपण मनाचें मोडितां मोडवेना ।
सकळस्वजनमाया तोडितां तोडवेना ।
घडि घडि विघडे हा निश्चयो अंतरींचा ।
म्हणउनि करुणा हे बोलतों दीनवाचा ॥५॥

जळत हृदय माझें जन्म कोट्यानुकोटी ।
मजवरि करुणेचा राघवा पूर लोटीं ।
तळमळ निववीं रे राम कारुण्यसिंधू ।
षडरिपुकुळ माझें तोडिं याचा समंधू ॥६॥

तुजविण करुणा हे कोण जाणेल माझी ।
सिणत सिणत पोटीं पाहिली वाट तूझी ।
झडकरिं झड घालीं, धाव पंचानना रे ।
तुजविण मज नेते जंबुकी वासना रे ॥७॥

सबळ जनक माझा राम लावण्यपेटी ।
म्हणउनि मज पोटीं लागली आस मोठी ।
दिवस गणित बोटीं प्राण ठेवूनि कंठीं ।
अवचट मज भेटी होत घालीन मीठी ॥८॥

जननिजनकमाया लेकरूं काय जाणे ।
पय न लगत मूखें हाणितां वत्स नेणे ।
जलधरकण-आशा लागली चातकासी ।
हिमकर अवलोकी पक्षिया भूमिवासी ॥९॥

तुजविण मज तैसें जाहलें रामराया ।
विलग विषमकाळीं तूटली सर्व माया ।
सकळजनसखा तूं, स्वामि आणीक नाहीं ।
वमक वमन जैसें त्यागिलें सर्व कांहीं ॥१०॥

स्वजनजनधनाचा कोण संतोष आहे ।
रघुपतिविण आतां चित्त कोठें न राहे ।
जिवलग जिव घेती, प्रेत सांडोनि जाती ।
विषय सकळ नेती, मागुता जन्म देती ॥११॥

सकळ जन भवाचे आखिले वैभवाचे ।
जिवलग मग कैंचे, चालते हेंचि साचें ।
विलग विषमकाळीं सांडिती सर्व माळीं ।
रघुविर सुखदाता सोडवी अंतकाळीं ॥१२॥

सुख सुख म्हणतां हें दुःख ठाकूनि आलें ।
भजन सकळ गेलें, चित्त दुश्चित्त झालें ।
भ्रमित मन कळेना, हीत तें आकळेना ।
परम कठिण देहीं देहबुद्धी गळेना ॥१३॥

उपरति मज रामीं जाहली पूर्णकामीं ।
सकळभ्रमविरामीं रामविश्रामधामीं ।
घडि घडि मन आतां रामरूपीं भरावें ।
रविकुळटिळका रे आपुलेसें करावें ॥१४॥

जळचर जळवासी नेणती त्या जळासी ।
निशिदिनिं तुजपाशीं चूकलों गूणराशी ।
भुमिधरनिगमांसी वर्णवेना जयासी ।
सकलभुवनवासी भेटि दे रामदासीं ॥१५॥

✿ ✿ ✿

नसे भक्ति ना ज्ञान ना ध्यान कांहीं ।
नसे प्रेम हें राम विश्राम नाहीं ।
असा दीन अज्ञान मी दास तूझा ।
समर्थां जनीं घेतला भार माझा ॥१॥

रघूनायका जन्मजन्मांतरींचा ।
अहंभाव छेदूनि टाकी दिनाचा ।
जनीं बोलती दास या राघवाचा ।
परी अंतरी लेश नाहीं तयाचा ॥२॥

दिनाचें उणें दीसतां लाज कोणा ।
जनीं दास दीसे तुझा दैन्यवाणा ।
शिरीं स्वामि तूं राम पूर्णप्रतापी ।
तुझा दास पाहीं सदा शीघ्रकोपी ॥३॥

रघूनायका दीन हातीं धरावें ।
अहंभाव छेदूनियां उद्धरावें ।
अगूणी तयालागिं गूणी करावें ।
समर्थें भवसागरीं ऊतरावें ॥४॥

किती भार घालूं रघूनायकाला ।
मजकारणें शीण होईल त्याला ।
दिनानाथा हा संकटीं धाव घाली ।
तयाचेनि हे सर्व काया निवाली ॥५॥

मज कोंवसा राम कैवल्यदाता ।
तयाचेनि हे फीटली सर्व चिंता ।
समर्था तया काय उत्तीर्ण व्हावें ।
सदा सर्वदा नाम वाचे वदावें ॥६॥

उदासीन हे वृत्ति जीवीं धरावी ।
अतीआदरें सर्व सेवा करावी ।
सदा प्रीति लागो तुझे गूण गातां ।
रघूनायका मागणें हेंचि आतां ॥७॥

तुझें रूपडें लोचनीं म्यां पाहावें ।
तूझें गूण गातां मनासी रहावें ।
उठो आवडी भक्तिपंथेंचि जातां ।
रघूनायका मागणें हेंचि आतां ॥८॥

मनीं वासना भक्ति तूझी करावी ।
कृपाळूपणें राघवें पूरवावी ।
वसावें मज अंतरी नाम घेतां ।
रघूनायका मागणें हेंचि आतां ॥९॥

सदा सर्वदा योग तूझा घडावा ।
तुझे कारणीं देह माझा पडावा ।
उपेक्षूं नको गूणवंता अनंता ।
रघूनायका मागणें हेंचि आतां ॥१०॥

नको द्रव्यदारा, नको येरझारा ।
नको मानसीं ज्ञानगर्वें फुगारा ।
सगूणीं मज लाविं रे भक्तिपंथा ।
रघूनायका मागणें हेंचि आतां ॥१२॥

भयें व्यापलों, प्रीतिछाया करावी ।
कृपासागरें सर्व चिंता हरावी ।
मज संकटीं सोडवावें समर्था ।
रघूनायका मागणें हेंचि आतां ॥१२॥

मनीं कामना कल्पना ते नसावी ।
कुबुद्धी कुडी वासना नीरसावी ।
नको संशयो, तोडिं संसारव्यथा ।
रघूनायका मागणें हेंचि आतां ॥१३॥

समर्थापुढें काय मागों कळेना ।
दुराशा मनीं बैसली हे ढळेना ।
पुरे संशयो, नीरसीं सर्व चिंता ।
रघूनायका मागणें हेंचि आतां ॥१४॥

ब्रिदाकारणें दीन हातीं धरावें ।
म्हणे दास भक्तांसि रे उद्धरावें ।
सुटे ब्रीद आम्हांसि सांडूनि जातां ।
रघूनायका मागणें हेंचि आतां ॥१५॥

❀ ❀ ❀

तुझिया वियोगें जीवित्व आलें ।
शरीरपांगें बहु दुःख जालें ।
अज्ञान दारिद्र्य माझें सरेना ।
तुजवीण रामा मज कंठवेना ॥१॥

जडली उपाधी, अभिमान साधी ।
विवेक नाहीं, बहुसाल बाधी ।
स्वामीवियोगें पळही गमेना ।
तुजवीण रामा मज कंठवेना ॥२॥

विश्रांति देहीं अणुमात्र नाहीं ।
कुळाभिमानें पडिलों प्रवाहीं ।
स्वहीत माझें होतां दिसेना ।
तुजवीण रामा मज कंठवेना ॥३॥

विषयी जनानें मज लाजवीलें ।
प्रपंचसंगें आयुष्य नेलें ।
समयीं बहु क्रोध, शांती घडेना ।
तुजवीण रामा मज कंठवेना ॥४॥

संसार संगे बहु पीडलों रे ।
कारुण्यसिंधू मज सोडवीं रे ।
कृपाकटाक्षें सांभाळिं दीना ।
तुजवीण रामा मज कंठवेना ॥५॥

❀ ❀ ❀

असंख्यात ते भक्त होऊनि गेले ।
तिंहीं साधनांचे बहू कष्ट केले ॥
नव्हे कार्यकर्ता भुमीभार जालों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥१॥

बहू दास ते तापसी तीर्थवासी ।
गिरीकंदरीं भेटि नाहीं जनांसी ॥
स्थिती ऐकतां थोर विस्मीत झालों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥२॥

सदा प्रेमराशी तयां भेटलासी ।
तुझ्या दर्शनें स्पर्शनें सौख्यराशी ॥
अहंता मनीं शब्दज्ञानें बुडालों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥३॥

तुझ्या प्रीतिचे दास जन्मास आले ।
असंख्यात ते कीर्ति बोलोनि गेले ॥
बहू धारणा थोर चक्कीत जालों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥४॥

बहूसाल देवालयें हाटकाचीं ।
रसाळ कळा लाघवें नाटकाचीं ॥
पुजा देखितां जाड जीवीं गळालों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥५॥

कितेकीं देह त्यागिले तूजलागीं ।
पुढें जाहले संगतीचे विभागी ॥
देहेदुःख होतांचि वेगीं पळालों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥६॥

किती योगमूर्ती किती पुण्यमूर्ती ।
किती धर्मसंस्थापना अन्नशांती ॥
पस्तावलों कावलों तप्त जालों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥७॥

सदा सर्वदा राम सोडूनि कामीं ।
समर्था तुझे दास आम्ही निकामी ॥
बहू स्वार्थबुद्धीनें रे कष्टवीलों ।
तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥८॥

❀ ❀ ❀

## ॥ श्रीमारुतीस्तोत्र ॥

भीमरूपी महारुद्रा, वज्रहनुमान मारुती ।
वनारी अंजनीसूता, रामदूता प्रभंजना ॥१॥
महाबळी प्राणदाता, सकळां ऊठवी बळें ।
सौख्यकारी दुःखहारी, दूत वैष्णवगायका ॥२॥
दीननाथा हरीरूपा, सुंदरा जगदंतरा ।
पातालदेवताहंता, भव्यसिंदूरलेपना ॥३॥
लोकनाथा जगन्नाथा, प्राणनाथा पुरातना ।
पुण्यवंता पुण्यशीला, पावना परितोषका ॥४॥
ध्वजांगें उचली बाहो, आवेशें लोटला पुढें ।
काळाग्नि काळरुद्राग्नि, देखतां कांपती भयें ॥५॥
ब्रह्मांडे माइलीं नेणों, आंवळे दंतपंगती ।
नेत्राग्नि चालिल्या ज्वाळा, भ्रुकुटी ताठिल्या बळें ॥६॥
पुच्छ तें मुरडिलें माथां, किरीटी कुंडलें बरीं ।
सुवर्णकटिकांसोटी, घंटा किंकिणि नागरा ॥७॥
ठकारे पर्वताऐसा, नेटका सडपातळू ।
चपळांग पाहतां मोठें, महाविद्युल्लतेपरी ॥८॥
कोटीच्या कोटि उड्डाणें, झेंपावे उत्तरेकडे ।
मंद्राद्रीसारिखा द्रोणू, क्रोधें उत्पाटिला बळें ॥९॥
आणिला मागुती नेला, आला गेला मनोगती ।
मनासी टाकिलें मागें, गतीसी तुळणा नसे ॥१०॥
अणूपासोनि ब्रह्मांडायेवढा होत जातसे ।
तयासी तुळणा कोठें, मेरुमांदार धाकुटे ॥११॥
ब्रह्मांडाभोंवते वेढे, व्रजपुच्छे करू शके ।
तयासी तुळणा कैंची, ब्रह्मांडीं पाहतां नसे ॥१२॥
आरक्त देखिलें डोळां, ग्रासिलें सूर्यमंडळा ।
वाढतां वाढतां वाढे, भेदिलें शून्यमंडळा ॥१३॥
धनधान्यपशूवृद्धि, पुत्रपौत्र समग्रही ।
पावती रूपविद्यादि, स्तोत्रपाठें करूनियां ॥१४॥
भूतप्रेतसमंधाधि, रोगव्याधि समस्तही ।
नासती तूटती चिंता, आनंदें भीमदर्शनें ॥१५॥
हे धरा पंधरा श्लोकी, लाभली शोभली बरी ।
दृढदेहो निसंदेहो, संख्या चंद्रकळागुणें ॥१६॥
रामदासीं अग्रगणू, कपिकुळासि मंडणू ।
रामरूपी अंतरात्मा, दर्शनें दोष नासती ॥१७॥

॥ इति श्रीरामदासकृतं संकटनिरसनं श्रीमारुतिस्तोत्रं संपूर्णम्॥

---

## हाचि सुबोध गुरूंचा

नाम सदा बोलावें, गावें भावें, जनांसि सांगावें । हाचि सुबोध गुरूंचा, नामापरतें न सत्य मानावें ॥१॥
नामांत रंगुनीया व्यवहारीं सर्व भोग सेवावे । हाचि सुबोध गुरूंचा, भोगासंगें कुठें न गुंतावे ॥२॥
आनंदांत असावें, आळस भय द्वेष दूर त्यागावे । हाचि सुबोध गुरूंचा, अनुसंधाना कधीं न चुकवावें॥३॥
गोड सदा बोलावें, नम्रपणें सर्वलोकप्रिय व्हावें । हाचि सुबोध गुरूंचा, भक्तीने रघुपतीस आळवावें ॥४॥
स्वान्तर शुद्ध असावें, कपटाचरणा स्वयें न वश व्हावें । हाचि सुबोध गुरूंचा, मन कोणाचें कधीं न दुखवावें॥५॥
माझा राम सखा, मी रामाचा दास, नित्य बोलावें । हाचि सुबोध गुरूंचा, रामपाशीं अनन्य वागावें॥६॥
यत्न कसून करीन मी, यश दे, रामा, न दे, तुझी सत्ता। हाचि सुबोध गुरूंचा, मानावा राम सर्वदा कर्ता॥७॥
आचार संयमानें युक्त असा नीतिधर्म पाळावा । हाचि सुबोध गुरूंचा, खेळाऐसा प्रपंच मानावा॥८॥
दाता राम सुखाचा, संसार मान तूं प्रभूसेवा । हाचि सुबोध गुरूंचा, संतोषा सर्वदा मनीं ठेवा॥९॥
स्वार्थ खरा साधा रे, नित्य तुम्ही नामगायनीं जागा । हाचि सुबोध गुरूंचा, मीपण जाळोनिया जगीं वागा॥१०॥
अभिमान शत्रु मोठा, सर्वांना जाचतो सुखाशेनें । हाचि सुबोध गुरूंचा, मारावा तो समूळ नामानें ॥११॥
राज्याधिकार येवो, किंवा जावो समस्त धन मान । हाचि सुबोध गुरूंचा, भंगावें ना कदा समाधान ॥१२॥
प्रेमांत राम रमतो, प्रेमाला मोल ना जगामाजीं। हाचि सुबोध गुरूंचा, गुरुरायाला तहान प्रेमाची ॥१३॥

✿ ✿ ✿